






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका















अनुक्रमणिका



# भारतभूचे 'लाल' लाडले!



रामकृष्णाच्या भूमीत शतकामागून फुलली दोन सुवर्ण-पुष्पे ! एक फूल होते गुलाबाचे आणि एक होते लाल कमलाचे ! फुले फुलली पूजेसाठी— बंदिस्त देव्हाऱ्यात राहून सारे 'भोग' भोगणाऱ्या मूर्तीच्या पूजेसाठी नाही तर शेतात राबणाऱ्या, कारखान्यात कष्टणाऱ्या, कार्यालयातून विशाल स्वप्ने पाहत फिरणाऱ्या अनेक भाषा बोलणाऱ्या, अनेक प्रांतात राहणाऱ्या, विविध प्रकारचे पोषाख घालून मिरवणाऱ्या पण अंती एकच रूप धारण करणाऱ्या परमेश्वराच्या पूजेसाठी ! ती फुले फुलली त्यासाठी, त्यानी सुगंध धारण केला तो त्यासाठी, सुगंध त्यागिला तोही त्यासाठी आणि अखेर निर्माल्याचे जिणे हेही भाग्यवंताचे लेणे मानले तेही त्यासाठीच ! त्या पुष्पांच्या पाकळी पाकळीवर मंत्र कोरला गेला होता समर्पणाचा, त्यागाचा, कर्तृत्वाचा ! "ह्याहून अधिक गंध असता तर तोही दिला असता" अशी प्रतिज्ञा नोंदली गेली होती त्या गंधाच्या कणाकणावर ! फुले गेली. समर्पित झाली. पण गंध अजूनही दरवळतो आहे. दरवळत राहणार आहे. कारण त्या फुलाना 'जीवना'चा खरा अर्थ गवसला होता. भोग भोगून काहीही उरत नाही आणि त्याग करून मात्र सारे काही उरते.

बीज उरत नाही. पण तरु डोलू लागतो. बियाणे सरते आणि भाग्याचे मळे फुलतात.

ह्या देशात 'भाग्याचे मळे' फुलावेत म्हणून समर्पित झालेल्या त्या दोन सुवर्णपुष्पाना अभिवादन.

**—संपादक**

# श्रुति धन्य जाहल्या ऐकुनि ज्यांची गाथा



सूर्याने दिले तेज, चंद्राने पसरला धवल गालिचा किरणांचा, नक्षत्रानी केली उधळण फुलांची, रंगी बेरंगी, सुगंधी शीतल. ग्रहगोल फिरू लागले फेर धरून भोवती गाणी गात पराक्रमाची, तेजाची, अस्मितेची. त्या गाण्यागाण्यातून स्रवली गाथा नव्या युगाची. नव्या मनूची. पानापानात ठासून भरले आहे मूर्तिमंत साहस, असामान्य धैर्य, असीम त्याग, नवा इतिहास घडविणारी जिद्द ! गतवर्षीच्या त्या 'युद्धकांडा'च्या पानोपानी निज रुधिराने हे नवे 'रामायण' घडविणाऱ्या 'कृतिशूर' जवानानो, तुमच्या त्यागाला, धैर्याला, साहसाला आमचे कोटि कोटि प्रणाम.

तुम्ही लढलात मरणाच्या जिद्दीने म्हणून जिवंत राहिले राष्ट्र ! उभा राहिला इथला मानव. वेदशास्त्रांचा, कलांचा, साहित्याचा जयजयकार करण्यासाठी. पण सर्वप्रथम त्याने केला जय जयकार तुमचा ! जय जवान !! ज्या जवानांचे कळले नव्हते नाव-निशाण ! राष्ट्र यज्ञाच्या बलिवेदीवर हौतात्म्य पत्करणाऱ्या त्या ज्ञात-अज्ञात हुतात्म्याना ही दीप—मालिका समर्पण !!



अनुक्रमणिका

## नेता ऐसा मिळे जरी
## तर काय आम्हाला उणे ?



तुमच्या चरणांवरती शास्त्री मस्तक नतं अमुचे
अनाथ भारत तुम्हाविना गुण आठवतो तुमचे
सत्ताबळ लाभता जगाला किमया दाखविली
भारतभूची मान तुम्ही अभिमाने उंचविली
राष्ट्रप्रेमी तोच आपुला, शत्रु राष्ट्रविरोधी
पक्ष कोणता ते न पाहता हेच पाहिले आधी
संग्रामी खंबीर राहिला, राष्ट्राचा संसार
करण्यासाठी अपुलाही संसार सारला दूर
अठरा वर्षामाजि जे नच स्वप्नीहि कल्पिले
अठरा महिन्यामध्यें तुम्ही वास्तवांत घडविले
भाळुन भारतजनता तुमच्या गुणसंपत्तीवर
एक होऊनी जमली तुमच्या पाठीशी सत्वर
गौरवशिखरावरीच तुम्ही चिरनिद्रा घेतली
माध्यान्हीला हाय अचानक सूर्यप्रभा चिरली
तुम्ही गेला परंतु फुलवुन स्वप्न एक देशात
तुमच्या सम दुसरा नेता यावा पुन्हा अमुच्यात !






## श्रेयनामावलि—

- आठ रंगविलासी कलाकृती : प्रणयिनी, मनस्विनी, विरहिणी, कामायनी, वसंतागम, ग्रीष्मसखी, वर्षानृत्य, शिशिरागम.
- दुरंगी विंगचित्रमाला : गाढवासहित ब्रह्मचर्य गेले आणि साहित्यातील चालू नाके.
- राजकीय व्यंगचित्रमाला : आली रे आली, निवडणूक आली.
- काही साहित्य तुडतुड्या : केशवसुत : आधुनिक काव्यदर्शन आणि निवडणूक 'FOOL–बाज्या.'
- कथा : पु. भा. भावे • वि. स. खांडेकर • अरविंद गोखले • वामन चोरघडे • रणजित देसाई • मनोहर तल्हार • ना. व्यं देशपांडे • गोपाळकृष्ण भोबे • विजया राजाध्यक्ष • अरविंद ताटके • य. दि. फडके • सिनिक् • सदानंद रेगे • प्रभाकर नेरुरकर • डॉ. सरोजिनी बाबर.
- विनोदी कथा : जयवंत दळवी • रमेश मंत्री • पद्माकर गोवईकर • श्रीराम कामत • वसंत सबनीस.
- ललित लेख : आचार्य अत्रे [मुलाखत] • माधव राजवाडे • आनंद साधले • प्रभाकर अत्रे • दिलीप पुरुषोत्तम चित्रे.
- एकपात्री नाटक : विद्याधर गोखले.
- कविता : कुसुमाग्रज • वा. भ. बोरकर • इंदिरा • राजा बढे • मंगेश पाडगांवकर • शान्ता शेळके • मधुकर केचे • दिलीप पुरुषोत्तम चित्रे • पद्मा लोकूर • सूर्यकान्त खांडेकर • अमर शेख • कृ. ब. निकुम्ब • भास्कर उत्तरवार • वासंती गजेंद्रगडकर • वि. म. कुळकर्णी आणि क्षण-शृंगारिका–आनंद साधले.

※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ यानी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत ३।। रु. + रजि. पोस्ट १·०० रु. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह १२।।. अंकात प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचीहि अधिकृत मतें असतातच असे नाही. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

टे. नं. ३५७७६५
Gram : Dalalart

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Girgaum, Bombay-4



अनुक्रमणिका



जे जनात आणि मनात घडलं होतं ते प्रत्यक्षात घडलं. स्पर्शाच्या नशेचं शेवटचं टोक मी आणि त्यानी गाठलं. मी स्वतःला विसरले, जगाला विसरले आणि तुम्हाला विसरले. मी जे केलं ते कां केलं? ते माझ्या हातून कसं घडलं?........तुम्हाला स्पष्टीकरणं हवं आहे ना?........

— पु. भा. भावे



कुमार, आज तुम्ही मला नंदनच्या मिठीत पाहिलंत. नंदनच्या मिठीत तुम्ही मला पहायची ही काही पहिलीच वेळ नव्हती. रंगभूमीवर ह्यापूर्वी अनेकदा नंदननं मला मिठीत घेतलेलं आहे. शेकडो लोकांच्या साक्षीनं तुम्ही ते पाहिलेलं आहे. "प्रेम म्हणतात ते हे"चा शंभरावा प्रयोग कालच झाला. ह्या नाटकात नंदन मला कवटाळतो, माझे गालगुच्चे घेतो, हातावर उचलून मला गरगरा फिरवतो, आणि मला सोफ्यावर फेकून माझ्या पाठीला रेलून बसतो. माझ्या तोंडाजवळ तोंड आणतो. रंगभूमीवरचे आमचे ते सारे प्रेमप्रसंग तुम्ही पाहिलेले आहात. सहस्रावधि प्रेक्षकांसमवेत पाहिलेलं आहात. कालचा प्रसंग पहायला प्रेक्षक तुम्ही एकटेच होतात. प्रसंग रंगभूमीवर घडत नव्हता, आपल्या घरात, आपल्या झोपण्याच्या खोलीत घडत होता. वेळ दुपारची होती. वायुमान पावसाळी होते. खोलीत अर्धवट अंधेर होता. मी पलंगावर होते. अंथरुण विस्कटलेले होते. कपडे जाग्यावर नव्हते. नंदननं मला घट्ट मिठीत घेतलं होतं. सर्वांगानं त्याचा स्पर्श मला होत होता. त्या स्पर्शाशी मी एकरूप होऊन गेले होते. मी तुम्हाला विसरले होते. जगाला विसरले होते. माझं लग्न झालं आहे हेही मी विसरले होते. रंगभूमीवर जे शेकडो वेळा घडलं, ते आता एकांतात घडत होतं. थोडं जास्तच घडत होतं. त्या एकांताची मला धुंदी चढली होती. मला

अनुक्रमणिका

कशाचं भान नव्हतं. माझं विशेष काही चुकत आहे असंहि मला वाटत नव्हतं. माझी जाणीव हरपली होती. तेवढ्यात तुमचे कडाडल्यासारखे शब्द माझ्या कानावर आले,

"राधिका, काय पाहतो आहे मी हे ?"

तुम्ही दाराच्या चौकटीत खिळल्यासारखे उभे होतात. तुमचा चेहेरा पांढरा पडला होता. तुमचा स्वरहि घोगरा होता, कापरा होता. आणि वेदनेने, आकांताने भरलेल्या स्वरात तुम्ही मला विचारीत होतात—

"राधिके, हे तू कां केलंस ? मी तुला शिकवलं, स्वातंत्र्य दिलं. तुझ्या गुणांची ओळख मी तुला करून दिली. जगासमोर मी तुला आणलं. नवरा असून मी तुझ्याशी मित्रासारखा वागलो. तर मग तू हे कां म्हणून केलंस ? कां तू मला फसवलंस ? मी कुठे कमी पडलो ? कुठे चुकलं माझं ?"

मला बोलायला शब्द सापडत नव्हते. दगडी पुतळ्यासारखी मी जिथे होते तिथेच पडले होते. नंदननं पुढे होऊन काहीतरी बोलण्याचा प्रयत्न केला, पण तुम्ही त्याला ढकलून दिलत. नंदन उघड्या दारातून निसटला. मला तुम्ही बसतं केलत, आणि माझे खांदे हलवीत दात-ओठ खाऊन तुम्ही मला विचारीत राहिलात—

"सांग, हे तू कां केलंस ? कां म्हणून तू मला फसविलंस ? कुठे चुकलं माझं ?"

माझी जीभ कोरडी पडली होती. शरीराला कापरं भरलं होतं. तुम्हाला उत्तर द्रेण्याच्या अवस्थेत तेव्हा मी नव्हते. मला तुम्ही तोंड काळं करून निघून जायला सागत होतात. तेच ते शब्द पुन्हा पुन्हा उच्चारीत होतात. तेव्हाच केव्हा तरी मला अंधेरी आली. एखाद्या चिरगुटासारखी अंगाची घडी होऊन पुन्हा मी बिछान्यावर पडले. मी शुद्धीवर आले, तेव्हा खोलीत मी एकटीच होते. पण मी एकटी आहे असं मला वाटत नव्हतं. मला वाटत होतं की, तुमचे शब्द अजून त्या खोलीत घोंगावताहेत. संतापाच्या, दुःखाच्या स्वरात पुन्हा पुन्हा तुम्ही मला विचारता आहात, "हे तू कां केलंस? कुठे चुकलं माझं ?"

तुमचं कुठे चुकलं, आणि मी कां चुकले ते मी तुम्हाला घर सोडून जाण्यापूर्वी सांगण्याचा प्रयत्न करते. एवढं तुमचं देणं मी लागतेच. तसं म्हणाल तर तुमचं पुष्कळच देणं मी लागते. आज मी जी काही बरी आणि वाईट आहे, ती तुमच्यामुळेच आहे. होय, बरी असेन तर तुमच्यामुळे आहे आणि वाईट असेन तरी सुद्धा तुमच्यामुळेच आहे. तुमच्यामुळेच मला नावलौकीक मिळाला. आणि आता माझा दुर्लौकिक होणार असेल, तर तोहि तुमच्यामुळेच होणार आहे. तुम्हीच मला घडविलत. एका वाटेनं नेलत. माझ्या यशाचे धनी तुम्ही असाल तर अपेशाचे धनीहि तुम्हीच आहात. माझ्या बऱ्यावाईटाचं आणि पापपुण्याचं दायित्व तुम्हालाच घेतलं पाहिजे. होय, वाईटाचं आणि पापाचंहि घेतलं पाहिजे. पापाचं अगदी प्रथम आणि पूर्णपणे घेतलं पाहिजे. कारण मला वेगळं वळण देणारे आणि वेगळ्या वाटेनं नेणारे तुम्हीच आहात. एरव्ही मी कोकणातल्या एका निर्धन भिक्षुकाची खेडवळ मुलगी. आमच्या घराणले सगळे संस्कार जुने. आमचं गावहि अद्याप फारसे पालटलेलं नाही. मुंबईच्या सुधारणा तिथे झिरपत यायला वर्षच्या वर्षं जावी लागतील. ओठ रंगवणं आणि पाटपोठ उघडं टाकणं अजून तिथे कुणाला ठाऊक नाही. मी मॅट्रिक नापास होईपर्यंत शिकू शकले, एवढाच माझ्या वडिलांनी पालटणाऱ्या कालमानाला दिलेला करभार. गोल नेसणं मला लग्न होईपर्यंत ठाऊक नव्हतं. पुरुषात मिसळणं ठाऊक नव्हतं. धीटपणानं वागणं-बोलणं ठाऊक नव्हतं. मी फार संकोची होते. माझ्यापाशी शिक्षण नव्हतं. तरी तुम्ही माझ्यावर भाळलात. कुठल्यातरी नाटक-संचाबरोबर तुम्ही आमच्या गावी आला होतात. आमच्या शेजारी देवळात उतरला होतात. मला तुम्ही पाहिलत. मला आरती म्हणताना ऐकलत. माझा गळा तुम्हाला आवडला. माझं रूप तुम्हाला आवडलं. तुम्ही दुहेरी पदवीधर, घरचे सुखवस्तु, विद्वान लेखक, एक दोन नाटकं तुम्ही लिहिलेली. (ती नाटकं भाषांतरित आहेत, आणि तुम्ही फारसे चांगले लेखक नाही, असं पुढे मी लोकाना बोलताना ऐकलं) तुम्ही मला मागणी घालावी, आणि माझ्याशी लग्न करावं ही गोष्ट खरी वाटण्यासारखी नव्हती. पण ती गोष्ट घडली. माझं एकोणीस वर्षांवर गेलेलं वय, कमी शिक्षण आणि घरचं दारिद्र्य लक्षात घेऊन तुमचा नाटकांचा नाद माझ्या बाबानी पचविला. पण लग्न झाल्यावर केवळ वर्षभरात तुम्ही मला प्रत्यक्ष नाटकात उभी कराल, असं मात्र माझ्या आईबाबांच्या स्वप्नातसुद्धा नव्हतं. पण तेच तुम्ही केलत. प्रथम तुम्ही मला मॅट्रीक केलीत. मग इंटरची पुस्तकं माझ्या हातात दिलीत. आणि हळू हळू तुम्ही मला रंगभूमीवर ढकललीत. ढकललीन, असेच मी म्हणते. कारण नाटकातून काम करण्याची माझी मुळीच इच्छा नव्हती. माझ्या संसारात मी सुखी होते. रांधावं–वाढावं, विणावं-टिपावं, घर सजवावं आणि तुमच्याबरोबर आनंदात जन्म काढावा, एवढीच माझी महत्वाकांक्षा होती. पण माझ्या विषयातली तुमची महत्वाकांक्षा वेगळी होती. मी रंगभूमीवर गावं, नटी म्हणून मोठं नाव करावं असं तुम्हाला वाटत होतं. माझ्यासारखं रूप, स्वर आणि बुद्धीमत्ता असलेल्या स्त्रीनं केवळ घरात कोंडून राहणं म्हणजे परमेश्वराने दिलेल्या रूपगुणांचा उपमर्द करण्यासारखं आहे अशी तुमची भावना होती. तुमच्या ह्या भावनेशी मी मुळीच सहमत नव्हते. तोंडाला रंग फासून नाटकातून नाचणं मला मुळीच रुचत नव्हतं. माझ्या सद्गुणांचा हा असा बाजार मांडणं हे माझ्या संस्कारांशी सर्वस्वी विसंगत होते. तसं मी म्हणाले सुद्धा. तेव्हा तुम्ही तुमच्या मवाळ पद्धतीनं माझी निर्भत्सना केलीत. मी मागासलेली आहे म्हणालात. मला महत्वाकांक्षा नाही म्हणालात. माझ्याशी फुरंगटल्यासारखे वागू लागलात. तरीहि मी तुमचं ऐकलं नाही. तेव्हा तुम्ही उशीरा घरी येऊ लागलात. "उशीर कां केलात ?" म्हणून विचारलं, तर सांगू लागलात की, "ज्यांची आणि माझी आवडनिवड सारखी आहे अशा माणसांच्या सहवासात मी होतो." तुमच्यासारखी आवड असलेले काही नाटकी स्त्री-पुरुष मी पाहिले होते. ते मला आवडले नव्हते. विशेषतः बायका ! त्या बायकांच्या

बरोबर तर तुम्ही वेळ घालवत नसाल ना, ह्या शंकेनं माझा थरकाप झाला. इथे मी वाकले. माघार घेतली. तसे तुम्ही चांगले होतात. पण तुमच्या कल्पना फार वेगळ्या होत्या. त्या कल्पनानाच तुम्ही "उदार कल्पना" म्हणत होतात. ह्या उदार कल्पनांपायीच एखादी नाटकी बाई तुम्हाला फशी पाडील असं भय मला वाटत होतं. त्या भयामुळे शेवटी मी तुमचं म्हणणं मान्य केलं. मी नाटकात काम करू लागले. बरेच दिवस नाटकात काम करणं मला फार जड वाटत होतं. माझ्या भूमिकेशी मला एकरूप होता येत नव्हतं. परपुरुपाला स्पर्श करताना किंवा त्याला स्पर्श करू देताना मला अगदी कससंच वाटत होतं. मी थिजून जात होते. जशी काही लाकडाची होत होते. मला स्पर्श करणं हा केवळ तुमचाच अधिकार आहे असे मला वाटत होतं. परपुरुपानं मला निकटचा स्पर्श करणं हे पाप आहे, माझ्या पत्नीपदाची ती अप्रतिष्ठा आहे, अशी माझी प्रामाणिक भावना होती. पण ह्या विषयात तुमच्या कल्पना वेगळ्या होत्या. नाटकात सुद्धा परका पुरुप जवळ आला की, मी गांगरून जात होते. अंग चोरत होते. त्याला टाळत होते. असं मी केलं रे केलं की, तुम्ही माझ्यावर भयंकर चिडत होतात. चार लोकांच्या देखत माझ्यावर संकेतून म्हणत होतात, "अग तो कुणी वाघ का आहे ? मार त्याला मिठी ! चांगली घट्ट मिठी मार ! काही तेवढ्यामुळे तुझ्या पातिव्रत्याला वट्टा लागायचा नाही ! मला मारतेस तश्शी मिठी त्याला मार!"

"प्रेम म्हणतात ते हे"चा अभ्यास चालू असताना तुम्ही मला हे सांगितलत. तुमचे ते शब्द ऐकून माझ्या डोळ्यात पाणी आलं. तुमचं ते बोलणं मला अगदी अभद्र वाटलं. प्रत्यक्ष माझा नवरा मला दुसऱ्या पुरुपाला घट्ट मिठी मारायला सांगत होता—जशी मिठी मी त्याना मारत होते, तशी मिठी ! हे कसं शक्य होतं ? वायको नवऱ्याला जशी मिठी मारेल, तशी मिठी ती परक्या पुरुपाला कशी मारू शकेल ? मग परका पुरुप आणि नवरा ह्यात भेद कुठे राहिला ? नवरा तो नवरा आणि परपुरुप तो परपुरुप ! वायकोने नवऱ्याला ज्या प्रकारचा स्पर्श करावा, तसा स्पर्श ती कुणा भलत्या पुरुपाला कसा करील ? पण तेच करायला तुम्ही मला सांगत होतात. माझा प्रत्यक्ष नवरा परपुरुपाला चार लोकांदेखत घट्ट मिठी मारायला सांगत होता. तुमचे ते शब्द मी ऐकले आणि मला भयंकर रडू कोसळलं. त्या दिवशीचा अभ्यास तिथेच थांबला. मग तुम्ही मला समजुतीच्या गोष्टी सांगू लागलात, "अग, तो तुझा नाटकातला प्रियकर आहे समजलीस !" तुम्ही म्हणालात, "त्याला मिठी मारल्यामुळे तो तुझा खरोखरीचा नवरा का होणार आहे ? पण नाटक म्हटलं म्हणजे आपल्या भूमिकेशी अगदी एकरूप झालं पाहिजे. आपण पाहतो आहे ते नाटक आहे, असे लोकाना वाटता कामा नये ! ह्या नाटकात प्रथमच तुला नायिकेची मुख्य भूमिका मिळते आहे. तिचं तू चीज करून दाखविलं पाहिजेस ! मला आणि तुला मान खाली घालावी लागेल असं पुन्हा तू वागू नकोस ! लेखक-दिग्दर्शकाच्या वायकोला शोभेल असा मनमोकळा अभिनय तुला




अनुक्रमणिका

केला पाहिजे ! मोठ्या खटपटीनं नायिकेची भूमिका मी तुझ्यासाठी मिळविली आहे !"

तुमचं बोलणं ऐकून हसाव का रडावं ते मला कळत नव्हतं. मी एका परक्या पुरुषाला नवऱ्याला मारावी तशी मिठी मारत नव्हते, त्यामुळे तुम्हाला तुमची आणि माझी मान खाली गेल्यासारखी वाटत होती. आजवर मी तुमच्यासाठी पुष्कळच तडजोड केली होती. नाटकातून काम करण्याचं मी प्रथम मान्य केलं, तेव्हाच मी तुम्हाला सांगितलं होतं की, ज्यात पुरुषाशी लगट करावी लागेल, अशी कामं मी करणार नाही. त्याला तेव्हा तुम्ही "हो" म्हणाला होतात. पण पुढे तुम्ही म्हणू लागलात की, "करीअर बिल्ड करायचं म्हणजे मिळतील ती कामं केली पाहिजेत, वेगवेगळ्या प्रकारची कामं केली पाहिजेत. इथे जुनाट कल्पना उराशी बाळगून चालण्यासारखं नाही" आणि हे मला सांगूनच तुम्ही मला अण्णा पोतदारांच्या कुशीत ढकललीत. अण्णा प्रख्यात नट होते. अर्ध्या वयाचे होते. "भावबंधनात"लं त्यांचं धुंडिराजाचं काम अगदी हातखंडा होतं. त्यांच्याबरोबर त्यांच्या मुलीचं—"मालती"चं काम करण्याची संधि मिळणं हा मोठा सुयोग आहे, असं तुम्ही म्हणत होतात. मला मात्र तो मुळीच सुयोग वाटत नाही. "बाळे-बाळे" म्हणून अण्णा मला ज्या पद्धतीनं पोटाशी घेत, ती पद्धत मला मुळीच आवडत नव्हती. मी अंग चोरत होते. पोतदारांच्या कुशीत आवेगानं शिरत नव्हते. ह्याचीहि तुम्हाला चीड आली. तुम्ही मला म्हणालात, "अग ! अण्णा तुझ्या बापाच्या वयाचे आहेत ! तुझ्या बापाचीच भूमिका ते करताहेत ! त्यांचासुद्धा तू संकोच बाळगणार ? कुठलं रोगट मन ग तुझं !"

पण रोगट मन माझं नव्हतं, अण्णांचं होतं. त्यांचा स्पर्श हा बापाचा स्पर्श नव्हता, पुरुषाचा स्पर्श होता. त्या स्पर्शाची जात मला कळत होती, तुम्हाला ती कळण्यासारखी नव्हती. "मुली-मुली" म्हणून कुठल्याहि तरुण बाईच्या गालावरून हात फिरवायची एरव्हीसुद्धा अण्णाना सवय होती. त्या प्रौढ माणसाचा हा एक रोग होता. म्हणून त्यांचा तो वखवखलेला, म्हातारा स्पर्श मला अगदी नकोसा वाटे. मी तुम्हाला हे सारं समजावून सांगण्याचा प्रयत्न केला, पण तुम्हाला ते समजलं नाही. "नाटकात काम करायचे तर पातिव्रत्याच्या इतक्या तकलादू कल्पना कामाच्या नाहीत." असं वर तुम्हीच मला म्हणालात, आणि अण्णांच्या कुशीत स्वतःला झोकून द्यायला मला भाग पाडलत. अण्णांचा तो स्पर्श मी पचवला तेव्हा मी पुष्कळच गोष्टी पचवून बसले. काय काय पचवलं हे तुम्हाला समजायचं नाही. असं समजा की मी, एक प्रकारचं विष पचवलं. ते विष मला आतल्या आत खात राहिले. अण्णांच्या त्या भुकेल्या स्पर्शाचं पुढे पुढे मला विशेष काही वाटेनासं झालं. उलट त्याची एक प्रकारची मौज वाटू लागली. "बाळे-बाळे" म्हणून अण्णा पोतदार मला उमाळ्यानं पोटाशी घेत तेव्हा त्यांच्या डोळ्यात अश्रू येत. प्रेक्षकाना वाटे ते अश्रू वात्सल्याचे आहेत. पण ते अश्रू वात्सल्याचे नाहीत हे मला ठाऊक होते. अनावर बनलेल्या म्हाताऱ्या वासनेचे ते अश्रू होते. ती वासना

## वादळवेडी



वादळवेडी विस्मयकर ही—
दीर्घकुंतली जात् !

कधि वणव्याच्या मुकुटावरती तुरा होउनी फिरे
देवघरातिल होत केधवा मंद शांत फुलवात्.

कधी पतीस्तव सती होउनी सरणावरती चढे
कधि जारास्तव विश्व जाळुनी घुसते वनवासात्.

तीर्थरूप ही कधी वाहते अमल जान्हवीपरी
कधि खिडकीतुनि मांसल हिरव्या नजरेची बरसात्.

नागिण होउनि कुठे टाकते कालकुटाच्या चुळा
कुठे प्रगटतो हिच्याच देही ईश्वरतेचा हात्.

उषा होउनि कधी करितसे प्रतिभेची लावणी
कधि शालूसम नेसुनि बसते ही अवसेची रात्.

हसणे रुसणे कधी दाविते दवबिंदूंची कुळी
कधि खडकावर कठोरतेने करी लीलया मात्.

ही रसरंगित करी सुगंधित जीवन म्हणती ज्या
हीच ठेविते फुटकळ मरणे किनखापी बटव्यात्.

— कुसुमाग्रज

दुबळी होती आणि म्हणूनच अमर्याद होती. माझा स्पर्श होताच अण्णांचे डोळे भरून येत. ती अंगांची भूक रडत होती. त्यांचं शरीर रडत होतं. मला त्यांच्या त्या रडण्यामुळे आणि मिठीमुळे पुढे पुढे गुदगुल्या होऊ लागल्या. एखाद्या दीपज्योतीवर पतंगाने झेप टाकावी, तशी अण्णा माझ्यावर झेप टाकत. मी त्यांच्या मानेभोवती हात टाके. माझ्या त्या जवळच्या स्पर्शामुळे अण्णा बेभान होत. मीहि अण्णांचा तो क्षुधित स्पर्श पचवून टाकला. तो स्पर्श माझ्या चांगल्या ओळखीचा झाला.

त्या स्पर्शाविषयीची माझी नावड हळू हळू कमी झाली. पुढे त्या स्पर्शाचीहि मला मौज वाटू लागली. मी अण्णांसमवेत रंगून काम करू लागले. तुम्ही मला धन्यवाद दिलेत. माझे अभिनंदन केलेत. पण तुमचे अभिनंदन मिळविण्यापूर्वी माझ्या मनाची फार ओढाताण झाली. हळू हळू माझे मन मारून मी तुमचे धन्यवाद मिळविले. आणि त्या धन्यवादातूनच आजचे शिव्याशाप जन्माला आले. आजचा प्रसंग आकाराला आला. मी प्रतिकार करीतच होते आणि माझा प्रतिकार तुम्ही मोडून काढीतच होतात. माझ्या





अनुक्रमणिका

अनिच्छेवर तुमची इच्छा मात करीतच होती. आठवते तुम्हाला ? "मृच्छकटिकात" तुम्ही मला वसंतसेनेचे काम करायला लावलेत. चारुदत्ताचे काम वसंतकुमार करणार होता. वसंतकुमार हा कॉलेजात शिकणारा एक हौशी नट होता. तो उत्तम गाणारा होता आणि अतिशय देखणा होता. होय, तो तुमच्यापेक्षा उघड उघडच फार अधिक सुंदर होता. नाटकातसुद्धा त्याला आपला प्रियकर म्हणूं नये, त्याच्याशी शारीरिक सलगी करू नये, असे मला वाटत होते. ह्या वाटण्यालाहि कारण होते. माझे संस्कार आणि वळण हे एक कारण तर होतेच, पण वसंतकुमार मला पाहून वेडावल्यासारखा होतो हेहि मला दिसत होते. ओलेत्या अंगाने त्याच्या समोर उभे राहताना मला फार संकोच वाटत होता. त्याचा स्पर्श टाळलाच पाहिजे असे मला वाटत होते. माझ्या शरीराला त्याला स्पर्श करू देणे म्हणजे मी स्वतःला पळवून घेणे, तुम्हाला पळविणे, तुमच्याशी व पत्नीत्वाच्या माझ्या व्रताशी द्रोह करणे असे मला वाटत होते. पण तुम्हाला तसे वाटत नव्हते. वसंतकुमारला मी "मृच्छकटीक"च्या अभ्यासाच्या वेळी उगाच चुटपुटता स्पर्श करावा, ह्याचा तुम्हाला राग येत होता. "ऐशा ललना स्वये येऊनी, देती आलिंगन धावोनी, थोर भाग्य त्यांचे !" ह्या ओळीला शोभेल असे आलिंगन मी त्याला द्यावे असा तुमचा आग्रह होता. तुम्ही चिडून चिडून मला म्हणत होतात "अग, ह्यावेळी वसंतकुमार हाच तुझा प्रियकर आहे असं समज ! आपल्या भूमिकेशी एकरूप हो ! ह्या वेळी मी तुझा कुणी नव्हे, आणि तू माझी कुणी नव्हेस !" तुमचं ते बोलणं माझं काळीज कापत गेलं. पण तुमच्या हट्ट मला शेवटी पुरवावाच लागला. वसंतकुमारच्या त्या उतावीळ, नवशिक्या थरारणाऱ्या स्पर्शाला मी मुकाट सामोरी झाले. अण्णा पोतदारांपेक्षा हा स्पर्श वेगळा होता. वसंतकुमारच्या स्पर्शात तारुण्याचा आवेग होता, उसळी होती, नवथरपणा होता. वसंतकुमारच्या देहाला एक प्रकारचा सुगंध होता. त्याचा तो स्पर्शहि सुगंधित होता, तारुण्याने रसरसलेला होता. तुमच्यापेक्षा वसंतकुमार अधिक तरुण होता. त्याचा स्पर्श हा उमलत्या तारुण्याचा स्पर्श होता. त्याच्या स्पर्शाच्या मानाने तुमचा स्पर्श अधिक थंड होता, शिळा होता, दुबळाहि होता. नकळतच ही तुलना माझे मन करून गेले. तुलना करण्याचेहि तसे काही कारण नव्हते. स्पर्शास्पर्शातले अंतर माझ्या शरीराला आपोआप कळतच होते. झऱ्याचे पाणी, तळ्याचे पाणी आणि नळाचे पाणी ह्यातले अंतर अपापतः माणसाला जाणवतेच. प्रत्येक पाण्याची जात वेगळी, चव वेगळी. प्रत्येक स्पर्शाचा अनुभव वेगळा. निकट स्पर्शांचे हे वेगवेगळे अनुभव मी घेत होते. नकळतच त्या स्पर्शाची प्रतवारी माझ्या मनात पडत होती. अण्णांचा स्पर्श मी पचविला होता. वसंतकुमारचा स्पर्श मी भोगत होते. असे कितीकांचे स्पर्श मी अनुभविले.

**केशवसुत :** आधुनिक काव्यदर्शन




**रुष्ट सुंदरीस :** नादी लावुनि वेडा केले मजला तू सुंदरी
रुष्ट कशी होऊनी बैसशी आता माझ्यावरी ?

विनोदाचार्य चंदावरकरांचा हडकुळा स्पर्श, गोवर्धनबुवांचा जड स्पर्श, मास्टर गणपतचा राकट स्पर्श, संगीतरत्न सरवटेचांचा मांसल स्पर्श ! कुणी मला वहीण म्हणून स्पर्श केला, कुणी प्रियकरीण म्हणून स्पर्श केला. आणि कुणी पत्नी म्हणून स्पर्श केला. पण एकजात ते सारे पुरुषांचे स्पर्श होते. परपुरुषांचे स्पर्श होते. त्या स्पर्शांनी हळू हळू माझ्या तीव्र संवेदना मारल्या. माझे मन बधिर करून सोडले. मला केवळ तुमचाच स्पर्श झाला पाहिजे हा माझा आग्रह संपला. तो आग्रह तुम्हीच संपविलात. एकीकडे माझी स्पर्शभावना मृतप्राय झाली आणि दुसरीकडे तिला विलक्षण धार आली. वेगवेगळ्या स्पर्शांची चटक मला लागली. त्या स्पर्शांनी माझ्या वृत्ती बोथट करून टाकल्या. त्या स्पर्शांनी आणि स्पर्शासमवेतच उच्चारल्या जाणाऱ्या शब्दांनी वेगवेगळ्या नाटकात मी पुन्हा पुन्हा उच्चारलेली वाक्यं आठवतात तुम्हाला ? "राजसा, माझं शरीर तुझं आहे, माझं मन तुझं आहे !" एका नाटकात मी नायकाला उद्देशून म्हणत होते– "ये, तुझी कुचवल्ली माझ्या शरीराला टोचून मला शिक्षा कर !" दुसऱ्या एका नाटकातला नायक मला छातीशी धरून म्हणत होता, "माझ्या रंगमहालात बळाने एखाद्या फुलासारखी तुला कुस्करीन तेव्हाच ही भडकणारी आग शांत होईल !" तिसऱ्या नाटकातला खलपुरुष माझ्या शरीराशी झोंबत किंचळत होता. ही शेकडो वेळा उच्चारली जाणारी वाक्येहि माझ्या मनावर काही परिणाम करीत होती. ती वाक्यं माझे मन मारीत होती, माझी संवेदना मारीत होती. मला बोथट बनवीत होती, बधिर बनवीत होती. एरव्ही लग्न झालेली कुठली संभावित स्त्री "माझ्या रंगमहालात बळाने एखाद्या फुलासारखी तुला कुस्करीन !" हे वाक्य मुकाट सहन करती ? ज्यांच्यापायी रक्तपात व्हावेत, स्त्रीचे मन भडकून उठावे असे हे वाक्य आहे. पण हे मी "नाटकातले वाक्य" म्हणून पचवायला शिकले. "तुझी कुचवल्ली माझ्या शरीराला टोचून मला शिक्षा कर." हे वाक्यही मी असेच पचनी पाडले. नाटकाच्या अभ्यासाच्या वेळी हे वाक्य जेव्हा मी प्रथम ऐकले तेव्हा माझी कानशिले तापून गेली. हे वाक्य उच्चारताना नायकाचे काम करणारा नट माझ्याकडे

[पृष्ठ १९४ पहा]


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# काळोख

काळोखाच्या बुरुजा—बुरुजावर पहारा करणारे प्रकाशाचे ते प्रतिनिधी पाहून त्यांचे मन एकदम हलके झाले. त्याना वाटले विश्वशक्तीसारखा दुसरा मांत्रिक नाही. या चांदण्या हे त्या मांत्रिकाने मंतरलेले तांदूळ आहेत.... !

—वि. स. खांडेकर



आजोबा आपल्या खोलीत तळमळत पडले होते. सारखे या कुशीवरून त्या कुशीवर होत होते. संध्याकाळी डॉक्टरानी त्यांच्या शिरेत कसले औषध टोचले होते कोण जाणे ! पण तेव्हापासून त्यांच्या साऱ्या वेदना झोपी गेल्या होत्या.

पण आजोबाना मात्र काही केल्या झोप येत नव्हती. त्याना तपासताना डॉक्टरांच्या डोळ्यात नेहमी जाईजुईची फुले उमलायची. पण आज त्यांच्या दृष्टीत त्या फुलांचा निर्माल्य तेवढा दिसला. असे कां व्हावे? डांक्टरांच्या घरी कुणी फार आजारी तर नाही ना? का, ज्या बँकेत त्यानी आपले सारे पैसे ठेवले होते, ती बुडाल्याची बातमी आली आहे? छे ! आपल्या प्रकृतीविषयी वाटणाऱ्या काळजीची सावलीच त्यांच्या डोळ्यात प्रतिबिंबित झाली असावी!

औषध टोचून डॉक्टर खोलीबाहेर गेले. अंगणात भाऊशी ते काहीतरी कुजबुजत होते. दूध घेताना भाऊला आपण विचारले. तो तुटकपणे उत्तरला, “तसं काही काळजी करण्यासारखं नाही असं म्हणत होते ते!”

छे! भाऊ खरं बोलत नव्हता ! त्याचा स्वरच ते सांगत होता. तो खरे बोलत असता तर भिंतीवरल्या आईच्या फोटोकडे पहात तो कशाला उभा राहिला असता? त्याच्या बोलण्याचा खरा अर्थ निराळा होता. त्याला म्हणायचे होते. डॉक्टराना आता तुमचा भरवसा वाटत

अनुक्रमणिका








नाही. तुमची प्रकृति फार बिघडली आहे. तुम्ही मृत्यूच्या दारात–"

आजोबांचे सारे अंग शहारले. जणु त्या अनादी, अनंत महाद्वाराच्या फटीतून अज्ञानातल्या चावऱ्या वाऱ्याची लहर त्यांच्यापर्यंत येऊन पोचली होती! त्याना वाटले, लहानपणी अपरात्री जाग आली, काळोखाच्या समुद्रात आपण बुडत आहोत असे भय वाटू लागले की, आपण पटकन् आईच्या कुशीत शिरत असू. झोपेतच ती आपल्याला जवळ ओढी. आणि आपल्या पाठीवरून हात फिरवी. त्या स्पर्शाने काळोखाच्या त्या समुद्रात जिकडे तिकडे दीपगृहे उजळत!

आजोबानी डोळे उघडून पाहिले, प्रकाशाचा पुसट थेंबसुद्धा कुठे ओघळत असलेला दिसत नव्हता. ते सुरक्षित बालपण काळाच्या लोंढ्यात कधीच वाहून गेले होते. पावसाच्या पाण्यात सोडलेल्या कागदी होडीसारखे! त्यानी एक मोठा सुस्कारा सोडला. त्यांच्या मनात आले, कोमेजलेल्या फुलाचा सुगंध त्याला कधी परत मिळाला आहे का?

ते अत्यंत अस्वस्थ झाले. कसेबसे अंथरुणावर उठून बसले. उशाजवळचा दिवा लावला त्यानी. समोरच्या भिंतीवरला पत्नीचा फोटो त्याना अंधुक अंधुक दिसू लागला. ते स्वतःशीच म्हणत होते, "यशोदेला जाऊन किती वर्षे झाली? सात का आठ? ती आपल्याहून आठवर्षांनी लहान होती. पण आठ वर्षे आधी गेली ती ! ती काय हौसेने गेली? छे! तिला जावेच लागले, तसंच आता आपणाला–"

डॉक्टरांचे ते संध्याकाळचे डोळे, इतके निर्जीव का दिसत होते? सशाला शिकारी कुत्र्याचा वास कळतो! तशी डाक्टराना मृत्यूची चाहूल इतरांपेक्षा आधी ऐकू येत असेल काय? आजची रात्र हीच आपली शेवटची रात्र असली तर ? या खोलीच्या बाहेर मृत्यू गालातल्या गालात हसत उभा असेल ! साहेबाच्या खोलीच्या दारावाहेर चपराशी उभा असतो तसा! घंटा वाजली की, तो चपराशी हळूच दार उघडतो. मांजराच्या पावलानी आत येतो. तिथे साहेब घंटा वाजवितो. इथे चपराश्याने घंटा वाजवली की, साहेबाने मुकाट्याने खोलीबाहेर आले पाहिजे!

ही कल्पना मनात येताच मोठ्याने ओरडून कुणाला तरी हाक मारावी असे त्याना वाटले. पण त्यांच्या कंठातून शब्दच बाहेर फुटेना!

एकदम शेजारच्या खोलीतून एक हुंदका ऐकू आला. मग कुणीतरी लाडिकपणाने बोलत आहे असा भास झाला, आजोबा जिवाचे कान करून ऐकू लागले.

शेजारची खोली मुलांची होती. त्यांची थोरली नात नंदा आणि धाकटा नातू मिलिंद तिथे झोपत असत. मधले दोघे नातू शिकायला बाहेर गावी होते. नंदाचा नुकताच साखरपुडा झाला होता. ती यावेळी गुलाबी स्वप्नात गुंग असेल. अशी अपरात्री उठून ती कशाला हुंदके देत बसेल? मग आपण ऐकला तो हुंदका कुणाचा? का आपणच आतल्या आत रडत होतो? आणि त्या रडण्याचा प्रतिध्वनी—

शजारच्या खोलीतून नंदाचा आवाज स्पष्ट ऐकू येत होता. "हं! झोप आता नीट? आमचा मिलिंद मोठा शहाणा आहे हं!"

मिलिंद मुसमुसत म्हणाला, "मी नाही शाळेत जाणार सकाळी. मी नाही–"

"खुळा कुठला! उद्या पाटी पूजन आहे तुझं. मोठ्या मोरावर बसलेली सरस्वती काढून देणार आहे मी तुला. सारी मुलं कशी टकमक टकमक बघत रहातील."

"मी नाही जाणार. भय वाटतं मला मास्तरांचं."

"भय? वेडा रे वेडा! तो समोरचा उमेश बघ; तो शेजारचा रमेश बघ; कसे हसत जातात शाळेला. कित्ती कित्ती वर्षं मी सुद्धा जात होते शाळेत. पण एक दिवससुद्धा मास्तरांचं भय वाटलं नाही मला. फार फार चांगले असतात हो मास्तर!"

"खरं?"

"अगदी खरं."

"गळ्या शप्पत?"

"अगदी शप्पथ."

नंदाच्या बोलण्याने मिलिंदाचे समाधान झाले असावे. तो बोलायचा थांबला. नंदा एक गाणे गुणगुणू लागली. चित्रपटातले लोकप्रिय प्रेमगीत असावे ते. अंगाईगीतासारखा ती त्याचा उपयोग करीत होती!

आजोबानी उशाजवळचा दिवा मालवला. अंथरुणावर अंग टाकले. पण संध्याकाळपासून त्यांची पाठ पुरवणारी अनामिक भीति काही केल्या त्याना सोडीना! पूर्वी त्याना गीतेचा दुसरा अध्याय पाठ येत असे. ते त्यातले श्लोक आठवू लागले. पण ते नीट आठवेनात. एका चरणाचा दुसऱ्या चरणाशी मेळ बसेना! मन स्थिर होईना. कुठल्या तरी घनदाट अरण्यातून आपण एकटेच जात आहोत, दोन्ही बाजूना मोठमोठ्या गुहा पसरल्या आहेत आणि प्रत्येक गुहेतून हिंस्र श्वापदाचे गुरगुरणे आपल्या कानी पडत आहे असे त्याना वाटू लागले.

ते पुन्हा अंथरुणावर उठून बसले. त्याच क्षणी कुठेतरी पावले वाजल्यासारखी वाटली त्याना. त्यानी कानोसा घेतला. अंगणातच वाजत होती ती. ऐन मध्यरात्री अंगणात कोण चोरबीर तर नसेल ना? त्याची छाती धडधडू लागली. पण सारे बळ एकवटून ते कसेबसे उठले. लटलटत्या पायानी ते दारापाशी गेले. दार उघडून कापऱ्या स्वराने त्यानी विचारले, "कोण आहे?"

अंगणात उभी असलेली आकृति झटकन् वळली–लगबगीने पुढे येत ती उद्गारली, "मी नंदा आहे, आजोबा." लगेच त्यांच्या जवळ येऊन ती म्हणाली "तुम्ही कशाला आलात बाहेर? तुम्हाला अंथरुणावरनं उठू द्यायचं नाही म्हणून सांगितलंय डॉक्टरानी!"

काही न बोलता तिच्या खांद्यावर भार टाकून आजोबा अंगणात आले. एवढ्या श्रमानेसुद्धा त्याना थकल्यासारखे झाले. तुळशीवृन्दावनाच्या कट्टयावर मटकन् बसले ते! नंदा भीत भीत त्यांच्याजवळ बसली. तिच्या पाठीवरून आपला वातड, खरबरीत हात फिरवीत ते म्हणाले, "ज्यांची लग्नं जमत नाहीत अशा पोरीना रात्री झोप येत नसेल पण साखरपुडा झालेल्या मुली अशा जागत बसलेल्या आम्ही नाही बोवा पाहिल्या कधी!

नंदा खाली मान घालून खुदकन् हसली.

आजोवानी विचारले, "वेडे, अंगणात कां फिरत होतीस अपरात्री?"

"झोप येईना आजोवा. थोडा डोळा लागला तो मिलिंद उठला. त्याला झोपवलं. पण मला मात्र—"

"काय होतंय तुला?"

"भय वाटतंय्."

"भय? कसलं भय?"

—क्षणभर थांबून नंदा म्हणाली, "सासरचं! तिथली माणसं कशी असतील? त्याना मी आवडेन की नाही? आवडले नाही तर–" थरथरत्या स्वराने तिने प्रश्न केला, "आजोवा, रागावणार नाहीना माझ्यावर तुम्ही? खरं सांगते. मधमाशांचं पोळं डिवचावं ना? तसं झालंय् माझं मन. उगीच भय वाटत रहातं! एखाद वेळी मनात येतं, कशाला हवं लग्न? जन्मभर आपलं माहेरच्या सावलीत रहावं!"

आजोवानी दोन्ही हातानी तिचं तोंड आपल्याकडे फिरविले. त्यांच्या हाताला ओलसर स्पर्श झाला! नंदाच्या डोळ्यात पाणी उभे राहिले आहे हे त्यांच्या लक्षात आले. पण ते आपल्याला कळलेच नाही असे दाखवीत ते म्हणाले, "वेडी कुठली! अग, हे घर म्हणजे तुझ्या आईचं सासरच आहे ना? पण आज इथं राज्य आहे ते तिचं! तुझी आजी आठवते ना तुला? तिचंही हे सासरच होतं. किती सुखी होती ती या घरात! वेडे पोरी, नदी समुद्राला मिळाली की, ती समुद्र होते! चल. उठ, डोळे पूस, नि सोनेरी स्वप्ने पाहत स्वस्थ झोप जा." क्षणभर थांबून ते जणु काही अर्धवट स्वतःशीच पुटपुटले, "माणसाच्या मनातली भुतं फार वाईट असतात ! कसलाही काळोख असो, त्याची सावली पडली की, ती जागी होतात."

त्यानी वर पाहिले. विशाल आकाश चारी दिशाना वाहूत कवळून उभे होते. विश्व-शक्तीच्या वरद हस्तासारखे ! आकाशभर चमकणाऱ्या चांदण्या त्यानी डोळे भरून पाहिल्या. काळोखाच्या बुरुजाबुरुजावर पहारा करणारे प्रकाशाचे ते प्रतिनिधि पाहून त्याचे मन एकदम हलकं झालं. त्याना वाटलं, विश्वशक्तीसारखा दुसरा मांत्रिक नाही. ह्या चांदण्या हे या मांत्रिकाने मंतरलेले तांदूळ आहेत.

आजोबाना त्यांच्या खोलीत पोचवून नंदा झोपायला गेली. हां हा म्हणता आजोबांचा डोळा लागला. त्याना एक स्वप्न पडू लागले. त्या स्वप्नात ते मास्तर झाले होते—फळ्यावर शब्द लिहित होते—शाळा—सासर—मृत्यु. हे शब्द लिहिता लिहिता वर्गाकडे वळून ते म्हणत होते, "शेवटच्या शब्दात जोडाक्षर आहे, पण तसा काही तो अवघड नाही लिहायला."

थोड्या वेळाने त्याना गाढ झोप लागली. आता ते प्रवासी झाले होते. कुठल्या तरी अज्ञात गावाला चालले होते. एकटेच. रस्त्याच्या दोन्ही बाजूना गर्द झाडी होती. झाडांच्या हलणाऱ्या सावल्या ढगांसारख्या दिसत होत्या. झाडीतले काजवे चांदण्यासारखे चमकत होते. चालता चालता त्या अनोळखी गावाची वेस आली. त्या वेशीतून कुणीतरी लगबगीन त्यांच्या स्वागताकरता पुढे आलं. ते आश्चर्याने उद्गारले, 'अरे, ही तर यशोदा!"

• • •

अनुक्रमणिका










तो भयाण अंधारात विजेसारख्या भेडसावणाऱ्या तिच्या भावनांचा मागोवा घेत होता. . .त्या स्त्रीला असं सोडून चालणार नव्हतं. तिला अद्दल घडविली पाहिजे, पश्चात्तापाने जळत ठेवली पाहिजे; प्रथम तिचं शरीर विटाळून, तिचा देह डागळून आणि नंतर........?



—अरविंद गोखले

डाव्या पायावर ऐटीत रेलून आणि उजव्या हाताने पर्सला झोके देत ती बसच्या रांगेजवळ उभी होती. ऑफीसची वेळ भरत आली होती आणि बस मिळण्यासाठी झिम्मड उडत होती. दोन दोन रांगा तयार होत होत्या, अधीरपणी पुढे सरकत होत्या. बस आली की, आत घुसायला कालवा करीत होत्या. ती मात्र ह्या सगळ्या गोंधळापासून अलिप्तपणे बाजूला उभी होती. तिला बस गाठायची नव्हती की, रांगेतल्या लोकांची गंमत पहायची नव्हती. समोरच्या घाईगोंधळाकडे पाठ फिरवून ती बाजूच्या रस्त्याच्या वळणाकडे वारंवार पाहात होती. वळणावर येऊ शकणारी त्याची आकृति एवढ्या गर्दीतून टिपण्या-साठी पवित्रा घेऊन उभी होती. वरकरणी निर्विकारपणे, पण अन्तर्यामी अनिवार अस्वस्थतेने.

समोरच्या उडिपीच्या उपहारगृहात एका कोपऱ्यातल्या टेबलाशी तो केव्हाच येऊन बसला होता. कपभर काळी कॉफी घोट घोट पीत आपलं काळीज अधिकच कडवट करू पाहात होता. त्या भोवतालच्या अंधेऱ्या, अस्वच्छ वातावरणात त्याची

गोरीपान नि टेरिलीनचे कपडे घातलेली मूर्ति विशोभित वाटत होती. टॅक्सी ड्रायव्हर, कामगार, वेकार माणसं तियं आधाशीपणाने इडली डोसा खात होती आणि तो कोपऱ्यात उपाशी मनाने स्वस्थ बसून होता. बस स्टॉपपासच्या तिच्या अस्वस्थ आकृतीची हरेक हालचाल डोळ्यात नि काळजात साठवीत होता. किंचित् कारुण्याने, बऱ्याचशा तिटकाऱ्याने—

वेळ जात होता व ती वाट पहात होती. अशा संकेत स्थळी ती त्याला काही प्रथमच भेटत नव्हती. ह्याच बसस्टॉपवर ती पूर्वी त्याला अनेकदा भेटली होती. पण इथे, आणि इतरत्रहि दरखेपेस तो वेळे-आधी येई व तिची वाट पाही. तिला ताटकळत कधीहि ठेवलं नव्हतं त्याने. आज तर तो केव्हापासून तिथे येऊन उभा असेल असं तिला वाटलं होतं. किती आर्जवा करून त्याने तिच्याकडून वाहेर यायचं कबूल करून घेतलं होतं. सारा दिवस एकत्र घालवायचं ठरवलं होतं. अगदी एकदाच, कदाचित् अखेरचंच ! ओढेवेढे घेत अखेर ती कबूल झाली होती. बहुधा शेवटचं म्हणून ! जरा उशीर करूनच आली होती. पण त्याचा पत्ता नव्हता. पंधरा मिनिटे, अर्धा तास, पाऊण तास गेला तरी तो उगवला नव्हता. तिला चमत्कार वाटला. इतर वेळेस ती कदाचित् तो नाही म्हणून परतली असती. पण आता ती त्याची तशीच वाट पहात राहिली.

तिला ताटकळत ठेवीत तो तिच्यासमोर काही अंतरावर अडून बसला होता. आपल्या हृदयातलं वैफल्य कुरवाळीत होता. काळजातला अंगार फुलवीत होता. ती अस्वस्थपणे, मान उंचावून व डाव्या पाया-वर भार देऊन वळणाकडे पाहात होती आणि तिला तसं बघताना पाहून त्याचं काळीज तुटत होतं. तिच्या ह्या वाट पहाण्यात, विरह सहन करण्यात प्रेमभावना असती तर त्याने क्षणाचा विलंब न लावता जवळ जाऊन तिला आलिंगन दिलं असतं. पण तसं काही नव्हतं, नाही, हे तिनेच सांगितलं होतं. नुसता स्नेह, निर्भर मैत्री ! तशी मैत्री त्याला नको होती. ती तोडण्यासाठीच त्याने ही भेट ठरवली होती. ती तोडण्यासाठी बळ येत नव्हतं म्हणून तो बसून होता.

पायाला कळ लागली तेव्हा ती बस स्टॉपपासून हालली. तो दिसत नाही म्हणून तिची व्याकुळता वाढली. तो अजिबात आलाच नाही तर ?... आजकाल ती अशी वागत होती की, त्याचा विरस व्हावा, त्याने माघार घ्यावी, मुक व्हावं...त्याच भीतीने आयत्या वेळी त्याने यायचा बेत रद्द केला तर नाही ? तिला वेड्यासारखं झालं. भिरभिरत ती सर्वत्र पाहू लागली. तो दिसावा म्हणून दिसेल त्या दिशेकडे नजर देऊ लागली.

तिने आपल्याला पाहिलं असं त्या उडिपीच्या अंधेऱ्या कोपऱ्यात त्याला वाटलं व तो दचकला. मागे सरला व मग पुढे सरसावला. तिने पाहिलं असलं तर ती रागावेल व पाठ फिरवेल. पाहिलं नसलं तरी आता कंटाळून निघून जाईल. ही फार खटपटीने जुळून आणलेली भेट टाळून चालणार नव्हतं. तिला गाठलं पाहिजे, अद्दल घडवली पाहिजे. काळीज भंगले म्हणजे काय होतं ते दाखवलं पाहिजे.

तो घाईने रस्ता ओलांडून बस स्टॉपशी आला. बसमधून उतर-णारा लोंढा दोघांच्या मधे आला. ती क्षणमात्र दिसेनाशी झाली व तेवढा क्षण त्याला असह्य वाटला. ताटातुटीची तयारी पूर्णपणे करूनहि वियोगाची कळ आली. तो चरकला. समोरच्या माणमाला बाजूला सारून तिच्यापुढे उभा राहिला.

ती दचकली. डावा पाय नावरीत उद्गारली, "बसने आलास–? मला वाटलं, आता तू येत नाहीस—"

काय उत्तर द्यावं ते त्याला एकदम सुचलं नाही. जाणाऱ्या बसच्या धडधडामुळे उत्तर देणंहि अशक्य होतं. बसच्या विरुद्ध दिशेने फुट-पाथवरून दोघंहि नकळत चालू लागले.

जराशाने ती पुन्हा म्हणाली, "मला वाटलं, आता तू येत नाहीस. किती उशीर...."

"परत जाणार होतीस ?"

"किती थांबावं, कळेना... असं कधी झालं नव्हतं..."

तिला थांबावं लागलं याबद्दल तिची क्षमा मागावी असं त्याला अजिबात वाटलं नाही. काही सबब सांगावी असंहि नाही. तो तुटक-पणे इतकेच म्हणाला, "असं कधी पुन्हा होणार नाही—"

तिने चमकून त्याच्याकडे बघितलं. तो स्पष्टपणे तसं बोलला हे उघड होतं. तिला ते बोचलं. वाटलं, रस्त्यात त्याचा हात धरून म्हणावं, 'रागावलात ? तुझं रागावणं मी समजू शकते. पण मी मात्र रागावले नव्हते हं ...' पण ती काहीच बोलली नाही.

वळण आलं तशी दोघं थबकले.

"कुठे जायचं ?" तिने विचारलं.

"तू म्हणशील तिथे—" त्याने तिच्या डोळ्याला डोळा देत म्हटलं.

"तू नेशील तिथे येते—" तिने पापणीसुद्धा लवू दिली नाही.

तो जरा चरकला. मान वळवून टॅक्सी दिसते का पाहू लागला. वाटलं, अजून सारं शक्य आहे. त्याशिवाय ती असं बोलायची नाही. अशी भान विसरून वाट पहायची नाही. अशी वाटेल तिथे, दिवसभर यायला तयार व्हायची नाही. एवढ्या विश्वासाने ती आपल्याबरोबर एकान्तात यावयास तयार झाली...अन् आपण उगाच वैफल्याच्या व बदला घेण्याच्या कल्पना घोळवीत बसलो. छे, ती आजकाल तुटकपणे वागते, वारंवार टाळते ते मनाची खात्री करून घेण्यासाठी. खरं म्हणजे आपल्यावरच....

त्याला टॅक्सी दिसत नव्हती आणि डाव्या पायावर भार देऊन ती त्याच्याकडे टक लावून पहात होती. आपण असं बोलायला नको, वागायला नको असं तिला एकदम वाटलं. चांगलं संपवीत आणलं होतं. समंजसपणे, सभ्यपणे. तो रागावला होता, निराश झाला होता, पण मग त्याने माघार घेतली होती. साधा स्नेह, औपचारिक ओळख उरली होती...अन् मग एकाएकी हे काय वादळ उठलं ? त्याने एकदा, कदाचित् अखेरचं म्हणून एक दिवस एकत्र काढायचं सुचविलं. अजीजीने, अटीतटीने. अन् त्याची ही धाडसी, धोकापूर्ण विनंति तिने अखेर मान्य केली होती. कशी झाली ती तयार ? कां ? स्वतःच्या मनाला त्याच्याबद्दल तिटकारा करायला शिकवल्यावर ? त्याच्या

अनुक्रमणिका





अनुक्रमणिका

परोपरीच्या प्रेमाकडे पाठ फिरविल्यावर ?– काय करून बसली हे ती ? कशासाठी जायचं त्याच्यावरोबर ?

बऱ्याच वेळाने एक टॅक्सी त्यांच्या पुढ्यात सहज येऊन थबकली. त्याने दार उघडलं व ती कशीबशी आत शिरली. तिच्या मागोमाग टॅक्सीत बसत त्याने दार लावून घेतलं. टॅक्सीला वेग येताच तिने हातातली पर्स उजव्या मांडीवर ठेवली. त्याने अभावितपणे आपला हात तिच्या डाव्या मांडीवर टेकला. टेकला आणि त्या मृदु, मांसल स्पर्शाच्या चटक्याने काढून घेतला.

तिने दचकून त्याच्याकडे चोरटा दृष्टीक्षेप टाकला. आपल्या शरीराची थरथर त्याला जाणवली तर नाहीं अशी शंका तिला चाटून गेली. तिने बघितलं हे त्याने हेरलं. हात काढून घेतल्याची त्याला शरम वाटली. वाटलं, पुढे सरून दुसऱ्या, उजव्या मांडीवरहि हात ठेवावा. तिला दिलासा द्यावा की तशीच, सर्वच्या सर्व तूं हवी आहेस...

टॅक्सी समुद्राच्या दिशेने ढगाळ वातावरणात जोरात धावू लागली आणि दोघांच्या मनात एकच विचार घुमत राहिला. त्या उजव्या, निर्जीव, थंडगार कृत्रिम पायामुळेच दोघांच्यात असा अंतराव निर्माण झाला? ती सुदृढ असती तर? त्यालाहि एखादं तितकंच भयानक व्यंग असतं तर?

...तिच्याशी ओळख होण्यापूर्वी त्याला तिच्या ह्या उणेपणाची माहिती नव्हती. तिच्या संबंधी फारशी काहीच माहिती नव्हती. नऊ दहा नारळींच्या झाडांच्या झुपक्यामागे आठ दहा बैठ्या घरांची वस्ती होती तिथल्या अखेरच्या बिऱ्हाडाच्या बाहेर ती बऱ्याचदा उभी असे. सकाळी तो त्या वस्तीला वळसा घालून कामावर जाई तेव्हा आपल्या लांबसडक केशसंभारातून जडपणे फणी फिरवीत, संध्याकाळी परतताना मान उंचावून टांगलेल्या पिंजऱ्यातल्या रंगीबेरंगी पक्षांशी खेळत, कधी सुट्टीत–अवेळी त्या वाटेने जावं तेव्हा खिडकीत पुस्तक वाचत अगर मोजे विणीत. प्रथम त्याने एक तरुण मुलगी म्हणून सहज तिच्याकडे पाहिलं. नंतर फिक्कट सौंदर्याची, लांब केसांची व काळया डोळ्यांची स्त्री म्हणून तो जाता येता दृष्टि टाकू लागला. तिच्या हालचालीत जडता व दृष्टीत स्थिरता आढळत गेल्यावर तो कुतुहलाने तिच्या दारावरून मुद्दाम रेंगाळत जाऊ लागला. मग तिचं दर्शन घेणं हे त्याचं अगत्याचं आन्हीक होऊन बसलं...

टॅक्सी वाट काढीत उपनगरातून बाहेर पडू लागली आणि तिला त्याची ओळख झाली तो प्रसंग उगाचच स्मरला...पडवीत टांगलेला पक्षांचा पिंजरा दुपारच्या रखरखीत शांततेत एका उनाड मुलाने उचलला व तो नारळांच्या दाटीतून लपत जाऊ लागला. अंबाड्यात फुलं माळीत ती बाहेर आली व पिंजरा नेताना बघून एकदम ओरडली. तिच्या आरडचाने कुणी धावून आलं नाही, पण तो चोर पिंजरा तसाच टाकून पळून गेला. त्याच सुमारास तो मॅटिनीला निघाला होता. अवकाश होता म्हणून सहजच, कदाचित् संवयीमुळे, तिच्या घरावरून चालला होता. ती पडवीत थरथरत उभी होती व पलीकडे पिंजऱ्यात पक्षी फडफडत होते—हे पाहून तो चमकला. थबकला. पिंजरा उचलून तिच्याकडे येत तो म्हणाला,

"तुमचाच ना? असा कसा फेकला गेला? जाळचासकट पाखरं उडाल्याच्या गोष्टीसारखा?"

"माझी ही पाखरं पळायची नाहीत...पिंजरा चोरत होता एक माणूस..."

"कुठंय?"

"गेला तो–"

ती अजून थरथरत होती. डाव्या पायावर रेलून, टांगलेल्या पिंजऱ्याकडे प्रेमार्द्र नजरेने पहात होती. पिंजरा उचलायला ती धावली कां नाही हे त्याला कळलं नाही. ती न बोलता नुसती उभी आहे हे पाहून तो म्हणाला,

"जातो मी–"

—ती भानावर आली व टॅक्सीबाहेरची नजर आत आणीत त्याला म्हणाली,

"गप्प कां?–बोल ना–खूप बोलायचंय म्हणाला होतास ना–"

"आज खूप बोलायचं ठरवलं होतं खरं. सगळं मनातलं मोकळं करून टाकायचं ठरवलं होतं–सगळी उजळणी. राग, अनुराग–"

"अनुराग–कसचा–रागच! रागावून घे खूप. हं कर सुरुवात–"

ती त्राग्याने बोलते आहे की, प्रेमाने हे त्याला कळेना. तिचं

केशवसुत : आधुनिक काव्यदर्शन !




आम्ही कोण ? आम्ही कोण म्हणून काय पुसता ? आम्ही असूं 'कोडग' ( मुलखाचे )








काहीच त्याला कळेनासं झालं होतं. किती जवळ आली होती ती–अन् मग कशी दूर चालली. त्याच्यावरील प्रेमाने, की त्याला कंटाळून? विचार करावा तो गुंता वाढतच होता. गुदमरलेल्या मनाला सावरण्यासाठी तो म्हणाला,

"सुरुवात आठवते आपल्या ओळखीची तुला?"

त्याच्या मनात तेच सुरुवातीचे क्षण घोळत आहेत ह्याचा तिला विस्मय वाटला—दोघांची हृदयं इतकी एका तालावर डुलतात? तसं असलं तर–पण तिने स्वतःला सावरलं व त्याच्या बोलण्याकडे ध्यान दिलं. तो आपल्या नादात भराभर पहिले पाढे उगाळीत होता. . .कधी तो त्या मार्गाने येता जाता पिंजऱ्याशी थांबत असे. पाखरांच्या किलकिलाटात व नारळांच्या झावळींच्या सोसाटचात दोघं बोलत उभी राहात. ती केस विंचरीत, फुलं माळीत, पुस्तकात खुणेचं बोट घालून ते चाळवीत, त्याच्यापुढे चहाचा पेला करीत. तो मात्र नेहमी पिंजऱ्यातल्या पक्षांशी खेळत. मग एकदा तिने त्याला बसण्यासाठी म्हणून पडवीत एक खुर्ची कायमची ठेवून दिली. तिथे तो वारंवार विसावू लागला. ती आत घरात असेल तेव्हा तिच्या आईशी, मावशीशी, आजीशी गप्पा मारू लागला. पुरुष नसलेल्या त्या घरात डोकावूहि लागला. . .

तिला वाटलं की, जितक्या थोडचा वेळात व थोडचा शब्दात त्याने सांगितलं तितक्या वेगाने ते दिवस गेले. मोजे विणत मशीनशी बसणाऱ्या त्या चार स्त्रियांच्या कुटुंबात, त्या निराधार वाटणाऱ्या चार भिंतीत, त्याच्या आगमनाने ओलावा आला. मावशीला, आई आजीला त्याचं येणं जाणं मान्य झालं. आजुबाजूचे सगळे पुरुष वाईट नजरेने पहायचे, अगर पाहायचेहि नाहीत; त्यात हा अनोळखी, श्रीमंत वाटणारा व उमदा दिसणारा तरुण एकदम उठून दिसला. तिच्या आयुष्यातली पोकळी भरून काढणारा ! ती कमी शिकलेली, काही न करणारी. पण त्याने तिला खूप सांगितलं, शिकवलं. आनंदी केलं. . .तो अनेक विषयावर बोले ते तिला आठवलं व आपल्या आयुष्याला दिशा दिल्याबद्दल कृतज्ञता दाटली. त्याच भावनावेगाने त्याने तिच्या हातावर हात ठेवला.

तिचा हात दाबीत त्याने म्हटले,

"मग प्रथम तू माझ्याबरोबर बाहेर आलीस. . .एक पाखरू एका पहाटे मेलेलं तुला आढळलं. तू त्याला पिंजऱ्यातून काढून मशीनखाली झाकून ठेवलंस. माझी वाट पहात बसलीस. मी येताच मला ते प्रेत दूर पुरायला सांगितलंस. मी तू चल म्हटलं तेव्हा दचकलीस नि टाळलंस. नंतर काय वाटलं तुला कोण जाणे, तू मागोमाग आलीस. एका खड्डचात आपण ते पिवळचा पिसांचं कलेवर टाकलं. मी माती लोटली, तू त्यावर डोईतला गजरा ठेवलास. हुंदका आल्याने तू लटपटलीस नि माझ्या खांद्याला टेकलीस. . ."

त्याच्या पंजातली तिची बोटं निर्जीव झाल्यासारखी वाटली.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्या पहिल्या सहलीत तिचं व्यंग उघडं पडलं होतं. त्याचा आधार घेण्यासाठी पुढे सरकताना ती पडत होती. व तिला सावरताना त्याचा हात तिच्या उजव्या मांडीवर गेला होता. साडीने वेढलेल्या त्या खोटया मांडीच्या जाणीवेनें तो दचकला होता. तिला ते आठवलं व टॅक्सी थांबवायला सांगून ती उठली.

"इथेच उतरायचं?"

"जरा चालू या–"

ती वारंवार चालण्याचा हट्ट घेई हे त्याला माहित होतं. ती ओठ घट्ट मिटत उठली व फूटपाथवरून चालूहि लागली. डौलाने, घाईने. त्याने टॅक्सीचे पैसे दिले व तो तिच्यामागे धावला. तिच्या पावलाकडे पाहात. सँडल्सकडे, साडीकडे. साडीतून डोकावणाऱ्या डाव्या व तशाच दिसणाऱ्या उजव्या पायाकडे.

...तिला आठवत होता त्याचा आश्चर्याचा उद्‌गार. "तुझा...तुझा एक पाय...तुला एक पाय नाही?" तो तिच्या पायाकड व तिच्या डोळ्याकडे एकाच वेळी पहात तन्हा म्हणाला होता.

पाखराच्या मृत्यूच्या शोकाला मूठमाती मिळाली. आपलं व्यंग ध्यानात येऊन तो दचकला. आता तो आपल्याकडे अनुकंपेने, कदाचित् तिटकाऱ्यानेहि पाहील. जे झपाट्याने फुलत आलं आहे ते असं अकाली कोमेजून जाईल. ती उरी फुटली व मग कडवटपणाने म्हणाली,

"हो–एक पाय नाही. अजिबात नाही. खुब्यापासून तोडला आहे. खूप वर्षं झाली...लाकडाचा कृत्रिम बसवला आहे...दाखवूं?" दाखवूं?"

तो मना करीत होता तरी तिने उजव्या बाजूच्या साडीचा घोळ वर केला व पोटरीपर्यंत उचलून, उजवा खोटा पाय दाखवला...

—तो तिच्या उजव्या अंगाने तिच्या तालावर चालू लागला. आपण तिच्याबरोबर कुठे व कां चाललो आहोत हे क्षणकाल त्याला कळेनासं झालं. इतक्या आर्जवा करून तिला इकडे आणलं कशासाठी? इथून कुठे न्यायचं तिला? कसा आपला बेत पार पडणार? वागायचं इतक्या विद्रुपपणे? इतकं भयानक...! तो शहारला की, तिच्याबद्दलचं प्रेम परत दाटावं म्हणून तिचा झुलता हात पकडू लागला.

त्याच्या राकट हाताने तिला आधार आला. सगळं विसरण्यासाठी ती स्वतःशी एकदम हसली. मग हातांच्या मिठीला मोठा झोका देत म्हणाली,

"आज तू तर आपल्या स्नेहाचा चित्रपट दाखविल्यासारखं सुरुवातीपासून कथन करू लागलास...काहीतरीच अखेर मात्र करू नकोस हं. अशीच अपुरी ठेव कहाणी..."

चित्रपटाचा तो करू पहाणारा शेवट त्याला स्मरला व तो थरकला. आपला डाव हिला समजला तर नाही?–पण

करायचा तसा शेवट? घडवायची अद्दल? तो नुसता हसल्यासारखं करून चालत राहिला. जवळून पावलं टाकीत चाललेला तिचा उजवा, लाकडी पाय जोराने वाजत आहे असं त्याला वाटू लागलं.

. . .त्या पायाने त्याच्या प्रेमात जरा देखील फरक पडला नव्हता. दुसऱ्या दिवशी तो नेहमीप्रमाणे तिला भेटायला गेला. पण ती झोपल्याचं आजीने सांगितलं, तिसऱ्या दिवशी ती कुठे बाहेर गेली होती. तीन चार दिवस तिने त्याला टाळलं. अगदी उघडपणे टाळलं. आणि मग सुट्टीच्या एका दुपारी तो आला तेव्हा पडवीतल्या खुर्चीवर खोटा पाय बाजूला ठेवून, ती मुद्दामच बसलेली त्याला दिसली.

"कधी झालं असं? अपघात? की आजार झाला काही?—" तो किंचित् कुतुहलाने व खूपशा काळजीने म्हणाला. गेले काही दिवस त्याला तिच्या व्यंगाबद्दल विस्मय वाटत होता. विस्मय, दुःख, अनुकंपा.

"सांगत्ये. तेवढ्यासाठी मुद्दाम अशी पायतुटकी होऊन बसले आहे. ही निशाणी बाजूला मिरवीत. . .खूप जण असं कुतुहल दाखवतात. दुःखाचं काही ऐकायला, दुसऱ्याचे क्लेश बघायला बरं वाटतं त्यांना. . .मग हळहळ व्यक्त करतात. अन् सावकाश सटकतात. टाळतात. तिटकारा करतात. . ."

ती उघड उघड कडवटपणे बोलत होती. इतरांवरचा राग त्याच्यावर काढीत होती. त्याला वाईट वाटलं. स्वतःची लाज वाटली. आपण टाळणार नाही. तिटकारा करणार नाही असं ओरडून सांगावसं वाटलं. खरोखरीच, तिच्याबद्दलचं त्याचं आकर्षण जराहि कमी झालं नव्हतं. तिचं रहस्य कळून त्याच्यावर कसलाच परिणाम झाला नव्हता. जणु तिचा एक पाय खोटा नव्हताच. जणु काही तिचा एकच पाय खरा आहे हे त्याला प्रथमपासून माहित होतं. . ."

—तो मृदुपणे म्हणाला, "बसू या आता. . .समुद्र आलाच. तिकडे वाळूत जायचं? . . .उगाच कुठे चालत राहातेस?"

ती थबकली. हळूहळू समुद्राला सामोरी जाऊ लागली. वाळूत पावलं टाकायला गंमत वाटत होती. दोन्ही पावलं टाकायला उजवा पाय खोटा असला तरी असा बेमालूम बसवला होता की, इतराना काय, तिलाहि कधी कधी त्याचा विसर पडे. साडी वेढल्यावर कुठला पाय कृत्रिम हे कुणालाहि सांगता येत नसे. मोजे सँडल्स घातलेली पावलं सारखी वाटतच, अन् दोन्ही पाय नैसर्गिक रित्या पडत. चालताना अडचण पडत नसे. भरभंर चालतानाहि.

एका मोठ्या शिलाखंडावर पाय सोडून ती बसली. तिच्या समोर तो मांडी घालून वाळूत रेघोट्या ओढीत बसला. दोघंहि मघापासून निरर्थक बडबड करीत होते. तिच्या मावशीच्या वर्तनाबर, त्याच्या बेपत्ता बापाबद्दल, तिच्या साडीच्या रंगाबद्दल, त्याच्या कपाळावरील खोकेसंबंधी, अन् दोघामध्ये तिचा लाकडी पाय झुलत आहे हे विसरायला बघत होते.

**ओढ**

**अंभोदानी गगन भरले सांवळे सांज भोळी**
**सृष्टी लाजे गवत–हिरवी लेउनी चोल ओली**
**स्फुंदू पाहे नदिजळ निळे दिव्य भासे उदास**
**काळ्या किल्ल्याकडुनि पिवळा थंड सांडे प्रकाश**

**जागोजागी तरु बहरले मत्त गुल्मोहराचे**
**माथी त्यांच्या लहरति थवे कावळ्यां पाख्यांचे**
**साऱ्या चित्री मधुरतरसे स्फंदते गूढ काही**
**स्पर्शे त्याच्या रस उसवुनी चित्त भानात नाही**

**सौंदर्याची लय गवसता हा असा नाग जागे**
**पांवा पैलातिल परिसुनी तेयली ओढ लागे**

**—बा. भ. बोरकर**

—तिच्या पायाची शोककथा ऐकूनहि तो तिच्याकडे येत राहिला. त्या पायाचं विसरून गेला व तिचं हृदय मिळविण्यासाठी झटू लागला. तिच्या ओढीने अधिकच भारावला. तिला आधार द्यायला, आपली म्हणायला सरसावला. तिच्याकडे सतत येऊ लागला. तिला सहलीला घेऊन जाऊ लागला. बस स्टॉपवर भेटू लागला. हॉटेलात, पार्कवर, सिनेमाला नेऊ लागला. . .

—काहीतरी कोटी करीत तो उठला. व सहज म्हणून तिच्या शेजारी बसला. तिला त्याचं ते वागणं उमजलं. दुपार पडली होती व झाडीतून खारा वारा येत होता. आजुबाजूला चिटपाखरू नव्हतं, आणि अंतरावरचं 'सागर होटेल' शांत होतं. समोरचा समुद्र पसरला होता. स्वतःच्या नादात झुलत होता. तिची काया मोहरत होती. आभाळ भरून आलं होतं. काळीज वर खाली होत होतं. दूरदूर ठेवलेल्या, जवळपास नकार दिलेल्या प्रियकराच्या शरीराचं सान्निध्य तिला जाणवत होतं. एका वेगळ्याच अवस्थेकडे नेत होतं.

"केवळ कोट्या करायला इथे आलो आपण? मनातलं हेच सांगायचं होतं काय तुला?–" ती हसत म्हणाली.

"विनोदाशिवाय काय उरलंय आता? आर्जवांची नि अटीतटीची बोलणी सगळी बस स्टॉपवर, होटेलांच्या रुम्समध्ये, गजबजलेल्या पार्कवर अनेकदा झाली की. . ." तो हसून म्हणाला व गंभीर झाला.

तिचं काळीज किंचित् कापरं झालं. ती सगळी वादावादी तिला आठवली. . .तो पुन्हा पुन्हा प्रेमयाचना करी. लग्न

म्हणून हटून बसे. काय हरकत होती? तिच्या आईची संमती होती, त्याच्या घरचा प्रश्नच नव्हता. जातीचा, पैशाचा, परिस्थितीचा कसलाहि अडसर नव्हता. इतका श्रीमंत, उमदा, मनस्वी पती तिने स्वप्नातहि कल्पिला नसेल. कधी काळी संसार थाटू असं तिला प्रत्यक्षातहि वाटलं नसेल. तो परोपरीने प्रेम करीत होता आणि तिचंहि त्याच्यावर मन जडलं होतं. मग अडसर कुठला उरला होता? ती कां टाळीत होती ?

"नको. . .खरंच नको! मी अशी. एका पायाने उणी. अन् तू तगडा, सशक्त, धाडसी. तुला माझी अडचण वाटेल. किळसहि वाटेल काही काळानं. . ."

"किती वेळा तेच तेच सांगतेस. मला ठाऊक आहे सारं. . . त्यासह मी तुझा स्वीकार करणार आहे. तशीच तू मला हवी आहेस. पायाचा नि प्रेमाचा काय संबंध?—लग्नानंतर समजा अपघाताने तुझा पाय गेला असता तर?—माझाच पाय, दोन्ही पाय गेले असते तर ?"

"हे सगळं समज पाडायला, वाद घालायला ठीक आहे. प्रत्यक्षात वेळ आली की. . ."

"नाही, नाही. . .तू मला हवी आहेस. . .मीहि तुला हवाय् ते मला ठाऊक आहे. तुला आधार द्यावा, तुझी काळजी घ्यावी. . ."

"तुझ्या प्रेमाला काळजीचं, दयेचं रूप आलं आहे. हे सगळं दयेपोटी आहे. त्याची मला भीति वाटते. किळस येते. . ."

"हे आता तूच वाद घालायला, समज पाडायला बोलते आहेस. . ."

—त्याने हळूच तिला मिठी घातली. पदर वेढून घेत ती गुरगटून बसून राहिली. वाद घालीत तिने त्याला दूरच ठेवलं होतं. त्याचं हृदय तिला उमजत नव्हतं का? तिचं मन ओढ घेत नव्हतं का? पण वाटे की, उद्या लग्न झालं, संसार सुरू झाला की, ही अलौकिकता फिकट होईल. संसाराचा जड गाडा ओढताना आपला पाय आडवा येईल. त्याची दया संतापी रूप धारण करील. एका संपूर्ण पायाशिवाय असलेला आपला देह त्याला किळसवाणा वाटेल. त्यापेक्षा नुसता स्नेह, मैत्रीच बरी, नुसतं पाखराना खेळवत पडवीत गप्पा मारणं. बस स्टॉपशी भेटणं. पार्कवर फिरणं. होटेलच्या खाजगी खोलीत जरासा प्रणय करणं. . .

होय, शिवाय आणिकहि उरलं होतं. काहीसं विलक्षण. . . भयाण! तेवढ्यासाठीच युक्तीप्रयुक्तीने त्याने तिला इथे आणलं होतं. तिच्या खांद्यावरचा हात काढीत व कातळावरून उठत तो म्हणाला,

"पावसाचे थेंब पडायला लागले. . .इथं कुठ बसायचं? तिकडे 'सागर होटेल'मध्ये तरी जाऊ. . ."

"खरंच चल. . .निवाऱ्याला, एकांतात बसू—"

ती लगेच तयार झाली याचं त्याला आश्चर्य वाटलं. खरं म्हणजे त्याचा उद्देश उमगून ती चिडेल असं त्याला वाटलं होतं. आजकाल ती त्याला हातहि फारसा धरू देत नसे. मग आलींगन देणं, चुंबन देणं वेगळंच! खूप जवळ येऊन ती झपाट्याने दूर जात होती. त्याला टाळत होती.

तिच्या खांद्यावर एक हात ठेवून व तिची पर्स दुसऱ्या हातात घेऊन तो सागर होटेलच्या आवाराकडे निघाला. ती कां टाळू लागली त्याचं कारण त्याला कळलं होतं. ती लग्न करायला नकार देते ह्यामागची तिची भावना व विचारसरणी तो समजू शकत होता. त्याच्याशी संसार न थाटता ती त्याला शक्य तेवढा स्नेह देत होती. त्यावर संतुष्ट राहायचीहि त्याची तयारी होती. पण मग, पण मग...

तिला एकांत करायला नेत असताना त्याला त्या पुरुषाची तीव्रतेने आठवण आली. कधी कसा, कुठ तो तिला भेटला, कोण जाणे! तो इसम तिच्या आयुष्यात प्रथम आला तेव्हा असूयेची यत्किंचितहि छटा त्याच्या काळजात डोकावली नाही. त्याच्याशी कुठल्या बाबतीत तो इसम स्पर्धा करणार? खानदान, संपत्ती, नौकरी, शरीरप्रकृति, रूप, बुद्धिमत्ता, शिक्षण—सगळ्याच बाबतीत तो आगंतुक माणूस उणा पडत होता. अन् मुख्य म्हणजे तो कुबडा होता! कुरुप वाटावा एवढा कुबडा होता!—पण अखेर त्या कुबड्यानेच त्याच्या काळजात डोंब उठवला. निराशेचा, वैफल्याचा, सूडाचा! तो कुबडा आला आणि ती कुबड्यापायी त्याला अधिकच दूर लोटू लागली. त्याच्याकडे उघडपणे पाठ फिरवू लागली.

. . ."त्याच्यावर प्रेम करतेस तू?" त्याने तडफडत्या काळजाने विचारलं होतं.

"मी कुणावर प्रेम करते ते तुला ठाऊक आहे. . ."

"मग त्याच्याशी दोस्ती कां ठेवतेस? तो तुला कां आवडतो?"

"ते तुला समजायला हवं—"

"लग्न करणार आहेस त्याच्याशी?"

"तुला 'नाही' म्हटलंय; त्याला अजून 'होय' म्हटलं नाही. . ."

—ती सागर होटेलच्या हॉलमध्ये कोचवरा एकटी विसावली. तो तिच्या हाती कोकाकोलाची बाटली देऊन मॅनेजरला भेटायला म्हणून गेला. एकटं उरल्यावर तिला एकदम विचित्र झालं. आजवरचं आयुष्य एकटं घालवूनहि आता एकाकी झालं. आकाश एकदम झाकळून आलं होतं. ढगांचे व लाटांचे आवाज मन उस्कटून टाकू लागले. तिने कुमारची आठवण करायचा यत्न केला.











कुमार तिला भेटला नसता तर? तो कुबडा नसता तर? कुबडा होता म्हणूनच तिचं त्याच्याकडे लक्ष वेधलं. कुबड्याचा लोचटपणा तिनं खपवून घेतला नि त्याच्याशी लग्न करायचा विचार घोळवून पाहिला. तिला लग्न करायचं होतं. आता तिला एकटी राहावत नव्हतं. संसार-सुख, शरीरसुख हवं होतं. त्या पाखराला पुरताना प्रथम पुरुषस्पर्श झाला नि तेव्हापासून तिचं मन चाळवलं गेलं. त्याच्या सहवासाने, स्पर्शाने, वासाने तिची वासना सतत चेतवत गेली. त्याच्या मिठीची, ओठांची तिला चटक लागली. आता कुणीतरी पुरुष पती हवाच होता––

तो घाईने आला व म्हणाला,

"चल, एक कोपऱ्यातली खोली आहे. जरा विसावा घेऊ–पाऊस कोसळणार चांगलाच––इथेहि पाणी तेईल––येतेस ना?"

"बसू या इथेच. . .खोलीत कसलं जायचं? . . ." ती स्वर रुक्ष करीत म्हणाली. खोलीत जायला मन ओढ घेत होतं. पण विचार ठरला होता कुमारशी विवाह करण्याचा. कुमारहि लोभावला आहे. त्याच्याजवळहि जरासा पैसा आहे. अन् तो कुबडा आहे! व्यंग असलेला! आपल्यासारखा! आपणात व त्यात कसलंसं सूत्र आहे! तो आपला द्वेष करायचा नाही, आपणावर दया दाखवायचा नाही. . .! उलट आपण अपंग असल्याचं समजल्यावरच त्याने मागणी घातली. चांगल्या सुदृढ, सरस मुली नाकारून. . .केवढा समंजस! संसार थाटायला योग्य! –

ती तशीच बसून राहिली व तिच्याकडे पाठ करून तो सिगरेट ओढीत उभा राहिला. आसमंत अंधारलं होतं. पाऊस वेड्यासारखा कोसळू लागला होता. कुबड्याला कौल देण्यात ती मूर्खपणा करते आहे हे किती तऱ्हेने त्याने तिला सांगितलं होतं. पण तिने ते मानलं नाही. अखेर स्त्री सरपटणाऱ्या विचारांची. स्वतःचं स्वास्थ्य, सुख बघणारी. कसलाहि धोका न पत्करणारी. धैर्य न दाखवणारी. एकाशी एकांत करणारी व दुसऱ्याशी संसार थाटणारी. . .पण ती आता एकांतालाहि तयार नव्हती. तो स्वतःशी चुळबुळला. तीव्र निराशेने तडकलेल्या त्याच्या मनाला आता कसा सूड घ्यावा हे कळेना.

"रागावलास?" मान मागे करीत तिने त्याचा हात पकडायचा प्रयत्न केला. त्याच्या चेहऱ्याची कड, लाल दृष्टीतील उसळलेला भाव आणि उंच्यापुऱ्या आकृतीची अस्वस्थ हालचाल पाहताच प्रथमच तिच्या दृढ निश्चयाला तडा गेला. क्षणार्धात् वीज चमकावी तसं वाटून गेलं की, सारासार विवेक, व्यवहार वगैरे फोल आहे. ह्याचं आपलं प्रेम हेच खरं! मग उद्या ह्याच्याशी संसार थाटल्यावर काही होवो. . .इतक्या दिवसानंतर प्रथमच तिला त्याच्या बद्दलच्या विशुद्ध प्रेमाने दाटून आलं. दयेपोटी न उगवलेलं, तिच्या पाय नसलेल्या शरीरावर त्याहीपेक्षा तिच्या आत्म्यावर जडलेलं त्याचं प्रेम! –ते पायासारखं प्रेम पकडायला तिचा जीव आता आकांत करू लागला. त्यासाठी वाटेल ते दान द्यायला तयार होऊ लागला.

ती त्याच्या न दिसणाऱ्या सावलीकडे पहात होती आणि तो भयाण अंधारात विजेसारख्या भेडसावणाऱ्या तिच्या भावनांचा मागोवा घेत होता. त्याचं प्रेम पायदळी तुडवणारी, त्याच्याशी प्रणयाचे खेळ खेळणारी, त्याचं उमदं आयुष्य लंगडं करणारी, त्याचं स्वत्व दुखवून एका कुबड्याला स्वीकारणारी. . .! त्या स्त्रीला असं सोडून चालणार नव्हतं. तिला अद्दल घडवली पाहिजे. पश्चात्तापाने जळत ठेवली पाहिजे. प्रथम तिचं शरीर विटाळून. ज्या शरीरापायी तरी दूर रहात आहे ते! **ता** देह डागळून आणि नंतर-नंतर. . .

"चल. . ." तरी उठत म्हणाली. त्यानं दचकून पाहिलं तर ती खोलीकडे चालूहि लागली. त्याला विस्मय वाटला, विचित्र वाटलं. सूडाची भावना दबून तो आपलेपणाने गलबलला. बावरत तिच्यामागे गेला. खोलीचं दार न लावता खुर्चीवर कोसळला.

तिने थंडपणे दार लावलं. दिवा लावला, पंखा मुक्त केला. मग खुर्चीच्या हातावर बसत त्याच्या केसांतून हात फिरवीत म्हटलं.

"एवढ्यासाठी आपण इथे आलो?"

"असंच नाही. . .आय ॲम सॉरी."

सूडाची भावना हरवू नये म्हणून धडपड करीत असताही तो विद्ध होऊन म्हणाला. वाटलं, कसला बदला, नि कसली अद्दल! काही झालं तरी ती त्याची प्रेयसी आहे. तिच्यावर त्याने अमर्याद प्रेम केलं आहे–करतो आहे. तिची विटंबना. . .

त्याचं वागणं पाहून ती क्षणकाल विटून गेली. आपण हतची गेलो ह्या जाणीवेने त्याने युक्तीप्रयुक्तीने आपल्याला इथे, इथवर आणलं. एकटं, एकांत करायला! शरीरानी एक झाल्यावर मग

**केशवसुत :** आधुनिक काव्यदर्शन !



**नवा शिपाई :** ब्राह्मण नाही हिंदुहि नाही न मी एक पंथाचा
जो "देइल" मीही त्याचा !!

संसार थाटणं क्रमप्राप्त होईल ह्या कल्पनेने! – किती क्षुद्र मन—

वराच वेळ तसा गेला. तो खुर्चीत, ती खुर्चीशी. तो स्वतःशी हात चोळीत, ती त्याच्या केसांत बोटं फिरवीत. त्याच्या पायाला मुंग्या आल्या. तिचा लाकडी पाय लोंबकळत राहिला. बाहेर अंधार माखला होता. पावसाच्या तांडवाने एकच आवाज घुमत होता. दिसत काही नव्हतं. जाणवत काही नव्हतं.

एकाएकी तो उठला. तिचे खांदे घुसळून तो म्हणाला,

"मला तू हवी आहेस. सगळी...एकदाच..."

"मी तुझीच आहे...खरंच रे–"

जीव ओतून ती उद्गारली. या पळार्धात फक्त तोच तिला दिसला. फक्त तोच! याचं ओथंबलेलं काळीज अन् अनावर झालेलं शरीर. त्यासाठी ती सारं समर्पण करणार होती.

हे उद्गार त्याने पूर्वी एकदा ऐकले होते. 'तुझीच आहे...पण लग्न मात्र त्याच्याशी–" हा तिचा ठाम विचार त्याला पाठ झाला होता. दयेची तिला धास्ती, किळस येईल याची काळजी! जे पूर्वी पार्कवर रखरखीत स्वरात तिने सांगितलंय त्याचाच ती हळवेपणाने उच्चार करीत होती.

एकाएकी धसमुसळेपणाने त्याने तिला कॉटकडे ओढली. ती धडपडत आली. अंगावर ओतली जाणारी त्याची विचित्र नजर पहात म्हणाली, "थांब जरा..."

मोडक्या यंत्रासारखा तो अचानक थांबला. वेड्यासारखा पहात राहिला...तिने कशीबशी साडी फेडली. मग परकरात हात घातला. उजवा लाकडी पाय खुब्यापासून संपूर्ण सोडवला. कॉट-जवळच्या खुर्चीजवळ टेकवून ठेवला.

दोघांमध्ये त्या अर्धवट उजेडांत व वादळी वातावरणात, तो स्टेनलेसच तुकडे लावलेला, मुसळासारखा दिसणारा कृत्रिम पाय कसातरीच वाटत होता. एखाद्या कुबडीसारखा – एखाद्या कुबड्यासारखा !

क्षणकाल त्याचा आवेश उतरून गेला. कारुण्याची एक छटा त्याच्या रक्ताळलेल्या डोळ्यात तरळली. कारुण्याची नि प्रीतीची... त्या कारुण्याची कडा तिने डोळ्याने टिपली नि तिच्या आसुस-लेल्या मनाला सुई टोचली की, विवाहानंतर ही छटा वाढणार असेल तर नकोच. अजून माघार घ्यावी! –

पण ती नकळत उद्गारली, "मला आता उठता येणार-नाही...येना तूच जवळ..."

अगदी जवळ. फक्त तोच! दुसरं काही नको आता...तिने हात पुढे केले; व तिरमिरीने तो तिच्याजवळ गेला. मन परत पीळ भरू लागलं की, ही आपला नुसता उपयोग करते आहे... केवढी निर्लज्ज!...ती संगमोत्सुक झाली व तो संतापाने तिच्यावर कोसळला.

त्याक्षणी पाऊस थबकल्यासारखा झाला. समुद्राच्या लाटा निशब्द झाल्या. खोलीतला उजेड चोरटा बनला. आरशातली प्रति-बिंबं अदृश्यली. उरला फक्त कृत्रिम अवयव!

–तिच्यापासून तो अलग झाला तेव्हा खाट केवढ्याने कुरकुरली. पण तिला कसलीच शुद्ध नव्हती. भान हरपून ती खाटेच्या कडेला पडली होती. मिटल्या डोळ्यानी; शिणल्या गात्रानी. तिच्या मनापुढच्या साऱ्या समस्या संपल्या होत्या. शरीराची घालमेल आटोपली होती. कधी नाही ती शांति, तृप्ती लाभली होती. समर्पणाचे परमोच्च सुख गवसलं होतं. प्रीतीच्या साक्षात्काराने तिची समाधी लागली होती.

तो मात्र खाटेच्या दुसऱ्या बाजूने उठला. टेबल लॅंपच्या अधुऱ्या प्रकाशाने समोरच्या आरशात दाखविलेली आकृति पाहून दचकला. बाजूला पडलेला तिचा देह नकोसा झाला. खोलीत गुद-मरल्यासारखं झालं. शेजारी ठेवलेला कृत्रिम पाय किळसवाणा वाटू लागला. तो मुसळासारखा पाय जन्मभर आपला पाठलाग करणार असं वाटलं. असल्या अस्त्रापासून – ह्या लंगडीपासून व त्या कुबड्यापासून दूर जावं म्हणून त्याचं मन धडपडू लागलं. बाहेरच्या धुवांधार पावसाकडे बघू लागलं.

—सारी शुद्ध विसरून व प्रीतीत न्हाऊन ती उबदार अंथ-रुणात आणि अर्धवट अंधेरात विसावली होती...आणि कोस-ळत्या पावसात नि कभिन्न अंधारात तिचा कृत्रिम पाय खांकोटीला मारून तो वेड लागल्यासारखा पळत सुटला होता...

• • •

# सर्दी व फ्ल्यूचें नाहीं काम,
# ॲनासिननें मिळवा आराम!
# आपल्या घरांत नेहमीं
# ॲनासिनचें
# फॅमिली-पॅक संग्रहीं ठेवा!
# केव्हां त्याची गरज लागेल,
# हें सांगतां येत नाहीं!

**लक्षणें :** डोके दुखी, सर्दी व फ्लू, दांतदुखी, शारीरिक दुःख, स्नायूच्या वेदना.

**प्रमाण :** मोठ्यांसाठीं २ वड्या, मुलांसाठीं १ वडी. किती सोपें प्रमाण !




## ॲनासिन

*अधिक गुणकारी आहे*

*कारण*

*तें ४ प्रकारें कार्य करतें*



Registered user: GEOFFREY MANNERS & COMPANY LIMITED








"प्रौढत्वी निज शैशवास जपणे"
हा मंत्र मूर्तिमंत आचरणात आणणारे

## आचार्य अत्रे म्हणतात

# आम्ही कोण म्हणोनि काय पुसतां

महाराष्ट्राचे प्रख्यात नाटककार आणि झुंझार पत्रकार आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांची 'दीपावली'च्या दिवाळी अंकाकरिता खास मुलाखत घेण्यासाठी मी रविवार ता. ९ ऑक्टोबर रोजी सकाळी खंडाळ्याला गेलो. मुंबईत उन्हाळा असह्य झाल्यामुळे दोन दिवसांपूर्वीच आचार्य अत्रे खंडाळा येथील आपल्या 'राजमाची' बंगल्यावर गेले आहेत असे कळल्यामुळे महंमदाला 'पर्वता'कडे जावे लागले. सकाळची ८॥–९ ची वेळ असल्यामुळे हवेत गारवा होता. हा 'माचीवरला बुधा' काय करीत असेल असा विचार करीत बंगल्याजवळ जाऊन पोहोचलो. आणि 'जॅकी'च्या भुंकण्याने चार-दोन पावले मागे सरकलो. गोमंतकाचे मुख्यप्रधान भाऊसाहेब बांदोडकरानी हा कुत्रा अत्र्याना दिला. जॅक सिक्वेरा हे नाव बहाल करून अत्र्यानी दोन्हीही समर्थाघरच्या श्वानाचे बारसे साजरे केले. अत्र्यांचे ह्या 'नामधारी' विरोधकावर फार प्रेम! एखाद्या परम भक्ताच्या तोंडात जसे रामनाम अहोरात्र असते त्याप्रमाणे 'अहो जाता येता, शयन करिता, घास गिळता' साहेब 'जॅकी'चे नाव कधी रागाने, कधी प्रेमाने तर कधी कौतुकाने घेत असतात. हाच कुत्रा पाठीमागे नकळत येऊन उभा राहिल्यामुळे अत्र्यांचा पाय जायबंदी झाला. पण त्यामुळे अत्र्यांचे आपल्या कुत्र्यावरचे प्रेम कणभरसुद्धा कमी झालेले नाही.

नमस्कार–चमत्कार झाले, प्रकृतीची चौकशी झाली. भेट म्हणून–कारण मोठ्या माणसाला भेटताना रिक्त हस्ताने जाऊ नये म्हणतात–पुणेरी वृत्तपत्रांचा जुडगा दिला. अत्र्यानी परतभेट म्हणून रविवारच्या मराठ्यात 'वाङमयातील विष्टावाद' हा लेख वाचावयास दिला. चार-दोन मिनिटानी साहेबानी विचारले, "लेख वाचलास का?"

"हो वाचला! चांगला आहे!" मी दडपून बोललो!

"शक्य तरी आहे का? म्हणे चार कॉलम लेख चार मिनिटात वाचला. हं, मोठ्याने वाच! लेख फर्मास जमला आहे."

पुढील १५–२० मिनिटे आमचा वाचनाचा तास चालू होता. अत्र्यांच्यात असणारा 'शिक्षक आणि साहित्यिक' एकाच वेळी समजावून सांगत होता व रसग्रहण करीत होता. मधेच अत्रे म्हणाले, "आम्ही आता म्हातारे झालो–पुरातन झालो. 'वासूनाका,' 'बाईविना बुवा,' 'अजगर' असल्या गलिच्छ कादंबऱ्या हे लोक कां लिहितात आणि कसे लिहितात आणि ही विष्टा काही विद्वान व व्यासंगी माणसे मिटक्या मारीत वाचतात आणि भरसभेत त्याचे समर्थन करतात. याचे कारण काय?"

"विकृत वृत्ति आणि धंदेवाईक दृष्टि" मी सुचवले.

"हे फारच सौम्य झाले."

काही क्षण आचार्य गंभीरपणे ह्यावर विचार करीत होते. मग मला म्हणाले,

"काय प्रश्न आणले आहेस? बघू या तरी."

मी सोळा प्रश्नांची पुरचुंडी त्यांच्यापुढे सोडली.

सगळे प्रश्न वाचल्यानंतर अत्रे म्हणाले, "थोडेच प्रश्न आणलेस! किती पाने मुलाखत पाहिजे."

"सुमारे तीन पाने."

"मग पाच सहा प्रश्न खूप झाले."

**माझा पहिला प्रश्न :–**

**"वृद्धत्त्वि निज शैशवास जपणे" हा कवीचा बाणा आपण कसा पाळू शकता? जीवनाविषयी जिज्ञासा, उत्साह, आसक्ती आणि अपरंपार उद्योग वयाच्या ६९ व्या वर्षीही आपल्यात दिसतो त्याचे रहस्य काय?**

थोडा वेळ विचार करून अत्रे बोलू लागले व मी लिहून घेऊ लागलो.

"माणसाची प्रकृति ही अनुवांशिक असते. विकृति ही उपद्व्यापातून निर्माण होते. डोळे, कान, केस, रक्तदाब, पचनक्रिया ह्या आपल्या मातापित्यापासून आपल्याला मिळतात. चांगले आईबाप मिळणें ही एक भाग्याची गोष्ट आहे. त्यांची निवड मुलाना कशी करता येईल? माझे अनेक समवयस्क प्रकृतीने व आरोग्याने माझ्यापेक्षा चांगले असून कधीच कालगत झालेले आहेत. पुष्कळसे इतके वृद्ध आणि पंगू झालेले आहेत की, माझे कमीतकमी चुलते तरी ठरतील. माझ्यापेक्षा ८–१० वर्षानी लहान असलेले असे कित्येक माझे मित्र आहेत की, ज्यांच्या तोंडात दातांच्या कवळ्या आहेत आणि

रक्तदाबाच्या व हृदयाच्या विकाराने हैराण झाले आहेत. सारांश, चांगली प्रकृति मिळणे हा जसा नशिबाचा भाग आहे त्याप्रमाणे चांगली प्रकृति ठेवणे हा स्वभावाचा व प्रयत्नाचा भाग आहे. असे पाहिले असता चांगली प्रकृति ठेवण्यासाठी आणि दीर्घ जीवन मिळविण्यासाठी मी हेतुपूर्वक असे काहीहि प्रयत्न केलेले नाहीत. लहानपणी विशेष व्यायाम केलेला नाही. खेळलो पुष्कळ पण त्यात प्राविण्य मिळविले नाही. घरच्या गरिबीमुळे पौष्टिक आहार कधीही लाभला नाही. वयाच्या ३० व्या वर्षापर्यन्त मी नुसता अस्थिपंजर होतो. नुसती लांबी; रुंदी मुळीच नाही. त्यावद्दल माझ्या आईला फार दुःख वाटावयाचे, पण इंग्लंडला गेल्यावर मी मांसाहार सुरू केला व त्यामुळे माझी प्रकृति व आकृति आमूलाग्र वदलली. तथापि उत्तम प्रकृतीची जी तीन मूलभूत लक्षणे ती मला उपजतच लाभली आहेत. कडकडून भूक लागणे, डोळे मिटले की, झोप व सकाळी उठले की, विद्युत् वेगाने शरीरशुद्धि ही वैशिष्टचे आजतागायत पूर्वीप्रमाणेच शाबूत आहेत. त्यामुळेच दीर्घायुष्य लाभले आहे असे मला वाटते.

प्रकृति ही शरीरापेक्षा स्वभावावर जास्त अवलंबून असते. "सजीव दहते चिंता। निर्जिव दहते चित्ता। जिवंत मनुष्य हा काळजीच्या सरणावर जळतो. आयुष्यात माझ्यावर अनेक संकटे आली. काही अकस्मात् आलेली, काही मी स्वतः निर्माण केलेली. तथापि त्या संकटांच्या अग्निदिव्यातून जाताना मी माझ्या मनाला चिंतेचा स्पर्श कधीहि लागू दिलेला नाही. काळजी केल्याने कोणतेहि प्रश्न सुटत नाहीत, याची जाणीव मला सतत असते. पिसावर पडलेले पाणी कबूतर जसे लीलेने उडवून देते त्याप्रमाणे माझ्या मनावरची चिंतेची जळमटे मी क्षणार्धात झटकून टाकतो. मी जरूसात वाजता फाशी जाणार असलो तर ६–४५ पर्यन्त माझ्या मित्रमंडळीत मी हशा व टाळ्या यांच्या कल्लोळात स्वतःला निमग्न करून घेईन.

**माझा दुसरा प्रश्न :–**

**नाटकाचे यश किंवा मोठेपण हे प्रयोगक्षम की लेखनक्षम ?**

**(अ) काही साहित्य म्हणून अतिसामान्य असणारी नाटके इतकी लोकप्रिय झालेली दिसतात ती कां ?**

**(ब) आजकाल मराठी रंगभूमीवर नाटके गवताऐसी उदंड जाहली आहेत हे यश की अपयश ?**

वरील प्रश्नाला किंवा प्रश्नांना उत्तर देताना अत्रे म्हणाले—

नाटकाचे यश हे अर्थात्च प्रयोगावर अवलंबून असते. पण प्रयोग परिणामकारक होण्यासाठी मूळ नाटकच चांगले प्रभावी असावे लागते. चांगल्या नाटकाचा उत्तम प्रयोग हेच त्याच्या यशाचे लक्षण आहे.

साहित्याच्या दृष्टीने सामान्य असणारी काही नाटके काही काळ यशस्वी होतात हे खरे. मामा वरेरकरांचे 'कुंजविहारी' हे नाटक याचे उत्तम उदाहरण आहे. पण कालांतराने असली नाटके नामशेष झाल्यावांचून राहात नाहीत. नाटकात कृतीला (Action) व गतीला महत्त्व असते. दोन्हीहि गोष्टी नटनटींच्या अभिनयातून व हालचालीतून व्यक्त होत असतात. पण यांच्यामागे जर परिणामकारक भाषेत व्यक्त केलेले प्रभावी विचार नसतील तर ते नाटक दीर्घकाल यशस्वी होणार नाही. याची अनेक उदाहरणे देता येतील. आजकाल उदयाला आलेल्या काही तरुण नाटककारांची नाटके जी यशस्वी झालेली आढळतात त्यांच्यात निश्चित नाटच व साहित्य गुण आहेत यात मुळीच शंका नाही. काही नाटकात उत्तम नटनटी असतात; काही नाटकात प्रभावी रस परिपोष असतो आणि कित्येक नाटकांचे नेपथ्य प्रेक्षकांच्या चित्तवृत्ति भारावून टाकणारे असते. एवढे सांगूनसुद्धा मी असे म्हणतो की, ज्या नाटका-

मध्ये साहित्यिक मूल्य विशेष नाही ते नाटक प्रयोगरूपाने कितीही यशस्वी झाले तरी त्याचे स्मरण जनतेच्या मनात दीर्घकाल-पर्यन्त राहाणे अशक्य आहे.

मराठी रंगभूमीवर आजकाल जी अनेक नाटके येत आहेत ती 'गवताऐसी उदंड' जरी असली तरी प्रेक्षकांचा जर त्याना आश्रय मिळत गेला नसता तर हे पीक फारसे फोफावले नसते. आजच्या जीवनाच्या कोलाहलात जनतेला जगणे अशक्य झाले आहे. स्वतःच्या काळज्या आणि भगभगी यांचा विसर पडण्यासाठी त्याना काहीतरी विरंगुळा व मनोरंजन पाहिजे असते. ते कार्य करण्यास निदान महाराष्ट्रात तरी चित्रपट असमर्थ ठरला आहे. सर्कसी व जादूचे खेळ याना विशेष वाव नाही. म्हणून नाटकाना आज भलताच भाव आला आहे. त्या वाहत्या गंगेत तमाशेवालेही आपले हात धुवून घेऊ लागले आहेत. मोठमोठ्या जाहिरातीनी जनतेची आज एवढी दिशाभूल होत आहे की, कोणत्या नाटकाना जावे व कोणत्या नाटकाना जाऊ नये याचा त्याना विवेक राहिला नाही. यामुळे कोणतेहि नाटक वा लोकनाट्य निदान पहिल्या आठवड्यात तरी House Full झालेले आढळते. या असल्या धकाधकीच्या माम-ल्यात अखेर रंगभूमीचा फायदाच होणार आहे असे मत आहे.

**आपला आवडता नाटककार किंवा नाटक कोणते ? संस्कृत, मराठी व पाश्चात्य नाटकाची व नाटककारांची स्वतंत्र नावे द्या.**

कोणत्याहि भाषेतल्या मला आवडणाऱ्या एका नाटककाराचे नाव मला सांगता येणार नाही. संस्कृतमध्ये 'शाकुंतल' आणि 'मृच्छ-कटिक' ही दोन नाटके मला आवडतात. पण तंत्रदृष्ट्या 'मृच्छकटिक' हे शाकुंतलापेक्षा सरस आहे. 'मृच्छकटिक'मधला न्याया-सनाच्या प्रवेशासारखा प्रवेश इंग्रजी नाट्यसृष्टीतही मला कधी वाचायला मिळाला नाही. मराठी भाषेत किर्लोस्करांचे 'सौभद्र', देवलांची 'शारदा' आणि 'संशय-कल्लोळ,' खाडिलकरांच्या 'भाऊ बंदकी'-तील पहिला अंक व 'मानापमान' आणि गडकऱ्यांचे 'एकच प्याला' ही नाटके मला आवडतात. पाश्चात्य देशांतील अनेक नाटककारांच्या नाट्यकृतींचा कित्येक वर्षां-पासून माझा व्यासंग आहे. शेक्स्पियर तर सोडाच पण मोलियर, इब्सेन, बर्नाड शॉ व लुईजी पिरँ देलो हे माझे आवडते नाटककार आहेत. यूजिन ओनेल या महान् अमेरिकन नाटककाराची अनेक नाटके मी वाचली आहेत. पाश्चात्य नाटककारांच्या नाट्य-कृतींचा माझ्याएवढा व्यासंग असलेला दुसरा कोणीही लेखक मला आढळत नाही, हे मी मोठ्या अभिमानाने सांगतो.

**—आपण लिहिलेल्या नाटकांपैकी आप-ल्याला कोणते नाटक आवडते आणि ते कां?**

'साष्टांग नमस्कार', 'लग्नाची बेडी,' 'उद्याचा संसार', 'तो मी नव्हेच' यापैकी एक नाटक अत्र्यांचे आवडते असेल अशी माझी कल्पना होती. पण अत्र्यानी दिलेले उत्तर अनपेक्षित होते. ते म्हणाले—

—माझ्या स्वतःच्या नाटकांविषयी बोलावयाचे झाल्यास माझी सर्वच नाटके त्या त्या काळी लोकप्रिय झाली आहेत. त्या सर्वांचा नामनिर्देश करण्याची जरूर नाही. पण मला स्वतःला आवडणारे असे माझे एकच नाटक आहे. आणि ते म्हणजे 'जग काय म्हणेल?' तंत्राच्या दृष्टीने निर्दोष व प्रयोगाच्या दृष्टीने एवढे प्रभावी नाटक माझ्या लेखणीतून दुसरे उतरलेले नाही.

एकंदरीत 'जग काय म्हणेल ?' याची पर्वा न करता अत्र्यानी उत्तर दिले. प्रेम आंधळे असते म्हणतात ते खोटे नाही.

**आपण खरोखर कोण आहात ? १) शिक्षक २) कवि ३) विडंबनकार ४) नाटककार ५) कथाकार ६) वृत्त-पत्रकार ७) राजकारणी ८) समाजसुधारक.**

जीवनाविषयी मला जबरदस्त जिज्ञासा असल्यामुळे आजपर्यन्त मी आयुष्यामध्ये अनेक व्यवसायातून मार्गक्रमण केले आहे. पण कोणत्याहि व्यवसायात मी गेलो असलो तरी पहिल्या रांकेत मुक्काम केल्याखेरीज राहिलो नाही. त्या व्यवसायात जास्तीत जास्त सन्मान मिळविण्याची व पराक्रम करण्याची मी पराकाष्टा केली आहे. शिक्षणशास्त्राच्या परीक्षेत मी पहिल्या वर्गातले पहिले स्थान मिळविले आहे. मी लिहिलेल्या शैक्षणिक पाठ्य पुस्तकांशी तुलना होईल असे एकही पुस्तक गेल्या तीस वर्षात मराठी भाषेत झालेले नाही. ज्यांची नाट्य प्रतिभा ज्यांच्या डोळ्यासमोर व ह्यातीतच संपुष्टात आली आहे असे अनेक मराठी नाटककार दाखवून देता येतील.



**केशवसुत :** आधुनिक काव्यदर्शन

**मीति :** प्रीति मिळेल का हो बाजारी ?
प्रीति मिळल का हो बाजारी ?

अनुक्रमणिका










अनुक्रमणिका

तथापि गेली ३३ वर्षे मी नाटके लिहितो आहे आणि पहिल्या 'साष्टांग नमस्कार' नाटकात मी जे यश मिळविले ते यश मी माझ्या, 'मी मंत्री झालो' या अलीकडच्या नाटकातही टिकवून धरले आहे. माझ्या चित्रपटांचा पाया मी 'ब्रह्मचारी'ने घातला व त्याचा कळस 'श्यामच्या आई'मध्ये गाठला. देशात एवढे मोठमोठे चित्रपट निर्माते व दिग्दर्शक असताना भारतातले पहिले राष्ट्रपति सुवर्णपदक मलाच मिळाले याचे रहस्य काय असावे याचा ज्याचा त्यानी विचार करावा.

माझा पिंड साहित्यिकाचा असूनहि वृत्तपत्राच्या सृष्टीत गेल्या १० वर्षांच्या आत मी जे कार्य करून दाखविले आहे त्याचे वर्णन मी माझ्याच तोंडाने कसे करू ? कोणत्याही क्षेत्रात पदार्पण केले तरी आपले सर्वस्व त्यासाठी वेचावयाचे हा माझा अंगभूत बाणा असल्यामुळे मी यश मिळवू शकलो असे मला वाटते.

**आपला वेळ अधिक कशात जातो ?**

**१) वाचन २) लेखन ३) भाषण ४) संभाषण ५) चिंतन.**

**आपण गप्पा मारण्यात व भोवती फालतु व रिकामटेकड्या लोकांचे कोंडाळे गोळा करण्यात फार वेळ फुकट घालविता त्याचा अनिष्ट परिणाम लेखनावर होतो हे कितपत खरे आहे ? आपण केलेल्या आजपर्यंतच्या लेखनाला हा गप्पांचा फड कितपत उपकारक किंवा अपकारक झाला ?**

विद्यमान मराठी लेखकात माझ्याएवढा आद्ययावत वाचक कोणी असेल असे मला वाटत नाही. कुस्ती खेळण्यापूर्वी पहिलवानाला जसा व्यायाम करावा लागतो तसे लेखकाने अहर्निश वाचन करून आपले बुद्धिसामर्थ्य व कल्पना शाबूत ठेवणे भाग असते. स्वतः विकत घेतलेली पुस्तके मी वाचीत असतो. दर आठवड्यास विशेषतः जी उत्तमोत्तम इंग्रजी पुस्तके प्रसिद्ध होतात त्यापैकी काही मी विकत घेतो. लेखनास आवश्यक असणारे सर्व संदर्भ ग्रंथ माझ्या संग्रही आहेत. त्यासाठी मला अन्य ग्रंथालयांत जाण्याची जरुरी पडत नाही. रोज एखादे तरी नवीन पुस्तक मी चाळल्यावाचून राहात नाही. त्यामुळे विचारांचा ताजेपणा कायम ठेवण्यास मला अडचण पडत नाही. वृत्तपत्राच्या व्यवसायामुळे रोज किमान चार तास तरी लेखन करावे लागतेच. कधी कधी एखाद्या विषयासाठी ८–१० तास बैठक मारावी लागते.

सार्वजनिक व्याख्याने देण्यात माझा काही कमी वेळ जात नाही. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून आलतू फालतू संस्थांकडून व्याख्यानांची आमंत्रणे येत असतात. व ती नाकारली तर "आमची फार निराशा झाली." असे बोलावणारे कुरकुरतात. यावावतीत सर्वांचे समाधान करणे सर्वस्वी अशक्य आहे. व्याख्यान देण्याचा मला अलीकडे विलक्षण कंटाळा आला आहे. पण ते संकट काही टळता टळत नाही.

लोकांची रहदारी तर सकाळपासून संध्याकाळपर्यंत चालू असते. आलतू फालतू व रिकामटेकडे लोक तर पुष्कळ असतात.

त्यांच्याशी गप्पा मारण्यात काळाचा निष्कारण अपव्यय होतो असा कित्येकांचा आक्षेप आहे. पण मला तसे वाटत नाही. **माणूस कितीहि सामान्य असला तरी त्याच्या बोलण्यात एखादे वाक्य किंवा एखादी गोष्ट अशी येते की, जी संग्रही ठेवण्यासारखी असते. त्याची एखादी लकब तरी विनोदाला विषय पुरविणारी असत. माझ्या विनोदाचा सारा मालमसाला मी या सामान्य माणसांशी गप्पा मारताना मुकाटयाने मनातल्यामनात जमा करीत असतो.** यामुळे माझ्या वेळेचा निष्कारण व्यय होतो असे मला म्हणता येणार नाही.

चिंतनासाठी स्वतंत्र असा वेळ मी राखून ठेवलेला नाही. ते अहोरात्र चालूच असते, आंघोळ करताना, जेवताना, लिहिताना, वाचताना, प्रवास करताना व झोपेतहि चिंतनाची भुणभुण एकसारखी मेंदूत चालू असते. तथापि वाचनामुळे चिंतनाला जास्तीत जास्त प्रेरणा मिळते असा माझा निष्कर्ष आहे.

माझा शेवटचा प्रश्न असा होता.

**अत्रे नसते तर संयुक्त महाराष्ट्र झालाच नसता हे खरे का ?**

अत्रे थोडा वेळ थांबले. संयुक्त महाराष्ट्राची 'न भूतो न भविष्यति' अशी झालेली चळवळ याबद्दल त्यांच्या मेंदूत चिंतनाची 'भुणभुण' चालू असावी. शिवाय खरे उत्तर द्यावे तर आत्मप्रौढीचा दोष पदरी येतो आणि विनयाने बोलावे तर–पण अत्रे उत्तर देऊ लागले.

संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीत कोणाचा वाटा किती हे कसे सांगावे ? तो समस्त मराठी माणसांचा प्राणपणाचा झगडा होता. एवढी जागृति, एवढा आवेश, एवढी एकजूट व एवढा उठाव आयुष्यात मला कधीहि पाहावयास मिळाला नाही. त्या संग्रामात एक सैनिक म्हणून लढण्याची आणि त्या इतिहासाचा साक्षीदार होण्याची संधी मला लाभली हेच माझे भाग्य होय. संयुक्त महाराष्ट्राचा लढा यशस्वी करण्याचे श्रेय कॉ. डांगे, एस. एम. जोशी, क्रांतिवीर नाना पाटील व महाराष्ट्र शाहीर अमरशेख यानाही देणे न्यायाचे ठरेल. माझे सारे सामर्थ्य 'मराठ्या'मधून पणाला लावल्यामुळे माझ्या नावाची नौबत इतरांपेक्षा जास्त मोठयाने वाजली. आणि लोकांचे लक्ष माझ्याकडे जास्त आकर्षित झाले हे खरे ! पण एक गोष्ट सांगतो की, मराठी भाषिक राज्यास मुंबई राज्य असे नाव न मिळता महाराष्ट्र राज्य हे नाव मिळाले त्याचे श्रेय त्याकाळचे माझ्या मराठ्यातले अग्रलेख वाचल्यानंतर मलाच द्यावे लागेल.

उत्तर संपले आणि त्याबरोबर आमची मुलाखतहि संपली. जवळ जवळ तीन तास अत्रे एकेठिकाणी बसले होते. त्यामुळे उत्तर संपताच ते तावडतोब मला म्हणाले, "आता पुरे ! कंटाळा आला." काठीचा आधार घेऊन त्यानी व्हरांड्यातच फेऱ्या मारण्यास सुरुवात केली.

"अशा सकाळी दहा व संध्याकाळी दहा फेऱ्या मारतो. तेवढाच व्यायाम ! जन्मात असा कधी स्थानबद्ध झालो नव्हतो."

नकळत औपचारिक मुलाखत संपली आणि कौटुंबिक व खाजगी गोष्टींना केव्हा प्रारंभ झाला कळले नाही. 'दीपावली'चे संबंध माझ्या इतकेच जिव्हाळ्याचे असल्यामुळे औपचारिक आभार मानण्याच्या भानगडीत पडलो नाही.

[मुलाखत-प्रा. म. मा. आळतेकर]



अनुक्रमणिका








अनुक्रमणिका




Our photographic library enables us to provide *quick service* to all our clients on subjects that vary from architecture to zoology. And we're constantly developing new techniques that add to our repertoire.

**You name it—we've got it!**

Why not give us a ring?

# STUDIO R. R. PRABHU

Javeri House, 110 Medows Street, Bombay-1.
Telephone: 254919

# सुवास

—वामन चोरघडे

आज माझ्या मोहरल्या अवस्थेत तू दिसायला नको होतीस. आज नसती दिसलीस तर....? न दिसता दिसत होतीस तेवढंच मला पुरे होते. खरे म्हणजे मी जे काय वागतो ते तुझ्यासाठी; जे काय बोलतो ते तुला उद्देशूनच ! याहून अधिक काही मी अपेक्षिले नव्हते........!



मंद समीराच्या लहरींनी आंगणातला पालापाचोळा बाजूला झालेला. आंगणात एक पारिजातक—असा डौलदार, जोपासलेला! त्याच्या आलवातल्या मातीला नाजुक नखांची क्षते पडलेली. रात्री केव्हा तरी अशी पुसट पावसाची सर येऊन गेलेली. सरत्या श्रावणाच्या काळोखात चांदण्यांशी बोल बोलून हरखलेला पारिजाताचा बहर एकेक एकेक करीत ठिबकतो आहे. सकाळी ते तेवढे आंगण रात्रीच्या आकाशासारखे लाल देठाच्या शुभ्र कलावतूने खचून गेले आहे—आंगण कोणते नि आकाश कोणते!

सुस्तावलेले डोळे फुलवायला म्हणून तिकडे बघावे. नजर ओढली जाते. पाऊल आपोआप तिकडे वळते. असे वाटते, हे पाऊल असे अधरच तिथे टेकले जावे!

मधूनच एकटे दुकटे फूल ठिबकते. खाली येताना आवाज नाही, नाद नाही. पण आवाज होत असावा; कारण फुलरव कां ऐकू येत नाही म्हणून मन अस्वस्थ होते. त्या आवाजाने रेशमाची रजई पांघरून आत आत झोपलेले मन जागे होते; किलकिल्या डोळ्यानी आसमंत बघू लागते. उगीच कसली तरी चाहूल जाणवते त्याला. ती ऐकू आली की परत त्याला झोपावेसे वाटत नाही. मग कुणी तरी त्याला थोपटते, रजईखाली दडपते अन् काकुळतीच्या ओल्या स्वरात विनविते—"झोप, झोप राजा, झोप!"

असे त्याला सांगितले की, तेवढ्यापुरते हलके हलके वाटते; पण हलके वाटते म्हणूनच कालवाकालव सुरू होते मनात. विजेची कटचार चकचकावी तसे काही काही भासू लागते.

अनुक्रमणिका

व्यासपीठावरून समोर बघता खूप गर्दी दिसत होती. मंडप खच्चून भरला होता श्रोत्यानी. डोळ्यांचे टिपण भांबावून जाईल इतके चेहरे; अनेक रंग, अनेक रूपे, चेतनेचे विविध आकार!

आणि त्या चेतनेच्या आलोकात, अनेकविध श्वास निश्वासांच्या धुक्यात, माझ्या उजव्या नजरेकडे दोन डोळे दिसले मला! डोळे नव्हे, नेत्र, नयन! पारिजाताची फूलचांदणी खाली उतरते, तेव्हा त्या आवाजाचे 'टप् टप्' असे वर्णन करू धजावे; कमळाच्या पाकळी-वर निखारा ठेवल्यागत मन चरचरते! म्हणून तर, सुचीत वेसुधीत त्याना नेत्रच म्हणायचे! असा एक गुबगुबीत पारवा त्या नेत्रात; अस्मानात झेप घेणारी घार त्या नयनात; लखलखत्या पात्याची एक धार त्या डोळ्यात; रानझरीची झुळझुळ मृगीचा सावधपणा, मयूर-नृत्याची थुईथुई, मोहरीच्या शेतात फुललेली पिवळी लवलव, सुपलीच्या फुलात मोती मिसळलेला रंग, सायलीच्या फुलांचा मधुगंध!

पण हे कसे शक्य आहे? ते नेत्र अन् इथे? या सभामंडपात? या शंभर डोळ्यांच्या गर्दीत? मोजून दहा वर्षानंतर? आणि असे विश्रब्धपणे मला, मजकडे बघत असलेले?

तिथले तसे सगळेच डोळे माझ्याकडे लागले होते. सगळे कान मला ऐकत होते. माझ्या मुखीचा शब्द न् शब्द झेलला जात होता. पण सगळे माझ्या लेखी वितळले, दिसेना झाले! उरले ते तवढे दोन नेत्र!

ते बघता यावे, अधिक स्पष्ट दिसावे म्हणून मी माझे डोळे मिटले. सवयीने बोलत राहिलो. तानसेनाला तवल्याची साथ करणाऱ्याचा आंगठा तुटला होता, तरी तवल्याचा ठेकाताल निमूट साथ देत होता, तसे! शब्द आपले काम करीत होते. मन मात्र फडफड करीत उंच झेप घेऊन कुठे तरी विसाव्यासाठी उडून गेले होते!

दहा वर्षांचा अवधी! ते नेत्र भेटतील एवढा भरवसा होता. एकच भीति वाटायची की, ते नेत्र उघडतील तेव्हा आपले मिटायला नको!

सुधा पिऊन तरंगणाऱ्याला इतर इशारा देतात की, अरे ऊठ; रात्र संपली; आणि तो पुनःपुनः विचारतो की, काय? काय झालं म्हणाला? जरा नीट सांगा की!

श्रोत्यानी माझ्या शेवटच्या शब्दाला टाळी दिली. संयोजकानी आभार मानले. समोरच्या टेबलावर पडलेल्या हारांच्या ढिगाऱ्या-तून माझी नजर उजव्या दिशेला धावली. धन्यतेचे अडसर, टाळ्यांचे डोंगर केव्हा एकदा ओलांडतो असे मला झाले. पण ते ओलांडता आले नाहीत; धीरच झाला नाही! अशा वेळी हे असेच होते– आपले नि दुसऱ्याही कुणाचे तरी! दहा वर्षांपूर्वी असेच झाले होते. तेव्हापासून नुसती वाट बघत होतो; अंधाराला भ्यालेला अरुणोदयासाठी आतुर होतो तसा; चकोराचे पिलू आभाळ उजळू लागल्यापासून सांजेलाच चोच उघडून ठेवते तसा!

पण हे अडसर असे दूर व्हायचे नाहीत. उलट वाढतील. अनेक रंग असे जवळ येतील; नानाविध सुरस्वरांचा घोळका भोवती जमेल; आपण विनवीत राहू पण कुणी ऐकणार नाही. सांगून बघा की, अहो, ज़रा थोडी वाट द्या माझ्या डोळ्याना, ही इकडे, या उजव्या बाजूला! तुमचे बोल मला अडवितात पण गावेसे वाटते; त्या गीताची लकेर तिकडे तुमच्या पल्याड जावी असे वाटते! पण तुम्ही ती जाऊ देणार नाही. कृपा करा! अहो, अशाने माझ्या गाण्याचे सूर बदलतील, अर्थ बदलेल! तुम्हाला काहीच कसे वाटत नाही? घ्या, आता कसले गीत नि गाणे! काष्ट जळते तरी कोळसा उरतो, कोळसा जळाला तरी राख उरतेच की! पण हे एक जळणे – कोळसा नाही की राख नाही!

तथापि माझे ऐकायला कुणी तयार नव्हता, कारण मी मांगत होतो ते कुणाला ऐकूच जात नव्हते. जाणार कसे? मी चांगला हसत होतो, कौतुकाला प्रतिसाद देत होतो, हस्तांदोलन करीत होतो अगदी वाकून, साभिनय! एका हाती एक हात मऊ तळव्याचा; दुसऱ्या हाती आणखी दुसरा!

ही बंधने आताही भोवली. दहा वर्षांपूर्वीही भोवली. त्यावेळी सरोजा गोरे निदान दिसत तरी होती पण आता नजर शिणली तरी पुनः दिसली नाही.

असे एक स्वप्न दिसावे! स्वप्नच ते! त्यात काय वाटेल ते दिसू शकते; मोती माणकांचे डोंगर दिसतात, दह्या-दुधाच्या नद्या दिसतात, साय-लोण्याचे पर्वत दिसतात, हिऱ्या पाचूंची आंगणे दिस-तात! असेच एक स्वप्न दिसावे; कुठे तरी नजर स्थिर व्हावी; असा एक रंग उमटावा–मोसंबीच्या फोडीसारखा! त्या रंगात एक

**केशवसुत :** आधुनिक काव्यदर्शन!

**(नव) कवि :** मज्जेची निज जो फुले पसरतो आयुष्य मार्गावरी
अद्भुत (?) कां अधिक ते त्याहुनि काहीतरी?

रेखा उमटावी–निशिगंधाच्या देठासारखी! अशी एक आकृती साकार व्हावी; ती कांचनकाया बघता बघता उगीच वाटावे की, चंद्रलोकीच्या वा इंद्रलोकीच्या रूपकुंडातून आंघोळ आटोपून कुणी अप्सरा अशी वाऱ्याच्या उघड्या रथात आरूढ होऊन अभिलाषांच्या अश्वांचे रज्जू हाती रूळवीत भरवेगाने जात आहे. जाता जाताचा एक कटाक्ष, पाऱ्याच्या धारेसारखा ! आता बघावे, आता दिसावे अन् बघता बघता रथ क्षितिजापल्याड जावा; मनाने आसावून हाक द्यावी – थांब !

स्वप्नगोफ तुटतो. जाग येते. बघावे तर आपल्याच छवड्याचे चिमुकले हात गळ्यात असतात ! ते स्वप्न अन् हे वास्तव ! दोन्ही हवेहवेसे ! पण जे गेले ते खरे वाटते; आहे ते स्वप्न वाटते !

व्याख्यात्याच्या स्वागतासाठी गळ्यात घातलेले हार; हाती दिलेले गुच्छ. त्यांच्या शीतल सौरभाने सारे अंग शिरशिरत होते. पण त्यातूनही ते नेत्र दिसतच होते. मन ग्वाही देत होते की होय, नक्कीच ती सरोजा गोरे ! दुसरी कुणी असणेच शक्य नाही. दुसरी असती तर मला दिसलीच नसती ! पण ती आली कां ? कशासाठी ? आली ती आली अन् गेली कुठे ? भाषण संपवून मी हा असा घोळक्यात उभा आहे; हा आहे तो आहे; ही आहे, ह्या आहेत ! साता रंगांच्या सातशे छटा दिसताहेत ! फक्त तेवढा एकच रंग दिसत नाही— डोळे मिटल्यावर जो दिसतो तो; गेली दहा वर्ष दिसत आला सतत तो ! हे वास्तव सगळे व्यर्थ आहे. अर्थ गवसेल तो आता स्वप्नात ! त्यासाठी झोप यायला हवी ! तीच तर निघून गेली आहे !

कौतिकाच्या शब्दात डुंबत होतो– 'वाऽवा ! भाषण पण भाषण !' ...'अय्या ! नाही का ग मनू ! परवा ओंकारनाथांची नीलांबरी ऐकली तेव्हा अस्संच वाटलं होतं !'... 'अग खरंच, गाणं कळलं नाही तरी एवढं समजतं बरं !'

हारांच्या फुलांचे ओझे वाटत नाही; गोड साखरेच्या शब्दांचा भार जाणवत नाही ! पण तरी मन गुदमरत होते; आतल्या आत टाहो फोडीत होते; विनवून सांगत होते की अहो, मला तुमचा चहा नको, केशरी दूध नको; शिणलो आहे मी ! दया करा नि मला मुक्कामी जाऊ द्या; पोचवायला पण येऊ नका. मी जाईन एकटा टॅक्सीवाल्याच्या सोबतीने; तो मजकडे बघणार देखील नाही. तो बघेल आपले मीटर. मला निवांत मागच्या सीटवर एकट्याला बसू देईल; त्याची टॅक्सी गरगर भरभर अंगाई गाईल !

खरेखोटे हसून सगळ्यांचा निरोप घेतला. मुक्कामी जायला टॅक्सीत बसलो. पण तेथे पोचून तरी काय अन् न पोचलो तरी काय ? आता हे कबूल आहे की, माझ्या या निवासात छान सोय आहे. या

गावात हॉटेल्स किती छान ! एक वेळ व्याख्यानाला येऊ नये पण खायला प्यायला ल्हायला तरी यावे. माझ्या या अंगुरी निवासात माझी सोय एका हवेशीर एकांत खोलीत केली आहे. मऊसा पलंग आहे तिथे; गाद्यागिरद्यानी सजलेला कोच आहे; तळव्याला गुदगुल्या करील असा गालिचा पूर्ण खोलीभर अंथरला आहे. आरस्यानी न्हाणी आहे. एकटे एकटे राहणे जड जाईल अशी ऊब आहे. वटण दावले तर वारा भिरभिरतो; खिडकीतून बघितले तर गुल्मोहराचे वन फुललेले दिसते; फुलदाणीत ताजी फुले सजविली आहेत. उशांच्या अभ्यांवर शेवंती फुलली आहे; निवासाचे झकपक कपडे वापरणारे नोकर दिमतीला आहेत; इशारा केला की ते आत येतात; पाऊल न वाजविता हवे ते चोज पुरवितात; जा म्हटले की निमूट जातात; जाताना इवलीशी कुठे धूळ दिसली की पुसून टाकतात; हळूच आपल्यामागे दार लोटून घेतात. दार देखील जपून जावून हळूच 'कट' असा आवाज करून वंद होते व आतल्या माणसाला हवा तसा, हवा तेवढा निवांत एकांत देते.

सरोजा, आज माझ्या या मनाच्या मोहरल्या अवस्थेत तू दिसायला नको होतीस. आज मी धुंदफुंद होऊन बोललो. मलाच ते आतल्या आत जाणवले. तू दिसलीस म्हणून साधले का ते? आज नसती दिसलीस तर...? न दिसता दिसत होतीस तेवढेच मला पुरे होते. खरे म्हणजे मी जे काय वागतो ते तुझ्यासाठी; जे काय बोलतो ते तुला उद्देशूनच ! याहून अधिक काही तू अगदी पहिलीवहिली दिसलीस तेव्हापासून मी अपेक्षिले नव्हते. मी माझा होतो; तू तुझी होतीस ! दहा वर्षांपूर्वी रोज माझ्या दारावरून टिटवी जावी तशी जात होतीस; पाहिले न पाहिलेसे करून पुढे पाऊल टाकत होतीस; तुला ठाऊक होते मी बघतोय् तुझ्याकडे म्हणून; मला कळत होते, तू बघते आहेस मजकडे म्हणून; तू अन् तुझी माणसे माझ्या ओळखीची होती; त्यांच्यात मी मिसळत होतो – तुला वगळून ! मी अन् माझी माणसे तू जाणत होतीस्, अन् मला वगळून तू साऱ्यांशी हसत खिदळत होतीस !

पण या अबोलीत सगळा अर्थ होता. राखली जोपासलेली आपली अंतरे.... त्या सोवतीच्या भरवशावरच तर मी अजून देखील माझा मीच आहे एकटा, म्हणूनच दुकटा ! कधीही डोळे वंद केले की तू समोर उभी ठाकायचीस्, जादू नगरीतल्या यक्षकन्येससारखी ! या तृप्तीने मी तुडुंब होतो; आणखी मला काही नको होते.

आज मात्र तू ऐलतीराचे पैलतीर करून टाकलेस ! माझे भाषण सगळे ऐकत होते पण माझे बोल माझे नव्हत हे कुणी जाणत नव्हते– कदाचित तू सुद्धा ! मला सगळ्यांनी उचलून धरले पण माझा तोल मजजवळ राहिला नव्हता. असा निमिषानिमिषात उजव्या बाजूला मी नजर वेघून.....एवढ्यात असे असे कुठून तरी शब्द उमटले... तू ऐकलेस ते ?...कुणी तरी बजावीत होते–अरे, भाषण काय ऐकता ! जरा दूर रहा, बाजूला व्हा; त्याच्या जवळ जाऊ नका; जायचे असेल तर आधी अशी तीनदा त्याच्या भोवती रेघ ओढा; कारण, त्याच्या ओठी बघा कशाने तरी भरलेला पेला आहे.



## अजाणाहुनी अजाण हे मन !

अजाणाहुनी अजाण हे मन . . . रूपबावरे.
बघे त्याहाळून रूप आपुले
पहाट ताज्या दवबिंदूमधि–जळधारांमधि;
धुके उसळत्या गिरिकुहरामधि;
गहन गूढशा आभाळामधि.

रंग पाहते–अंधुक, धूसर, गडद घन सम.
बघते आकृति बिंदू, रेषा, कोन, परिघशा,
नव्या नव्या आकृति बांधातुन.

अजाणाहुनी अजाण हे मन. कळे न त्याला
त्या रंगामधि डुबतो आपण
कळे न त्याला, आकारांचे
पडते आहे–स्वतांस बंधन.

अवघे आरसे फोडून जर का,
पाहिल ते, आपणामधि आपण
रूप आपुले–आरसा आपण
दिसेल त्याला–बघता बघता.
स्वच्छ जळाच्या पुऱ्या तळाशी
प्रवाहातुनी घुळघुळणारे
प्रवाहवेडे असंख्य कांही—
ज्याच्यावरती मुळि न ठरावा
श्वासाचाही स्पर्श जरासा.
नजरेमधे मुळी न यावे रंग जयाचे.
मुळि न असावे आकारांचे ज्याला बंधन.
असेच कांही सुंदर भीषण . . .
कधी न होईल जे शब्दांकित.

–इंदिरा

असा मी धुंद होतो ! म्हणून तर उजवी नजर रिकामी परत आली तेव्हा उंच इमल्यावरून तोल गेल्यागत किंकाळी फुटली !

टॅक्सीने अंगुरी निवासात आणून सोडले. खोलीबाहेर वेटरने खडी ताजीम दिली –

"सलाम साव."

"तस्लीम ! सुनो वेटर..."

"हाँ साब !"

[पृष्ठ २०० वर पहा]









# संगीत ठावनशयणी

—विद्याधर गोखले

सिद्धहस्त नाटककार श्री. पु. ल. देशपांडे ह्यानी 'वटाटयाची चाळ' रंगभूमीवर मोठ्या कुशलतेने उभारली; त्यानंतर एकपात्री नाटकांची जोरदार लाट उठली. कित्येक जण या लाटेने सुखावले; कित्येक गुदमरून गेले! 'जुन्या वहुपात्री घरंदाज नाटकांचे मारून मुटकून एकपात्री नाटक वनविणे हा मेषपात्री वा कुपात्री प्रयोग होय' अशीहि टीका झाली. त्या टीकेच्या गदारोळात आम्हास शिरावयाचे नाही. तथापि, एकपात्री नाटके त्या नाट्य-प्रकाराचे विशिष्ट तंत्र नि मर्यादा लक्षात घेऊन लिहिली व केली तरच रोचक होऊ शकतील, हे आमचे मत येथे नमूद करून ठेवतो.

वस्तुतः हा नाट्य–प्रकार तसा नवीन नाही. म्हणूनच पु. ल. देशपांड्यानी त्याला 'वहुरूपी खेळ' हे नाव दिले; कीर्तन हेहि एक प्रकारचे एकपात्री नाटकच, असे सांगितले. कै. दिवाकरांच्या नाट्यछटांची गणनाहि एकपात्री लघुनाट्यात करावयास पाहिजे.

तथापि, फारच थोड्या लोकाना हे ठाऊक असेल की, प्राचीन भारतात अनेक संस्कृत एकपात्री नाटके होऊन गेली. त्याना 'भाण' असे म्हणत. 'पद्मप्राभृतक, धूर्त-विट-संवाद, उभयाभिसारिका, पादताडितक' हे चार भाण कालदृष्ट्या नि गुणदृष्ट्याहि आद्य असून, त्यांच्या संग्रहाला 'चतुर्भाणी' असे नाव आहे. या चतुर्भाणीचे उत्कृष्ट भाषांतर, विद्वत्ताप्रचुर प्रस्तावनेसह, डॉ. मोतीचंद्र व डॉ. वासुदेवशरण अग्रवाल ह्यानी 'शृंगारहाट' नामक ग्रंथात केलेले आहे.

संस्कृत एकपात्री नाटके (भाण) गुप्तकाळात, चौथ्या–पांचव्या शतकात, ऐन वहरात होती. या नाटकातील संस्कृत भाषा सुबोध नि चटकदार आहे. ती विद्वानांची ग्रांथिक भाषा नसून, सामान्यजनांची दैनंदिन व्यवहारातील जिवंत भाषा आहे. कुठे कुठे ती मर्यादा सोडून शिवराळ नि अश्लील होते; पण तिचा ठसका नि जल्लोष रसिकाना अप्रतिम वाटतो.

या एकपात्री नाटकांचा सांचा साधारणतः ठरून गेलेला आढळतो. विट (आपुक–मापुकांचा मित्र नि मध्यस्थ) हाच त्यांचा नायक. अर्थातच शहराच्या वेश्यावस्तीची त्याला खडा न् खडा ओळख असते. वहुशः एखाद्या कामार्ताचे एखाद्या कामिनीशी सूत जुळविण्यासाठी, अथवा अशाच प्रकारच्या एखाद्या अन्य कार्यासाठी, हा चतुर मध्यस्थ वारांगना–वस्तीत जातो. त्या वस्तीतील हमरस्त्यावर अनेक प्रकारची पात्रे त्याला भेटतात. त्यांच्याशी होणाऱ्या संभाषणाची मालिका म्हणजेच हे एकपात्री नाटक.

**त्याला म्हणण्याजोगते कथानक नसतेच. समाजातील लंपट लब्धप्रतिष्ठितांच्या ढोंगांचे, उल्लू जवानांच्या शृंगार–चेष्टांचे, गणिकांच्या नाज–नखऱ्यांचे–मदनबाधेचे–गायन-नर्तनादि कलाचे आणि ठकवाठकवीचे चित्रण त्यात आढळते. गुपचूप हिरव्या माड्या चढणारे भोंदू बैरागी, भिक्षू, पुराणिक सोवळे ब्राह्मण हे देखील विटाच्या उपरोधिक वाक्ताडनातून निसटू शकत नाहीत.**

अशा प्रकारच्या प्राचीन 'भाणा'ची —एकपात्री नाटकाची—ओळख मराठी रसिकाना व्हावी म्हणून, आम्ही चतुर्भाणीच्या धर्तीवर एक नवीन भाण लिहिला. **त्याचा संक्षिप्त पहिला अंक केवळ झलक म्हणून येथे सादर केला आहे.**

**हजार-दीड हजार वर्षांपूर्वी देखील मनोरंजक नि उद्बोधक एकपात्री नाटके भारतात होतीच!**
**त्या नाटकाना वाट पुसत लिहिलेले एक अभिनव शृंगारमत्त एकपात्री नाटक--अर्थात् 'भाण'--**

'चतुर्भाणीत' उज्जयनी वा पाटलीपुत्र येथील वेश्या-वस्तीचे चित्रण आहे. पण त्याऐवजी मराठी मनाला अधिक जवळची वाटणारी वस्ती आम्ही पार्श्व-भूमि म्हणून निवडली. दुसऱ्या बाजी-रावाच्या कारकीर्दीतील वैभवशाली पुण्याच्या 'बावनखणी'चा रंगेल परिसर हेच या भाणाचे घटना-स्थळ आहे! रसिकाना हा नमुना रुचला, तर संपूर्ण बावनखणी लवकरच रंगभूमीवर सादर होऊन, 'भाण' या जुन्या नाट्यप्रकाराचे पुनरुज्जीवन होऊ शकेल.

—लेखक.

**[ नांदी ]**

**सूत्रधारः—वंदन रति-रमणा, मनहर काम-**
**देव मदना।**
**नसुनी शर ते खरतर त्याचे**
**जिंकी जो भुवना ।।**
**जरी जाळिले सदाशिवाने**
**अनंग होउन त्या तीराने**
**रंगविले शत रंग उधळुनी रसिक-**
**रंग-सदना!**
**याचा सुटतां तीर सणासण्**
**वदति तपोधन व्याकुळ होऊन,**
**'जळो जळो ते जप-तप-साधन,**
**मिळो चंद्र-वदना!'**

[नांदीनंतर सूत्रधार जातो आणि विट 'खंडोशंकर माडीवाले' प्रवेश करतो.]

**खंडोः—जलधर आला बरसत धारा।**
**वाहे शीतल सुगंध-वारा।**
**कामिजनांचा धीर डळमळे,**
**जैसा चंचल पारा!**
**नोंकझोंक दावितां दामिनी**
**चपल-यौवना जशी कामिनी**
**मन-हरिणावर निशी दिन होतो**
**फुलबाणांचा मारा!**

अहो, असा हा वर्षाकाळ! ऐशा समयी बड्या बड्या संयमी पुरुषांचे चित्त देखील विषय-सुखासाठी चंचळ होते. मग रंगेल इष्कियारांचे मन किती व्याकुळ होत असेल! या ऋतूत मुसळ-धार पावसानं वनातील वणवा विझतो; पण मनातील इष्काचा अंगार दुप्पट भडकतो!...हं, हे बघा या सत्याचं मूर्तिमंत उदाहरण—म्हणजेच दानशूर दातार-साहुकारांचा हा कुलांगार बेटा श्रीधर! सूर्यापोटी शनेश्वर! बहुधा रात्र-भर बावनखणी पालथी घालून, सकाळी उलथा झालेला हा पदनमूर्ख थकलेल्या शरीरानं घराकडे निघाला आहे!... अरे नाही. स्वारी इकडेच वळली की!.... यावे यावे, श्रीधरपंत इकडे कोणीकडे पायधूळ झाडली?

"अहो तिने तिकडे लाथ झाडली, म्हणून आम्ही इकडे पायधूळ झाडली! खंडोशंकर, या पुण्यपत्तनात ऐसा कोण पुरुष आहे की, जो बावनखणीत काही भानगड उद्भवली की, तुमच्याकडे येत नाही?"

—स्तुति पुरे श्रीधरपंत! भानगड काय झाली?

"कसं सांगू?....जरा लाज वाटते हो!"

—लाज वाटते? आश्चर्यम्! अहो **'इश्काची ज्याला खाज! तथे न धरावी लाज! रोजच्या रोज, दररोज। कोळूनी प्यावी!!**.....



. . .अहो, आधी जो लाज कोळून पितो, त्यालाच गणिकांची अधर-सुधा प्यायला मिळते महाराज !

"नको, नको. अधर नको नि सुधाहि नको."

—काय सुधा सुद्धा नको? मग हवं तरी काय?

"प्रायश्चित्त ! मजकडून महान् पातक घडलं आहे. म्हणजे ती चंदा नाइकीण नाही का? तिच्यावर आम्ही मुश्ताक झालो,; तिच्याकारणे बहुत धनसंपदा वेंचली! . . . . ."

—मग यात पाप ते कसलं? चंचल लक्ष्मी चवचाल बावनखणीत खर्च होणं, हाच समसमा संयोग !

"ते खरं, पण असं असूनहि परवा रात्री त्या वेपर्वा मिजासखोर गणिकेनं आमची विनंति ठोकरली!"

—ती कोणती?

"आम्ही तिच्या हाती शंभर होनांची थैली ठेवली अन् पायावर डोकं ठेवून विनवणी केली. पण तिनं आमच्या डोईवर लाथ हाणली! म्हणाली—दूर व्हा. मी फक्त नाच—गाण्याचे जलसे करणारी कलावती आहे. शरीराचा बाजार मांडणारी कलावंतीण नाही! 'आम्ही पुनः विनंती केली; पण पुनः तिनं मस्तकावर लाथ मारली हो!"

—अरेरे, या माजोर कलावंतिणीना आजकाल ही फार वाईट खोड जडली आहे. जिनं वस्तुतः गोडगोड मुरका मारायचा अथवा पटकन् डोळा मारायचा, तिनं लाथ मारली? बरं पण तुमची विनंती तरी काय होती श्रीधरपंत ?

"अहो अगदी साधी. ब्राह्मणाला शोभेल अशी ! मी म्हणालो—

[लावणी]

**मी शुचिर्भूत ब्राह्मण । दे ग रतिदान ।**
**आजला पुण्य पर्व—काळी ।।**
**मज सुरत—यज्ञ साजिरा कराया**
**दे काया कोवळी ।।धृ।।**
**तव रूप चकाकित ऐना—माशुक मैना ।**
**या बावनखणीचा गहिना—गजगमना!**
**कां उगांच ना ना म्हणसि ब्राह्मणा,**
**या मंगल वेळी ! !—**
**दे आलिंगन—भोजना—गुणिजनां !**
**दे अधरपान चुंबना—दक्षिणा !**
**तुज मिळेल मग ते पुण्य; धन्य तू**
**मदनाची पुतळी !**

पण कसचं काय नि कसलं काय? तिनं डोक्यावरच लाथ मारली!"

—नाइकिणीची लाथ? आणि तीहि डोक्यावर ? ज्या मस्तकात वुद्धिमत्तेचे वटाटे अन् कामवासनेचे कांदे खच्चून भरले आहेत त्या मस्तकावर ?

"होय हो. ज्या मस्तकावर ब्राह्मण्याच्या पताकेसारखी संजावदार शेंडी फडफडत आहे आणि कंगणिदार पगडी सावकारी वभव मिरवीत आहे, त्या मस्तकावर! म्हणूनच आमच्या कुळाचे करारी आद्यपुरुष वावूराव दातार माझ्या स्वप्नात आले नि म्हणाले—बाळा श्रीधरा, आपल्या थोर कुळात गणिकेची लाथ खाण्याचं पाप कधीहि घडलं नव्हतं! तेव्हा तावडतोव प्रायश्चित्त घे!"

—(स्वगत) धन्य धन्य ते करारी बाणेदार दानशूर वावूराव दातार! थोरले बाजीराव साहेव उत्तरेत स्वारीला गेले तेव्हा त्यानी श्रीमंताच्या चरणी मोहरांच्या थैल्याच्या थैल्या ओतल्या! आणि म्हणाले, 'श्रीमंत, शिवरायाचा झेंडा तुम्ही दिल्लीच्या तख्तावर रोवणार ! अशा कार्यासाठी आम्ही दान दिलं नाही, तर आमच्या बेचाळीस पिढ्या रौरवात जातील. मराठी रियासतीच्या तेजाळ तरवारीचे पाणी दिल्लीशाहीला दिसावे म्हणून, आम्ही या दौलतीवर पाणी सोडले!" . . . .अहो कुठे ते कर्तव्यपरायण सावकार, कुठे ते सरदार, कुठे ते धर्मपरायण ब्राह्मण; आणि कुठे हे आजचे विषय—परायण शेणकिडे ! कुठे ते धर्म—कार्यासाठी दान करणारे दातार; आणि कुठे हे वारांगनाचे रतिदान मिळावे म्हणून लक्ष्मीला बावनखणीत नेणारे नादान! बाकी नवल कसले? यथा राजा तथा प्रजा! . . . . . . .आज ब्राह्मण भ्रष्ट झाले, क्षत्रिय नतद्रष्ट झाले म्हणूनच सरकारवाड्यांचे कुंटणखाने बनले! ज्यांचे नखहि पूर्वी दिसत नव्हते अशा गरती, आता अर्धा ऊर उघडा ठेवून रस्त्याने डोळे मोडीत चालू लागल्या! या कुलांगनाच जर वारांगनासारख्या वागू लागल्या, तर त्या श्रीधरपंतासारख्या पुरुषाना धरबंध कसा राहील? ज्ञानेश्वर-तुकाराम—रामदास—यांचे अभंग सोडून, श्रीमंतच जर तमासगीरांच्या संगतीत अन् शे-दीडशे उनाड मैनांच्या पंगतीत इष्काचा रंग उधळू लागले, तर राज्यलक्ष्मी

[पृष्ठ २०२ वर पहा]




**स्फूर्ती :** कांठोकांठ भरू द्या पेला फेस भराभर उसळू द्या
प्राशन करिता रंग जगाचे क्षणोक्षणी ते बदलू द्या.



**जोरात फोडलेल्या डरकाळीने सारं रान थरारून गेलं. झोपलेली माकडे दचकून जागी झाली. अनेक माकडे तोल जाऊन बदाबद खाली पडली. वाघाची गुरगूर उठली. अंतःकाळच्या वेदनेने उठलेला चित्कार झाडाखालून उठला........**



रणजित देसाई

भर दुपारी रानातल्या पिकल्या उंबरावर ते माकड बसून होतं. उंबरं खाऊन त्याचं पोट भरलं होतं. सारी माकडे झाडाच्या शेंड्यावर उन्हात अंग शेकत बसली होती. हुप्या एका झाडाच्या शेंड्यावर बसून साऱ्यांच्यावर नजर ठेवत होता. माद्या त्याच्या आजुबाजूला निरनिराळ्या उद्योगात मग्न झाल्या होत्या. तरुण नर झाडाच्या दुसऱ्या भागात येईल तो उंबर, उंबरपानांची फळे तोंडात चघळत बसले होते. त्यांचं लक्ष वारंवार हुप्याकडे जात होतं. एकादा नर जरी माद्यांच्या बाजूला सरकला तरी हुप्या दात विचकीत होता. त्याच्या भुवया विस्फारल्या जात होत्या. काही लेकुरवाळ्या माद्या आपल्या पोरांच्यासह झाडाखाली उतरल्या होत्या. लहान बच्चे आईची शेपूट धरून वारकी फळे चावडीत होती.

ते माकड हे सारं शांतपणे पहात होतं. बगला खाजवीत बसून होतं. अचानक खालच्या माकडानी चित्कार केला. साऱ्यांचे डोळे खाली लागले. पोरं पटकन् आयांच्या पोटाला बिलगली. आणि आया झाडावर झेपावल्या. डोळे ताणून सारी बघत होती.

दोन तीन चितळे चरत तेथे आली. खाली पडलेली उंबरे ती खाबू लागली. तणावलेली माकडांची अंगे सैल पडली. माद्या परत खाली उतरल्या. मोठी पिलं आया सोडून चितळांच्याकडे गेली. चितळ धावले की, ती झाडाकडे पळत होती. परत खाली उतरत होती. एक नर याचा फायदा घेऊन हळूच झाडाखाली उतरला. माद्या त्याच्याकडे पहात होत्या. एक मादी सरसरत खाली उतरली. आणि हुप्याने संतापाचा हुंकार दिला. साऱ्या जंगलावर तो घुमला. खाली उतरलेला नर गडबडीने आपल्या पूर्वस्थळी गेला आणि कारण नसता इतरावर दात विचकू लागला.

खाली उतरलेली मादी काही झालेच नाही अशा अविर्भावात बसून राहिली. चितळे मनसोक्त चरत होती. त्याचवेळी एका नराने कान टवकारले. त्याचे पाखरलेले कान फिरू लागले. आपली शिंगे पाठीला भिडवून डांगळाने नाकपुड्या रुंदावून वास घेतला, 'मॅक्' असा आवाज करून तो उधळला. पाठोपाठ माद्या उधळल्या.

चरणाऱ्या माकडानी केव्हाच झाडाचे शेंडे गाठले होते. हे सारे पहात बसलेल्या, आळसावलेल्या माकडाने गडबडीने शेंडा गाठला. हुप्याने परत हुंकार दिला. रानावर शांतता पसरली. ते माकड आपल्या कुतूहलपूर्ण नजरेने चारी बाजूला बघत होतं. आणि त्याच्या नजरेत प्रथम ते आले. नकळत त्याचे दात विचकले गेले.

वडाच्या झाडाजवळच्या झुडपातून वाघ येत होता. पिवळे काळे पट्टे अंगावर तळपत होते. शेपटी दमदारपणे हेलकावे घेत होती. वाघाचे दर्शन होताच माकडाने जोराने चित्कार केला. साऱ्यांची नजर झुडपाकडे वळली. फार वेळ वाट पहावी लागली नाही. दुसऱ्याच क्षणी वाघ झुडपातून बाहेर आला. त्याने आपली नजर झाडावरून फिरवली. त्या नजरेबरोबर झाडावर एकच गोंधळ झाला. सारं रान माकडांच्या चित्कारानी आणि हुप्याच्या हुंकारानी भरून गेलं. या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारीत माकडे ओरडत होती.

वाघ शांतपणे झाडावर चाललेला कोलाहल ऐकत होता. आपली भेदक नजर टाकत होता. मिशा पिंजारून गुरकत होता. वाघाने जमीन हुंगली. हुंगत हुंगत तो बुंध्यापाशी आला. आणि तो मुतला. मुताचा उग्र वास दरवळला. वाघाने परत एकवेळ झाडावर नजर टाकली. आणि वाघ चालू लागला. वाघ दिसेनासा झाला.

चित्कारणारी माकडे एकदम थांबली. वाघ गेला त्या दिशेला सारी पहात होती.

"हा वाघ गेला कुठे? कुठे गेला हा वाघ?"

त्या माकडाने दुसऱ्या झाडावर उडी घेतली. पाठोपाठ बाकीचे नर झेपावले. माद्या पिलाना सावरीत धावल्या. हुप्याने अलगद उडी घेतली. वाघ नजरेत येत नव्हता. माकडे झाडांच्या शेंड्यावरून जात होती.

कुठे गेला वाघ? कशासाठी ? काय करणार?

आणि परत वाघ दिसला. माकडांचा आरोड उठला. संतापाने वाघाने डरकाळी दिली. माकडांच्या जीवाचं पाणी झालं. अंगात कापरा भरला. झाडांचे शेंडे घट्ट पकडून दात विचकत ती बसून राहिली. शेपटी फडकावीत वाघ निघून गेला.

वाघ का ओरडला? कशासाठी?

माकडे झाडांच्या शेंड्यावरून जात होती. खालून जाणाऱ्या वाघाला पहात होती. वाघालाहि ते सरावाचं झालं होतं. तो सावकाश जात होता. माकडांची भीति वाढत होती. वाघावरची नजर सुटत नव्हती.

वाघाच्या मनात आहे तरी काय?

दिवस मावळायला आला. तरी वाघ शांतपणे चालतच होता. पोरांचं ओझं सावरीत धावलेल्या माद्या थकल्या होत्या. हुप्याचे केस फुलले होते. वाघ पठाराजवळच्या वडाजवळ आला. वडाचं झाड डेरेदार मोठं होतं. अनेक पारंब्यानी सजलं होतं.

वडाची फळे खाण्यात गुंतलेली डुकरे वाघ येताच पसार झाली. वाघ वास घेत होता. तो सरळ झाडाखाली गेला. आणि त्याने अंग पसरलं. वडाच्या झाडावरून माकडे पहात होती. वाघ शांतपणे आपल्या जीभेने अंग साफ करीत होता.

पण वाघ इथे बसला कां? पुढे कां जात नाही?

रानावर रात्र पसरू लागली. तरी माकडांचा चित्कार चालूच होता. वाघाचे पिवळे पट्टे अंधूक होऊ लागले. पोटाचा पांढरा पट्टा तेवढा दिसत होता. हळू हळू तोहि अंधारात लुप्त झाला. चंद्राचं फिकट चांदणं फाकू लागलं. त्यात वाघाचं धापणारं पोट दिसत होतं. दिवसभर ओरडून, फांद्यावरून झेपावून माकडे पुरी दमली होती. वाघाकडे बघत असतानाच त्यांचे डोळे बसल्या जागी मिटू लागले. जंगलावरून जाणाऱ्या घुबडा– वाघळांची फडफड ऐकू येत होती. केव्हा तरी रानात उठलेला घुबडाचा घुत्कार जंगलावर घुमत होता. रात्र वाढत होती. बसल्या जागी माकडे झोपी गेली होती. मनातला वाघ दडत होता. थकलेल्या माकडाने कष्टाने डोळे उघडले. वाघाचं वरखाली होणारं पोट दिसत होतं. माकडाने परत डोळे मिटले.

वाघ पण झोपला असेल का?

जोरात फोडलेल्या डरकाळीने सारं रान थरारून गेला. झोपलेली माकडे दचकून जागी झाली. अनेक माकडे तोल जाऊन बदाबद खाली पडली. वाघाची गुरगुर उठली. अंत:काळच्या वेदनेने उठलेला चित्कार झाडाखालून उठला. वाघ पंजे आपटत होता. झाडाखाली धडपड वाढली होती.

!!.......???.....?

एकदम दचकून जागे झालेल्या माकडाने तोल सावरण्याचा प्रयत्न केला. पण आधार मिळाला नाही. एक चित्कार त्याच्या तोंडून बाहेर पडला. वेगाने ते जमिनीकडे जात असता त्याने हात आधार शोधत होते. अचानक हाताला फांदी लागली. ती त्याने घट्ट पकडली.

सारं रान हेलकावे घेत होतं. वाघाचं गुरगुरणं आणि माकडांचा कोलाहल यानं त्याचे कान भरून गेले. कापऱ्या अंगानं सांपडलेल्या फांदीला बिलगून ते



माकड पहात होतं. वाघ काहीतरी चाव-डत होता. त्याच्या दातात हाडं फुटत होती. शेपटी बडवल्याचा आवाज येत होता. माकडाला ते दृश्य दिसलं. वाघ फार जवळ आहे हे त्याच्या लक्षात आलं. त्यानं आपला पाय लांब केला. आणि तो पाय जमिनीला लागला.

जमिनीचा स्पर्श होताच माकडाचे डोळे विस्फारले गेले. जमीन कां हलते हे त्याच्या ध्यानी आलं. हाती आलेली फांदी नसून पारंबी आहे आणि आपण जवळ जवळ जमिनीवरच आहो हे ध्यानी येताच सारं बळ पणाला लावून माकड झेपावलं. त्यानं फांदी गाठली आणि मोठा चित्कार केला. फांदीला बिलगून ते धापत होतं. सारी माकडं तशीच फांद्याना बिल-गून धापत होती. खालचा आवाज ऐकत होती. भीतीनं राहून राहून चित्कारत होती.

वाघ कुठेच दिसत नव्हता.

परत रानावर शांतता पसरली. माकड फांदी घट्ट धरून झोपी गेलं. मधून मधून ते जागं होई. आणि परत झोपी जाई.

पहाटेला रान कोंबड्यानं बांग दिली. रानातले इतर कोंबडे त्याला साथ देऊ लागले. उजाडू लागलं. रानावर उजेड फाकू लागला. माकडाने डोळे उघडले. एक दीर्घ जांभई दिली. एकदम ते गप्प झालं. अंगावर भीतीचा कापरा उठला. वाघ आठवला. माकडाने डोळे विस्फारून जमिनीकडे पाहिलं. नजर फिरता फिरता एके ठिकाणी स्थिर झाली. फिक्या उजेडात रक्ताचे थारोळे दिसत होते. तुटलेला एक पाय दिसत होता. . .

भीतीने माकड जोराने किंचाळले. सारी माकडं पुरी जागी झाली. साऱ्यांची नजर जमिनीवर खिळली. आणि क्षणात् माकडांच्या आवाजाने झाड भरून गेलं.

ते माकड अजूनहि थरथरत होतं. दात विचकत आजूबाजूला बघत होतं.

वाघ! कुठे आहे वाघ?

माकडाचे डोळे स्थिरावले. शेजा-रच्या जाळीत विसावलेला वाघ माकडांच्या ओरडण्याने जागा झाला होता. अंग तणावून तो उभा राहिला. माकडाने मोठ्याने चित्कार केला. साऱ्यांची नजर वाघावर खिळली. आणि परत माकडांचं ओरडणं उठलं. फांद्या-वरून उड्या मारीत, भीतीनं थरथरत माकडे दात विचकत होती.

वाघानं झाडावरून नजर फिरवली आणि तो चालू लागला. वाघ दिसेनासा झाला. माकड ते पहात होतं. एकदम सारं शांत झालं.

वाघ गेला कुठं? काय करणार?

त्या माकडाने चित्कार करून दुसऱ्या झाडावर झेप घेतली. त्याच्या पाठोपाठ भीतीनं भारलेली माकडे वाघ कुठे निघाला, काय करतो हे पहाण्यासाठी झेपावली.

●●●





अनुक्रमणिका

आत्म्याला देखील आशा
सुटत नाही. चौऱ्याऐंशी लक्ष योनी
फिरून आत्मा नरदेह मिळावा म्हणून
तडफडतो; पण सध्याच्या
काळात ते शक्य होईल का ? जिकडे
जावे तिकडे 'प्रतिबंद', 'प्रतिबंद' आणि
'प्रतिबंद'. बा आत्म्या, राहा;
आता अनंत काळपर्यंत रांगेव तरंगत राहा.



जयवंत · दळवी

मी खाटेवर स्वस्थ पडून होतो. एका वेगळ्याच अवस्थेत! अंगावरील कपडे आणि त्यावरील गळ्यापर्यंत पसरलेली सफेद चादर फेकून द्यावी असे वाटत होते. लोकांच्या दृष्टीने मी घटका मोजत होतो. पण खरे सांगायचे म्हणजे मी काहीच मोजत नव्हतो. आयुष्यभर मोजमाप करता करताच या अवस्थेस आलो होतो. त्यामुळे आता घटका सुद्धा मोजण्याची इच्छा नव्हती. आणि घटका मी कां मोजावी ? आसपास जमलेली मंडळी मोजमाप करीतच होती. मी आणखी कशाला त्यात वेळ घालवू ? थोड्या वेळाने मी माझे डोळे मिटणार हे मला निश्चित कळून चुकले होते. म्हणून उरलेल्या वेळेत डोळे उघडे ठेवून मी सर्वांची तोंडे पाहात होतो.

थोड्या वेळाने मी या देहाचे वस्त्र टाकून सुटणार होतो. मग या देहावर तरी हे आणखी कपडे कशाला? धोतर, खमीस आणि वर चादर! पण ते फेकून देण्याची ताकद नव्हती. गंमतच आहे! ताकद संपली की, देहाचे वस्त्र टाकता येते. पण देहावरची वस्त्रे टाकता येत नाहीत. कारण देहावरची वस्त्रे टाकून द्यायला ताकद लागते. ती आता उरली नव्हती. म्हणून तसाच पडून होतो. पोरांनी तर चादर गळ्यापर्यंत आणून ठेवली होती. म्हणजे मी डोळे मिटण्याचाच अवकाश की, ती माझ्या तोंडावर पसरता यावी. घाई! घाई! सगळीकडे नुसती घाई!

भोवती जमलेली सगळी माणसे चितातुर होती. चितातुर—चिता अधिक आतुर! आतुर अधिक! त्यांचेहि खरेच? असून खोळंबा!

पण ही चिंता कशाला? आणि ती खरी आहे का? आत्मा आणि मन यातला फरक अद्याप मला कळलेला नाही. कदाचित् आता कळेल. पण एक



गोष्ट कळली आहे. शरीर हे आत्म्याचे वस्त्र असले तरी चेहरा हे मनाचे वस्त्र आहे. मनात काही नसले तरी चेहरे बदलून सोंगे घेता येतात. त्यामुळे भोवतीची सारी माणसे चिंता दिसावी म्हणून चेहरे आक्रसून उभी होती. उभी कां? बसा—बसा! जातो थोड्या वेळाने!—पण बोलवले नाही. हाताने बसा म्हटले. तर "काय हवंय्, आप्पा?" असे विचारीत मंडळी जवळ धावली. उभ्या आयुष्यात मात्र काय हवे म्हणून कोणी विचारले नाही.

तेवढ्यात डॉक्टर आला. आपण मला जगवू शकणार नाही हे या इसमाला वालंबाल माहीत होते. पण किमान स्वतःला जगता यावे म्हणून त्याने पटापट दोन इंजक्शने दिली. कसली कोण जाणे! नुसत्या पाण्याची सुद्धा असतील! आता माझ्या अंगात पाणी राहिले नव्हते हे त्याने ओळखले होते. त्याने माझ्या बरगड्यांवर नळी ठेवून आतला आवाज ऐकला. मनगट धरले. ते पिचले होते हे त्याच्या लक्षात आले असावे. म्हणून त्यानेही स्वतःची चेहरेपट्टी आक्रसून घेतली. (चिंता दिसावी म्हणून!).






आणि हरीला जवळ बोलावून म्हटले, "हरी, आता काही उपयोग नाही!" उपयोग नाही कसा? इंजेक्शनाचे पैसे आणि 'व्हिजिट–फी' तर पदरात पडली? वर टॅक्सी भाडे ! (चालतच आला असेल!) हे सारे घेणार ना? मग काही उपयोग नाही म्हणजे काय?–पण बोलायची ताकद नव्हती.

"हरी, आप्पाना आता थंड पडू दे!"

हं! आप्पा थंड पडावा म्हणून केवढी घाई! ऊब यावी म्हणून इंजेक्शने दिली आणि वर थंड पडू दे म्हणतो! हलकट! संतापामुळे मात्र थोडी ऊब आली.

"आता ते घटका मोजताहेत!"

मी काही एक मोजत नव्हतो. मोजण्याची इच्छा झाली असती तर मी घटका न मोजता पळेच मोजली असती. (एक घटका म्हणजे साठ पळे !) कुणाला आता इथे रहायची इच्छा आहे?

"शेवटची घरघर लागली आहे!"

ते ऐकून आणखी संताप वाढला. आणखी थोडी ऊब आली. अशी ऊब येत राहिली तर इथला मुक्काम वाढेल! आपण थंड पडले पाहिजे!

"वासा. . . ." बोलायचे होते. पण जीभ लडवडली.

"अरे वासू. . .वासू. . ." अशी एक हाक मारून कुणी तरी वासुदेव खरेला बोलावून जवळ आणले.

वास्तविक वासुदेव खरेला मी बोलावीत नव्हतो. त्याच्याकडून कर्ज घेतले होते ते फेडले नव्हते. ते तो आता मागेल म्हणून घाबरलो. म्हणून मानेने नको. . . नको म्हटले.

"नका नका देऊ! कोण मागतोय्? तुम्ही बरे व्हा!" असे वासुदेव खरे म्हणाला.

बरे व्हा! म्हणजे मग वसुली करतो. कोण बरा व्हायला बसलाय्?

"वास. . ." जीभ लडवडली.

"कसला वास येतोय्?" असे हरीने विचारले.

मग मला काय काय आवडायचे त्याचीच चर्चा सुरू झाली. आंबट वरण, पुरण पोळी, लालमाठाची भाजी. करा करा म्हटले त्यावेळी काही केले नाही. आणि आता चर्चा करताहेत. पण आता त्याची इच्छा राहिली नाही. मानेने नाही नाही म्हटले.

"वासां. . ."

"घराला वासे? घालू घालू!" हरी छपराकडे बघत म्हणाला.

छे! मला म्हणायचे होते, "वासांसि जीर्णानि यथा विहाय! आता जातो."

पण तेवढ्यात फक्कन् आवाज झाला, आणि बाटलीचे बूच उडावे तसा वर उडालो. एकदम रडारड झाली. पण मला मात्र हलके हलके वाटले.



**"ते खालच्या कावळ्यांचं काम, आम्ही वरचे कावळे. . . . . ."**

छपराचे नळे फुटलेच होते. त्यामुळे भोकातून वर जाणे सोपे गेले. जाता जाता मी मागे ठेवलेल्या शरीररूपी वस्त्राकडे (किंवा वस्त्ररूपी शरीराकडे) वळून पाहिले. तर दचकलोच. देहाचे डोळे उघडेच होते. ते मिटायला हवे होते. पण डोळे मिटण्याआधीच मी गेलो हे या पोराना कसे कळले? ते असो. आता मागे फिरणे नाही. आणि फिरायचे तरी कशाला? तो पाहा. हरी उठला आणि त्याने माझ्या मृत देहाचे डोळे मिटून घेतले. डोळे मिटावेत म्हणून केवढी घाई!

म्हणता म्हणता तरंगत तरंगत वर आलो. मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही असे म्हणतात. पण ते तेवढेसे खरे नाही. मेल्यानंतर सुद्धा स्वर्ग दिसेपर्यंत खूपच पल्ला गाठावा लागतो. बराच वेळ तरंगत रहावे लागले. स्वर्ग दोन बोटे उरला म्हणतात त्यात काही अर्थ नाही. आसपास बरेच आत्मे माझ्यासारखेच तरंगताना दिसले. त्यातला एक तरंगता तरंगता जवळ आला.

त्याला मी म्हटले, "वेग येत नाही?"

तो म्हणाला, "तेरा दिवस हीच स्पीड! सदर्न मराठा! फिफ्टीन एम पी. एच."

"पण खाली पडण्याची भीति नाही ना?"

मला भीति त्या वासुदेव खरेची!

"छे-छे!" तो म्हणाला, "आता ३६५ अप! नो डाऊन ट्रेन!" असे म्हणत त्याने शिट्टी मारल्यासारखा आवाज केला.

"आवाज कसला आला?"

"शिट्टी मारली! लाईन क्लीअर आहे!"

"म्हणजे?" मी गोंधळलो.

"सवय!" तो हसला आणि म्हणाला, "पस्तीस वर्षे होतो रेल्वेगार्ड!"

"लाईन क्लीअर म्हणजे काय?"

"खाली पिंड नेला की, लाईन क्लीअर!"

असे म्हणत त्याने पुनः शिट्टीचा आवाज काढला आणि वेगाने वर सरकला. पाहिले तर तो फ्रंटियरवरून गेल्यासारखा वाटला.

दहा बारा दिवस असेच तरंगत तरंगत काढले. फिफ्टीन एम. पी. एच !

तेवढ्यात आसपास काव काव-काव काव असा आवाज आला. पाहतो तो काही कावळे वेगाने वर चालले होते. त्यातल्या एकाला अडवून मी म्हटले.

"इथे काय करताय्? खाली जा ना !"

कावळा म्हणाला, "का. .काव?"

"उद्या आमचं तेरावं!"

"काव. . .काव?"

"काव काव काय? आमचा पिंड कोण नेणार?"

"ते खालच्यांचं काम ! आम्ही वरचे !"

"वरचे म्हणजे?"

"आम्ही मेलेले कावळे! आमचे आत्मे वर चालले."

"पण एवढ्या वेगाने?"

"आम्ही माणसं नव्हे! आम्हाला तेरावं नाही!"

"तुमचा पिंड?"

"आमचा पिंड वेगळा!"

(पिंडे पिंडे मतिर्भिन्नः म्हणतात ते हेच असावे!)

"वेगळा म्हणजे?"

"आम्ही जिवंतपणी पिंडासाठी तडफडतो. तुम्ही माणसे मेल्यानंतर पिंडासाठी तडफडता!"

मला ते ऐकून राग आला. त्या चिडवण्यासाठी मी म्हटले, "कावळा म्हणे मी काळा!"

तो म्हणाला, "असू दे! तुम्ही काय आहात माहित आहे. आमचा पिंड वेगळा, तुमचा पिंड वेगळा. आम्ही जे काही करू ते सगळं उघड उघड! खुल्लंखुल्ला! पोटासाठी उघडपणे करू! भूक लागली की, काव काव करू! उडण्यासाठी फडफड! छिद्रावर चोच मारू, पण पोटासाठी. पोट भरलं की आम्ही उडून जाऊ. तुमचा पिंड वेगळा. तुमचं पोट भरलं तरी तुमची आतून काव काव चालूच. दुसऱ्याच्या नाशाने आतल्या आत फडफड! स्वतःचं पोट भरलं तरी चोच मारण्यासाठी तुम्ही दुसऱ्याची छिद्रं शोधणार!"

यत्किंचित् कावळा हे म्हणतो. ते ऐकून संताप आला. संताप आल्यावरोबर एकदम दरीत कोसळल्यासारखा मी खाली घरंगळलो. पण पृथ्वीवर नव्हे!

तेवढ्यात काव काव करीत कावळा वर गेला.

काय गंमत आहे! आपण जिवंतपणी आत्म्यासंबंधी इतके बोलतो (आत्मिक बल, आत्मिक उन्नति, आत्मिक प्रभाव, आत्मिक समाधान वगैरे!) की आत्मा फक्त माणसानाच आहे असा समज होतो. पशु-पक्षी आत्म्यासंबंधी बोलत नाहीत. पण त्यांचा आत्मा अधिक चांगल! त्यानी देह टाकला की, चालले वर! आम्ही मात्र तेरा दिवस काव काव, खाव खाव करीत पिंडासाठी खाली!

तेवढ्यात एकदम चक्कर येऊन पडावे तसा मी खाली पडलो. पडलो तो एका कावळ्याच्या पाठीवर

वास आले. आंबट वरण, पुरण पोळी, माठाची भाजी. करून खाऊ असे म्हणाले असतील खाली! मी तावडतोव पिंड न्यावा म्हणून. कावळ्याने थवकत थवकत पिंडापाशी नेले. मला वेळ काढायचा होता. पण कावळ्याला घाई! त्याचेहि बरोबर! एका पिंडासाठी त्याने तरी किती वेळ काढावा? डोक्यावर सामान घेतले की, रेल्वेचा हमाल सुद्धा थांबत नाही. माझे ओझे घेऊन कावळ्याने कां थांबावे? तरी बराच वेळ कावळ्याला अडवून धरले. पण भटजीला घाई! बेट्याने आत्म्याची गय न करता दर्भाचा कावळा तयार केला. म्हटले, ही नामुष्की नको. निदान सर्वज्ञानी आत्म्याची अशी नामुष्की नको! म्हणून कावळ्याला ढिला सोडला. कावळा पिंड खाताना थोडा वेळ घुटमळतो. ते पाहून पोटात कावळे पडल्यासारखे वाटले. पण क्षणभरच! मग लक्षात आले की, आता आपल्याला पोटच नाही. ती जाणीव होताच खूप हलके वाटले. कारण पोट खूपच जड! मेलेल्या मुड्याचे डोके जड होते. पण जिवंतपणी डोके हलके आणि पोट जड! का एकेक धर्म आहेत शरीराचे! पण आता सुटलो त्यातून!

मग मात्र चांगलीच स्पीड आली. गार्ड म्हणाला होता ते खरे. स्पीड वाढली. सरळ वर वर! खडखडाट नाही. गडबडाट नाही. अक्षरशः स्वनातीत! वर...वर...वर...!

तेवढ्यात समोरून जबरदस्त वेगाने बाण येताना दिसले. तसा कमालीचा घाबरलो. झटक्यासरशी बाजूला झालो. तर बाजूला आगीचा डोंब! पळता भुई ..छे! इथे भुई कुठे? पळता अवकाश थोडे! पळ पळ पळालो. इथे पळावे तर बाण! तिथे पळावे तर आग! क्षणभर वाटले, मेलो, मेलो, जळालो, जळालो!

तेवढ्यात हाः हाः हाः असा हंसण्याचा आवाज आला.

"कोण हसतंय्?" मोठ्याने ओरडलो.

भूतलावर लोक एकमेकाना हसतात. म्हटले, तीच कटकट इथे आहे की काय?

"कोण..कोण हसतंय्?"

तर तो म्हणाला, "मी!"

"मी कोण?"

"अहं!"

अहंपणाचा क्षणभर राग आला. क्षणभर वाटले, कोणी तरी विद्वान असावा!



**"मी नाफडे गुरुजींचा आत्मा; आम्ही सर्व गुरुजी सारखेच!"**

"कोण अहं?"

"मी आत्मा!"

"कोणाचा?"

"नाफडे गुरुजींचा!"

"मी ओळखत नाही. आम्हाला कुणी नाफडे गुरुजी नव्हते!"

"नाफडे गुरुजी नसतील. पण कुठल्यातरी गुरुजीला ओळखत असशील ना?"

"होय!"

"मग झालं तर! आम्ही सर्व गुरुजी सारखेच! एकाच माळेचे—" गुरुजी हसले.

भोवती बाण सुटत होते. आग भडकत होती.

मी म्हटले, "गुरुजी, मी मरणार!"







अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



अनुक्रमणिका

"तू मरूनच वर आला आहेस, बाळ!"

"मला बाळ म्हणता? मी पंच्याहत्त-राव्या वर्षी मेलो, गुरुजी!"

"आम्ही सर्वांनाच बाळ म्हणतो! आम्ही गुरुजी ना?"

"गुरुजी, हे बाण छातीत घुसतील, आगीत भस्म होईन!"

ते हसले, आणि म्हणाले,

"बाळ, संस्कृत शिकला होतास ना?"

"होय?"

"मग विसरलास?"

"काय ते?"

"नैनं छिदन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः। —श्लोक विसरलास?"

"नाय सर! पाठ आहे!"

"आमचंच चुकलं रे! आम्ही वर्गात श्लोक पाठ करून घेतले. पण अर्थ समजावून दिला नाही. आता तरी ऐक अर्थ—याला, म्हणजे आत्म्याला शस्त्रे तोडीत नाहीत, अग्नि जाळू शकत नाही. तसेच...."

"समजलं...समजलं.."

नाही तरी तासाची घंटा होईपर्यंत गुरुजी पंचेचाळीस मिनिटे बोलत राहिले असते.

"समजलं ना? हा अनादि नित्यसिद्ध निरुपाधि विशद्ध। म्हणउनि शस्त्रादिकी छेदु। न घडे यया।। —कोणी म्हटलंय्?"

शेवटी दु दु असले की ते ज्ञाने-श्वरांचेच असले पाहिजे!

"कोणी म्हटलंय्?" गुरुजींनी विचारले.

"ज्ञानोबानी!"

"गुड! करेक्ट! टेन!"

"टेन काय?"

"मार्क टाकले! जन्माची खोड रे! सुटत नाही. जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही म्हणतात. पण ते खोटं! नाही सुटत खोड!"

"ज्ञानोबांचं दर्शन झालं?"

"ते वर असतात. खूप वर!"

"इथंहि वर-खाली आहेच?"

"आहे रे! वर जायला गति लागते. परमेश्वर मृतात्म्यास सद्गति देवो असे खाली संपादकाने लिहिले म्हणून वर सद्गति मिळत नाही, बाळ! सद्गति मिळवावी लागते. त्यासाठी लोभ सुटावे लागतात!"

"तुम्हाला मिळाली सद्गति?"

"नाही रे! म्हणून तर असा मध्येच लोंबकळतोय्!"

"संत ज्ञानेश्वराना सद्गति मिळणारच!

"बोलून चालून संत ते."

"ज्ञानोबांचं दर्शन घडलं कीं नाही कधी?"

"एकदाच!"

"कधी?"

"आषाढीला आले होते एकदा!"

"मग मलाहि घडेल दर्शन आषाढीला?'

"छे-छे!"

"कां?"

"अलिकडे येत नाहीत ते!"



**टेक्स्टबुकवाले प्रोफेसर खुद्द ज्ञानेश्वराना ज्ञानेश्वरीचा अर्थ सांगत आहेत.**

"कां?"

"ज्ञानेश्वरीचा एक एक अध्याय एडिट करून टेक्स्ट बुक म्हणून लावून घेणारे काही प्रोफेसर इथं आले आहेत. ते ज्ञानेश्वरांची भेट घेऊन त्यानाच ज्ञानेश्वरीचा अर्थ सांगतात. तो अर्थ ऐकून ते एकदा वर पळाले ते खाली आलेच नाहीत!"

"म्हणजे मला संधि नाही!"

"नाहीच म्हणायला हवं!"

"पण गुरुजी, तुम्हाला कां नाही सद्-गति मिळत?"

"कशी मिळेल?"

"कां?"

"परवा पोरानी खाली प्लांचेट धरलं तर पेन्शनीचा हिशोब बरोबर झाला नाही हे सांगायला आम्ही खाली गेलो. भान राहिलं नाही! लोभ सुटल्याशिवाय कशी मिळेल सद्गति?"

"मी काय करू?"

"लोभ-राग सोडून दे!"

तेवढ्यात वरून कसली तरी सालपटे गळून पडताना दिसली. ती बघून मी घाबरलो. गुरुजीना विचारले, "गुरुजी, हे काय गळून पडतं आहे?"

गुरुजी म्हणाले, "हा गर्व गळून पडतो आहे, बाबा! वर वर जाणाऱ्यांचा गर्व गळून पडतो आहे. आत्मा शुद्ध होतो आहे. त्यासाठी गर्व गळला पाहिजे."

"पण गर्व खाली कुठं जातोय्?"

"म्हण माहित आहे ना?—गर्वाचं घर खाली!"

"पण प्राणांतिक उपोषण करून आत्मा शुद्ध होतो ना?"

"छे छे! तसल्या उपोषणाने गर्व वाढतो. मेद घटतो, पण गर्व वाढतो."

गुरुजींचे बोलणे चालू असतानाच एकदम अंगावर फुले पडू लागली.

म्हटले, "गुरुजी, ही फुलं कुठून पडता-हेत?"

"ते पाहिलंस ना? ते पुष्पक विमान—"

मी खूप वर पाहिले. प्रचंड गरु-डाच्या पाठीवर फुलानी सजवलेले विमान होते. ते विमान पाहून माझे डोळे दिपून गेले. संत तुकाराम सिनेमात तेवढे पुष्पक विमान पाहिले होते. पण त्या विमाना-खालचा गरुड मेलेल्या घारीसारखा दिसत होता. हा प्रचंड गरुड पाहून आत्मा संतुष्ट झाला.

गुरुजी म्हणाले, "ते पहा—भगवान पुष्पवृष्टि करीत आहेत!"

"कोणते भगवान?"

"आम्ही त्याना भगवान म्हणतो. तेहत्तीस कोटि देवांची नांवं कोण लक्षात ठेवणार?"

"पण ते पुष्पवृष्टि कां करीत आहेत?"

"अरे, पूर्वी ते पृथ्वीवर पुष्पवृष्टि करीत असत. सीतेने अग्निदिव्य केलं तेव्हा त्यांनी पुष्पवृष्टि केली होती. आठवतं?"

अनुक्रमणिका

"त्यावेळी मी नव्हतो. पण वाचलेलं आठवतं!"

"तेच! पण आता कोणी अग्निदिव्य करीत नाहीत. नुसतं जगणं हेच अग्निदिव्य आहे म्हणतात! देव म्हणतात, फुलं कां कुजवा? म्हणून ते स्वर्गातच पुष्पवृष्टि करतात."

अंगावर फुले पडली तेव्हा आत्मा शांत झाला.

पुष्पक विमानाला वघता वघता दृष्टि खूप वर गेली. तेथे एका उच्च शिखरावर भगवान श्रीकृष्ण दिसले. समोर अर्जुन होता. मी त्याना नमस्कार केला.

तेव्हा गुरुजी म्हणाले, "कोणाला नमस्कार केलास?"

मी म्हटले "भगवान श्रीकृष्ण उभे आहेत."

"संभवामि युगे युगे म्हणत गेली कित्येक युगे उभे आहेत."

"कां?"

"परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्। धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे।। असं सारखं म्हणतात. पण संरक्षण करण्यासाठी साधूच नाहीत. आणि दुष्टांचा नाश करावा तर ते साधूसारखे दिसतात. त्यामुळे विचारे भगवान श्रीकृष्ण गोंधळून संभवामि युगे युगे असं म्हणत युगे युगे तसेच उभे आहेत!"

"पण पृथ्वीतलावर साधूसमाज आहे ना?"

"त्याना सरकारनेच संरक्षण दिले आहे. मग भगवान श्रीकृष्णांच्या संरक्षणाला विचारतो कोण? भविष्य काळात साधूना दुष्टच संरक्षण देतील हे भगवान श्रीकृष्णाना तरी गीता सांगताना काय माहीत? असो!"

फिरून फिरून थकवा आला, तेव्हा मी गुरुजीना म्हटले, "गुरुजी, आता थकलो. थोडा वेळ झोपू आपण!"

तर गुरुजी म्हणाले, "छे छे! यावेळी खाली भूतलावर रात्र आहे."

"आता भूतलाचा आणि आपला संबंध काय?"

"असं कसं? आता आपण जागलं पाहिजे."

"पण कां?"

"या निशा सर्वभूतानां तस्या जागर्ति संयमी। – सर्व प्राण्याना जी रात्र तीत आत्मा जागृत असतो. आपण जागलं पाहिजे!"

आम्ही तसेच जागे राहिलो.

बोलता बोलता मी म्हटले, "गुरुजी, इथं एक पत्ता शोधून काढला पाहिजे."

"कुणाचा?"

"माझ्या सौभाग्यवतीचा–"

"कोण? सावित्रीबाई का?"

"हो! तुम्हाला काय माहीत?"

माझ्या बायकोचे नाव गुरुजीना कसे माहीत? छे! आपला संशयी स्वभाव काही जात नाही.

"काय माहीत? अरे आत्मा सर्वज्ञानी असतो. विसरलास?"

"मग कुठं आहे सावित्रीबाई?"

"इथं कुठं आहे? ती वीस वर्षापूर्वीच खाली गेली. तिचं लग्नसुद्धा झालं!"

"कुणाशी?"



## एकाकी

'तुम्ही' आणि 'तुझ्यासाठी'
शब्द सारे खोटे
खरी फक्त क्वचित् कधी
बिलगणारी बोटे

बिलगणारी बोटे तीही
बिलगून सुद्धा दूर
खोल खोल भुयारात
कण्हणारे सूर

दूर दूरच्या ओसाडीत
भटकणारे पाय
त्वचेमागले एकाकीपण
कधी सरते काय?

–शान्ता शेळके



अनुक्रमणिका

"पृथ्वीतलावर कुणाशी तरी–"
"छे-छे! हे कसं शक्य आहे!"
"छे–छे काय ?"
"शक्य नाही. ती दुसऱ्या कुणाशी लग्न करणं शक्य नाही. जन्मोजन्मी हाच पति मिळावा म्हणून ती वट-सावित्रीची पूजा करायची. कडक उपास-तपास करायची."

गुरुजी हसले.
"हसता कां?"
"तुम्ही नवऱ्यानी वडाची फांदी आधल्या दिवशीच आणून दिली, तर त्या बायका तरी काय करणार? कर-तात पूजा, आणि म्हणतात, हाच पति जन्मोजन्मी मिळू दे म्हणून ! त्या तरी काय करणार?"

"अशक्य ! अशक्य ! ऐकवत नाही."
"असा अस्वस्थ होऊ नकोस ! तुला तीच बायको पुढल्या जन्मी हवीय् का?"
"हवीच असं काही नाही."
"निश्चित काय ते सांग !"
"नकोच !"
"मग झालं तर !"

"पण हा फसवाफसवीचा धंदा आहे."
"आहेच मुळी ! म्हणूनच तर बायका नवऱ्याआधी मरायला धडपडतात. सवाष्ण असताना मरण येवो म्हणतात. म्हणजे समजलं ना? नवरा मरायच्या आधी मरायचं. म्हणजे नवऱ्यापासून सुटका होते. आणि नवरा मरून पुनर्जन्म घेण्याआधी या पुनर्जन्म घेऊन लग्न करायला मोकळचा !"

"छे-छे ! हे मुळीच सहन होत नाही. निदान या फसवाफसवीचा जाब विचारायला तरी मला खाली गेलंच पाहिजे ! पुनर्जन्म घेतलाच पाहिजे."

असे म्हणत मी अक्षरशः खाली येण्याचा प्रयत्न केला. तर गुरुजी म्हणाले, "घाई नको. रीतसर परवानगी काढू."
"कोणाची?"
"ते पहा–"

वर पहातो तर खांद्यावरचे पंख हाल-वीत काही जण तरंगताना दिसले.
"हे कोण?"
"हे देवदूत. त्याना सांग पुनर्जन्म घ्यायचाय् म्हणून !"
"पण अर्ज कसा वर सरकेल ?"
"कां?"
"येताना काही आणलं नाही. लांच कुठून देणार ?"
"छे-छे ! हे देवदूत आहेत. सरकारी अधिकारी नव्हेत."
"मग चला तर ! तुम्हीहि घेणार पुनर्जन्म?"
"सध्या नाही !"
"कां?"

"खाली मास्तरांचे पगार वाढल्या-शिवाय जाण्यात काय अर्थ ? आणि पुढल्या जन्मी सुद्धा आम्हाला मास्तरकी-शिवाय दुसरं काही जमेलसं दिसत नाही. तूर्त तरी पुनर्जन्म नको."

असे म्हणून गुरुजींनी मला देवदूताकडे नेले आणि पुनर्जन्माची परवानगी घेऊन दिली. ती परवानगी मिळाल्यावर मी हळूहळू खाली खाली सरकत गेलो.

पण काही जमेना. विशिष्ट अंतर तोडल्यावर आणखी खालीच जाता येईना. तेव्हा कळले, की सध्या पुनर्जन्म घेणे कठीण आहे.

मग सरळ पुनः वर आलो.
तर गुरुजी वाट बघत हजर होते. मी तत्काळ परत येईन असे त्याना वाटत होते की काय कोण जाणे !

म्हणाले, "काय झालं ? विचार बदलला?"

मी म्हटलं, "तुम्ही वाट पाहात होता ती कशी? मी परत येईन अशी खात्री होती?"

"छे छे! मी तुझी वाट बघतच नव्हतो. कुणी ना कुणी येतच असतात. भेटायचं?"

"मला परत यावं लागलं !" मी म्हटले.
"कां?"
"सध्या पुनर्जन्म शक्य दिसत नाही?'
"कां?"
"सगळीकडे लूप बसलेत!" एवढे म्हणून मी तरंगत राहिलो. ●●●


'संरक्षण करण्यासाठी साधूच नाहीत!'










# कुट्टनीमतम्

—आनंद साधले

**दामोदरगुप्ताने अत्यंत कलात्मकतेने अत्युत्कट शृंगाररसाच्या उल्लासाची पार्श्वभूमि घेऊन त्यावर वेश्याव्यवसायात पडद्यामागे काय चालत असते त्याचे अखेर कारुण्याकडे झुकणारे मनोज्ञ चित्र रंगविले आणि यामागील आपल्या उद्देशाची कुणास शंका राहू नये म्हणून शेवटी तो उपदेश जाता जाता सांगून टाकला. उन्मत्त राजपुरुषाना त्यांच्या स्वैर वर्तनाची आणि वर्तनाच्या परिणामाची जाणीव करून देणे हे अशा कलात्मक मार्गानेच शक्य झाले असते.**

कुट्टनीमत म्हणजे कुंटिणीचा उपदेश. हे खडबडीत नाव एका रसरंगी संस्कृत काव्याचे आहे. काश्मीरच्या जयपीड राजाचा मुख्य प्रधान दामोदरगुप्त याने सुमारे बाराशे वर्षापूर्वी इ. स. ७६० च्या आगेमागे हा ग्रंथ रचिला. हा ग्रंथ तुलनेने गुणपूर्ण आणि रसाळ असूनही बहुशः उपेक्षितच राहिला. अनेक शतके तो नामशेष होता आणि अजूनही तसाच असता. विख्यात आंग्ल संस्कृत पंडित पिटर्सन दुर्मिळ हस्तलिखितांच्या शोधात असता त्याना १८८३ साली खंबायतच्या शांतिनाथ मंदिर भांडारात या ग्रंथाचे एक जीर्ण ताडपत्री हस्तलिखित मिळाले व त्यानी हा ग्रंथ प्रकाशात आणला. तरीही त्याचे भाग्य संपूर्ण उजळले असे नाही. त्याच्या क्वचित काही आवृत्त्या निघाल्या असल्या तरी अजूनही तो मोठा कष्टप्राप्यच आहे.

या शृंगारमधुर ग्रंथाच्या उपेक्षेला त्याचे प्रत्यक्ष नावच कारणीभूत नाही असे म्हणता येणार नाही. कुट्टनीमत हे नीरस आणि बटबटीत नाव अन्वर्थक असले तरी अनाकर्षक आहे. या नावाने या ग्रंथाची जी अवस्था केली आहे ती नावात काय आहे या शेक्सपीअरच्या प्रश्नाला पुरेसे उत्तर आहे. रूपाने पद्मिनी असणाऱ्या स्त्रीलाही धोंडी, फेंगडी, असल्या नावाचा उपद्रव झाल्याशिवाय कसा राहील ? याच ग्रंथाचे नाव मालतीविलास, गणिकाविलास असे कहीतरी असते तर याची भाग्यरेषा बदलती.

हा ग्रंथ विस्ताराने एकवीसशे ओळींच्या आसपास म्हणजे एखाद्या लहानशा महाकाव्याएवढा आहे. सामान्य रसिक याला भीत असले तरी साहित्यशास्त्राने त्याला मान्यता दिलेली आहे. दामोदरगुप्तानंतरचे शास्त्रकार त्यातील आर्यांचा मोकळ्या मनाने उपयोग करतात. ग्रंथाची भाषा प्रासादिक, रसाळ आणि ललित-मधुर असून विषय शृंगारपूरक आहे. सामान्य रसिकाच्याही हातात एकदा गेल्यावर ग्रंथ त्याच्या मनात जाऊन न पोचणे हे अशक्यच आहे. अमरुशतक, शृंगारशतक, भामाविलास अशा रसिकमान्य ग्रंथांची जी परंपरा आहे तिच्यात हा ग्रंथ वयाने, विस्ताराने आणि गुणानी बराच ज्येष्ठ आहे.

वेश्या म्हणताच नाक मुरडणे ही शिष्ट लोकांची सहज प्रवृत्ती आहे. वस्तुतः वेश्याव्यवसाय ही देवकल्पनेप्रमाणे अथवा धर्मसंस्थे-प्रमाणे एक संस्था आहे.

वेश्यावृत्ती हा एक व्यवसाय असला तरी क्वचितच कुणी हा व्यवसाय खुशीने स्वीकारते. ज्या अगतिकतेमुळे या व्यवसायाची

सक्ती होते तिचे आजचे स्वरूप अधिकांश आर्थिक आहे. पूर्वीच्या काळी हे इतके आर्थिक नव्हते. जातिपरंपरा आणि समाजपरंपरा यानी ही अगतिकता त्या काळी येत असे. आर्थिक अगतिकता ही अधिक क्रूर असल्याने तिच्यात भरडल्या जाणाऱ्या वेश्यांच्या व्यवसायात बाजारू धंदेवाईकपणा रसिक कलात्मकतेवर अधिकाधिक नागवे आक्रमण करीत आहे.

अगतिकतेचे स्वरूप कसेही असले तरी तिच्यामुळे वेश्यावृत्तीचा स्वीकार करणारी स्त्री प्रतिष्ठेला मुकते. ती पापिणी, अनीतीची खाण मानली जाते. रोगांचे आगर मानली जाते.

समाजात आणि साहित्यात वेश्यांचा विचार होतो तो वेश्या समाजापुढे जे प्रश्न उभे करतात त्यांचा विचार असतो. समाज वेश्यांपुढे कोणतेही प्रश्न उपस्थित करीत नाही काय ? वेश्याना समाजाकडून काय मिळत असते ? शारिरीक सूख की, मानसिक समाधान ? वेश्यांच्या जीवनात शारीर सुखाच्या महासागराला उधाण आलेले असते असे अप्रबुद्ध माणूसच म्हणेल. त्यांच्या शरीराला मिळते ते सूख नसते तर अत्याचार असतो. या अत्याचाराची आग कमी होण्याचा एकच संभव असतो. तो म्हणजे शारीरिक क्रियेत मानसिक सहसंवादाची जोड मिळण्याची संधी येणे. पण वेश्येला नेमके हेच टाळावयास हवे असते. तिचे कुणावर मन जडवून भागणार नसते. तिला मन मारावेच लागते.

कुट्टनीमत ग्रंथ सुरू होतो तो अशा गोंधळात पडलेल्या एका कोवळ्या गणिकेला पुढे उभी करीत. मालती तिचे नाव. ही तरुण असते; लुसलुशित असते; रसरशित असते; सुंदर असते. मदन त्याचे पुष्पधनुष्य ताणू लागला की त्या फुलातील परागकण कोसळत असतात. ते परागकण जमा करूनच विधात्याने मालतीला घडविलेली असते. अशा कुसुमगंधी सुकुमार सुंदरीपुढे जीवन म्हणजे जुईच्या फुलांच्या पायघड्यांसारखे व्हावे. पण ते तसे होत नाही. व्यवहाराचे काटे तिला सारखे टोचत असतात. त्यामुळे ती बुजते, वावरते, गोंधळते. मग तिला कुणी सांगते की, गुरूच्या उपदेशाशिवाय गति नाही. तेव्हा ती गुरूकडे जाते. ही गुरू असते एक कुंटिण. विकराला तिचे नाव. ती असते म्हातारी, कुरुप, दुनियेने ओवाळून टाकलेली, पण केलेली संवरलेली. तिला सारे माहित असते. मालतीसारख्या कोवळ्या पोरीना शिकविणे हाच तिचा व्यवसाय असतो. हा व्यवसाय मोठ्या जोरात चाललेला असतो. तिच्याकडे कोवळ्या गणिकांची रीघ लागलेली असते.

गणिकेच्या व्यवसायात तिची सखी, तिची माता, तिचे विट आणि चेट या साऱ्यांचा समर्थ सहकार लागतो. यातील एकादे अंग उणे असेल तर गणिकेच्या यशात तेवढी उणीव येते. विकराला एकाद्या कोवळ्या वेश्येला आपल्या पंखाखाली घेत असते तेव्हा नुसता कोरडा उपदेश न करता ती तिला सर्वांगानी प्रायोगिक आणि प्रात्यक्षिक मार्गदर्शन करीत असते. शिकावयाची तंत्रे अनंत असतात. परकराची नाडी सैल झाली अशा मिषाने ती कशी सोडावी आणि ती पुन्हा घट्ट बांधता बांधता आपली नाभी आणि कमरेवर उठलेला लालचुटुक कोवळा वण याचे दाहक ओझरते प्रदर्शन कसे करावे, किंवा कासोटा घट्ट करण्यासाठी सोडून निऱ्यांचा घोळ विसकटताना आपल्या प्रियकराचे काळीज त्या घोळात कसे गुंतवून टाकावे हे सारेच शिकावयाचे असते. विकराला सगळीकडे लक्ष देऊन सारे शिकवित असते आणि आपल्या शिष्येला यशाच्या शिखरावर नेत असते. ती मालतीचा शिष्या म्हणून स्वीकार करते आणि तिचे जीवन आकारते त्या उपनिषदाची कुट्टनीमत ही कहाणी आहे.

वशीकरणातील कौशल्य हेच गणिकेचे खरे सामर्थ्य असले तरी शारीरिक सौंदर्याचा सहकार असेल तर हे सौंदर्य अधिक फलदायक ठरते. मालतीची प्रथम भेट होते तेव्हा विकराला तिच्या सौंदर्याचे निरीक्षण करते.

—— निळ्या कुरळ्या केसांचा विशाल संभार, गोड हसणारे टपोरे डोळे, वर्णाची रसरशित सुवर्णकांति, पुनवेच्या चांदण्याचा प्रकाश ओतणारे दात, कोकिळेला लाजविणारा आर्त स्वर, मदनसाम्राज्याचा विस्तार सुचविणारे अटीतटीने चोळीत कोंवलेले ऊर, जोमदार उताराचे उटिपोट, सुवर्णघटाच्या डौलाचे नितंब, मांड्या, पोटऱ्या, घोटे, तळपाय, नखे— सारे नीट पाहून विकराला म्हणते,

"पोरी, एकटा मदनच काय, मदनांचे मोठे सैन्यच्या सैन्य लपू शकेल अशा सौष्ठवात तुझे रूपवन फुलारले आहे. या मदनसैन्याचे आक्रमण झाले की, कोण सुटू शकेल. जरा पाठमोरी हो बघू. अश्शी. आता चार पावले चाल बघू. छान ! छान ! छान !! पोरी, शब्दाला अर्थाचे संकेत जोडणाऱ्या पुरुषानी या सौंदर्याला नितंब असे नाव दिले आहे कारण याच सौंदर्याची त्याना निरतिशय अभिलाषा असते, निर्भर तमा असते. यावर त्यांचा डोळा पडत असतो. हंसीला हंसेल, हत्तिणीला लाजवील अशा तुझ्या डौलाने तू दोन पावले चालशील तर तुझ्या पावलाशी प्रेमिकांच्या प्राणांच्या पायघड्या पडतील."

नितंबाच्या डौलाची गोलता पावलांच्या घोटयात भारावून फुटू आली की, त्या टंच कोवळ्या टाचेखाली जीवाची घडी घालावी



अनुक्रमणिका

असे साऱ्याच कामुकाना वाटते. पण गणिकेने या साऱ्यांचाच स्वीकार करून भागणार नसते. हे एक स्वयंवर असते आणि तिला चोखंदळपणे आपला प्रेमिक निवडावयाचा असतो. तो धनवान हवा हे तर झालेच. पण तो विलासोन्मुख अशा सहजप्रवृत्तीचा असावा लागतो. योगाभ्यासी ब्रह्मचाऱ्यावर आपले विभ्रम व्यर्थ घालविण्यापेक्षा एखाद्या राजपुरुषाकडे एकच कटाक्ष टाकणे हितावह असते. सुखी संसारात रमलेल्यांपेक्षा विरही, विधुर हे हितकर असतात. चिंतनशील ब्राह्मणापेक्षा संगीतकार, चित्रकार असे कलाधन लोक अधिक रसानुकूल वृत्तीचे असतात.

विकरालेला नगरातील साऱ्या पुरुषांची इत्थंभूत माहिती असते. चिंतामणी नावाचा प्रधानपुत्र ती मालतीसाठी मनात योजिते. निवड झाल्यावर त्याला जाळ्यात गुंतविणे ही पुढची पायरी असते. आता काम असते सखीचे अथवा दूतीचे. सामान्य स्त्रियांच्या मैत्रिणी आणि गणिकेची सखी यात अंतर असते. गणिकेची सखी ही एक व्यावसायिका असते. ती "चतुरा प्रागल्भ्यवती परचित्तज्ञानकौशलोपेता वक्रोक्तिविभूषिता" अशी असते. दुसऱ्याच्या मनातील चलबिचल ओळखून सूचक बोलण्याचे चातुर्य हा तिचा गुण असतो. विकरालेने शिकविलेली मालतीची सखी चिंतामणीला गाठून त्याला म्हणते,

"आम्ही गणिका म्हणजे सांगून सवरून वदनाम स्त्रिया. तुमच्यासारख्या सुंदर, तरुण, कुलवान, गुणवान राजपुरुषाने माझी भेट घेण्यास संमती द्यावी हे माझे केवढे भाग्य !"———

"मी आले खरी. पण कसे सांगू आणि काय सांगू ? माझी मैत्रिण मालती तुमच्यासाठी वेडी झाली आहे, तुमच्यासाठी झुरत आहे असे मी सांगितले तर त्यावर तुमचा विश्वास कसा वसेल ? आणि तो बसावा तरी कां ? आमच्या जातीने धंदेवाईक बाजारबशा वृत्तीने अशी अपकीर्ती संपादन केली आहे की, आमच्यात एकादी मालती भांगेतील तुळस असेल, तिची खऱ्या जीवाची प्रीति कुणावर जडली असेल यावर कोण विश्वास ठेवील ? आमची प्रीति विफलाच रहायची. आम्ही झुरूनच मरायच्या. जातीची पापे जातील कुठे ?"

मिठ्ठास नखऱ्याने जेव्हा दूती हे सांगत असते तेव्हा तिची धूर्त नजर तिच्या शब्दाशब्दाचा परिणाम जोखत असते. बोलता बोलता हवा तो क्षण पकडून ती म्हणते,

"मालती झुरून इतकी आटली आहे की, आता माझ्या चोळ्या तिच्या अंगाला येतात."

आणि मग ती लाजरे मौन धरते. आपली चोळी म्हणजे लहानसहान प्रस्थ नाही यावर चिंतामणीची नजर पडेल अशी काळजी तिने आधीच घेतलेली असते. आपल्या ओढीने मालती आटली नव्हती तेव्हा ही चोळी तिला होत नव्हती हा विचार चिंतामणीला मोठा उबदार वाटतो. या उबेची कुठेतरी ठिणगी होते. तोवर सखी आपली वरीच सैल असलेली मेखला सावरते आणि म्हणते,

"ही मेखला किंचित् सैल होऊ लागली म्हणून तिने वापरावयाचीच सोडून दिली आहे."

चिंतामणीला वाटते. ही मेखला ! पूर्वी चपखल बसायची ! अजूनही किंचितशीच सैल होते ! ही कुठवर खाली उतरत असेल ? कशी दिसत असेल ? ठिणगी वाढते. विस्तार होतो. निखारा अंगारतो, जळू लागते, उलघाल होते.

सखी सांगत असते,

"मालती धंदेवाईक असती तर आज सोन्याच्या राशीवर वसती. मखमलीच्या गालिच्यांवरून चालती. तिचा एकादा तरी शब्द कानी पडून जन्माचे सार्थक व्हावे, तिचे ओझरते तरी दर्शन होऊन पूर्वपुण्य फळावे म्हणून किती लोक तिच्या घराभोवती घिरट्या घालीत आहेत. पुरुषाना सुख देण्याच्या साऱ्या कला तिच्या आईने तिला हौसेने आणि आशेने शिकविल्या. तिचा सहवास इंद्रालाही भाग्यदाता वाटावा अशी योग्यता तिला आणली. पण ऐनवेळी तुम्ही तिच्या नजरेला पडल्यावर आईच्या आशांवर पाणी पडले. मालतीला आता धंदाच करावयाचा नाही. तुमची भेट होणे तर अशक्यच ! कुठे तुम्ही. कुठे ती ! तुमच्यासाठी झुरून अखेर अकालीच ती सुकून जाणारा ! विधाता तरी किती अकरुण ! या गाठी तो बांधतो तरी कशासाठी ?"

चिंतामणीला तरी या प्रश्नाचे उत्तर कुठे माहित असते.



अनुक्रमणिका









# शूर जवान

**सूर्यकान्त खाण्डेकर**

**भारतभूचे उजळित आहे व्याकुळ पंचप्राण–**
**तो मृत्युंजय, तो योगेश्वर निर्भय शूर जवान!**
**आक्रमकांनी पुरे गांजिले या भूमीला जरी**
**जरी जीवनी लाख आपदा–काळोखाची दरी**
**अंधारातुन प्रकाशते ती गीतेची वैखरी**
**युगायुगातुन तीच राहिली स्फूर्ती देत महान !**
**एकाकी हे जवान अमुचे, एकाकी या पथी**
**कणाकणास्तव झुंजत पुढती, नाही कसली क्षिती**
**दुष्ट शत्रु हे धर्मनीतिला पायदळी तुडविती**
**पांडव अवघे कुरुपुत्रांची करिती दाणादाण!**
**नवधर्माच्या उदयापूर्वी संकट येई पुढे**
**मंत्र शांतिचा नवसंजीवक नेतो विजयाकडे**
**लक्ष लक्ष हे समर्थ सैनिक सदैव असती खडे**
**रणशूरांची अजिंक्य श्रद्धा, अजिंक्य धैर्य इमान!**
**एक दिलाने झटती सारे देशाच्या रक्षणी**
**आक्रमकांच्या उरात घुसती लखलखत्या संगिनी**
**लढता लढता विजयी होतिल हासत समरांगणी**
**भारतभाग्यविधाता आहे गिरिधारी भगवान!**
**तो मृत्युंजय, तो योगेश्वर निर्भय शूर जवान!**

काळजातील अंगार त्याला विचारतो. विधाता चुकू शकतो का ? कदाचित् विधात्याचा उद्देश आपली आणि मालतीची—

वेडचा, चिंतामणे, विधात्याचा तोच उद्देश बरे. सखी पुढे म्हणत असते,

"तुम्ही तशातले नव्हे.— पण — तिच्या आईची प्रार्थना आहे — तुम्ही एकदा दया म्हणून — तशातले काही नाही— तुम्ही क्षणभर नुसते तिच्याजवळ बसा. तिच्या पाठीवरून हात फिरवा. तशा हेतूने नव्हे. सद्भावाने."

ज्वाला पेटत असते. दया, परोपकार, सद्भाव यांची भुते त्या ज्वालेत नाचत असतात. सखी म्हणते,

"तुम्ही त्या भागात फिरलेले नाही. तिकडे जाण्यात तुम्हाला संकोच वाटणे साहजिकच आहे. तुम्ही तिकडे गेलात हे कोणाला कळणे हिताचे नाही. पण ते सारे तुम्ही माझ्यावर सोपवा. तुम्ही नुसते विश्वेश्वराच्या मंदिरात या. मी माझ्या पदराआड लपवून तुम्हाला तेथून घेऊन जाईन. माझ्यावर विश्वास ठेवा. कुणाला काही कळणार नाही.

"आम्हाला आपणाकडून दुसरे काही नको. गुंजभर धन नको. टीचभर वस्त्र नको. नुसती तुमची कृपा हवी. एकदा पायधूळ झाडलीत — क्षणभर तिला जवळ घेतलेत — तिचे अश्रू पुसलेत कदाचित् — कदाचित् पण तो तुमच्या कृपेचा प्रश्न. तिला तुम्ही अमुकच सुख द्या असे मी कसे म्हणू — पण तुम्ही तिला सुख दिलेत — ती तुमची वनमाला. तुम्ही तिचे कृष्ण झालात– तिचा उद्धार केलात —

चिंतामणीला वाटते ————

पण त्याचे वाटणे पुरे होण्याअगोदरच सखी म्हणते,

"तुम्ही कसले येणार ! एवढे कुठले आमचे भाग्य ! बायकांची जातच मेली वेडी. नको तिथे जीव लावते. कमलिनी सूर्यावर भाळते तो तिला जाळतो. चंद्रलेखा शंकराकडे जाते तर तो प्रेतांची राख चिवडतो. पुरुषांची जात पाषाणहृदयी. तिला पाझर कसा फुटावा ! ———

"मी तुम्हाला नाही बोल लावत. आमच्या जातीला लावते. आमच्या कर्माला लावते. मालतीला लावते. आपली पायरी न ओळखता तिने तुमच्या भेटीसाठी झुरावे, एकवेळ तरी तुमची भेट व्हावी म्हणून वळवळावे, सोन्यासारख्या सौंदर्याची माती करावी. तुमच्या एका स्पर्शासाठी ———"

अंती चिंतामणी मालतीच्या भेटीला येतो. सखीला वाटते, जिंकले. पण नाही. वाटेतच चिंतामणीला भेटतो एक परिचित. चिंतामणीला या मार्गात पाहून तो सारे ओळखतो. तो म्हणतो,

"तत् खलु सुरतं सुरतं कृच्छ्प्राप्यं यदन्यनारीषु ।।

अरे वेडचा, हे काय ? शृंगारसुख घ्यायचा हा का मार्ग ? बाबा, असले सुख नेहमी विवाहित परस्त्रीकडून लुटावे. त्यात जबाबदारी नाही. धोका नाही. आणि रंगत मात्र न्यारी. तू तर राजपुरुष. तू म्हणशील ती स्त्री तुला घरात घेईल ———"

चिंतामणी घोटाळतो. सखी तयार असते. ती म्हणते,

"वा ! वा ! या देवमाणसाला तुम्ही चांगले धंदे शिकवित आहात. चोरट्या परस्त्री प्रेमाची कसली महति गाता ? झुडुपात वा गवतात, खडकावर वा मातीत, गावदरीत वा स्मशानात, मध्यरात्री वा भरदुपारी, गोठ्यात वा धान्यावर का स्त्रीसुख घ्यावयाचे असते ? नदीवर पाण्याला वा बहिर्दिशेला जाणाऱ्या स्त्रियांमागे का वखवखत फिरावयाचे असते ? कुणी पाहील अशा भीतीने चोळीची गाठच सोडलेली नाही, कासोट्याला हातच लावलेला नाही अशा स्त्रीला झटपट जवळ घेऊन सोडण्यात सुखाची रंगत असते म्हणून तुम्ही या भोळ्या माणसाला सांगत आहात ? स्त्रीला जवळ घेतल्यावर तिच्या हुंकाराचा कलरव ऐकायचा की, तिच्या नवऱ्याचा पायरव ? शृंगारासाठीच सजलेल्या सहचरीच्या सहवासात सुरासुरांवर घोटाळत मैफल रंगवण्यात रसिकता असते की, कुठच्या तरी बोखट जागी कुठल्या

अनुक्रमणिका

तरी घामट परस्त्रीच्या ओशट ओठांचा खारट तुरट मुका चोरटेपणे घेण्याच्या झटपटीत ती असते ? मंदाकिनीच्या धारेखाली बसावयास निघालेल्या या देवमाणसाला तुम्ही कावळ्याच्या अंघोळीची महत्ता सांगत आहात. राजरोस सन्मार्गावर चालणाऱ्याला चोरट्या पापाची भूल घालीत आम्हात ? शी !"

त्यावर परिचित काही बोलतो. सखी काही. अंती सखी जिंकते.

चिंतामणी मालतीकडे येतो. आता काम असते मालतीच्या मातेचे. गणिकेची माता ही तिची जन्मदात्रीच असते असे नाही. सोन्याची खाण शोभावी अशी चाळिशीतील प्रौढ व्यावसायिका ही गणिकेची माता असते. तिचीही भूमिका घटविलेली असते.

'या. या.' म्हणून स्वागत करीत उठणे; हाताला धरून आपल्याच आसनावर नेऊन बसविणे; 'काय हे रूप ! माझीच दृष्ट लागेल बाई.' म्हणून गालांवर बोटे मोडणे; 'किती उकडतय् तरी बाई.' म्हणून पदराने वारा घालणे.

सोन्याचा पंखा हाताशी असेल तरी पदरानेच वारा घालावयाचा. त्याने आपुलकी चटकन् जुळते आणि पदर ढळून जी साधना अर्धवट साधावयाची ती पदर उचलून पूर्ण साधता येते. वारा घालता घालता पदर आपण आणि चिंतामणी यांमध्ये आणावयाचा असतो.

चिंतामणीला वाटते,

"किती भोळा भाव. चोळीची मधलीच दोन बटणे सुटली आहेत. आत दुसरेही काही नाही. ही असाच वारा घालीत बसली आणि सुटलेली चोळीची बटणे लावण्याचा मोह आपणाला अनावर झाला तर —— आणि इथे किती वेळ बसावयाचे ? मालती आहे कुठे ? ती विचारी वाट पहात असेल. आणि ही इथे — ही आई की वैरिण ?"

ती वैरिण असते चिंतामणीची. आई असते मालतीची. पण हे त्याला पटावयाचे नसते. आई म्हणत असते,

"तुमचे पाय या घराला लागले. आज घर पावन झाले. कातडीचे जोडे करावे आणि तुमच्या पायात घालावे —— मी मालतीची आशाच सोडली होती ––– किती समजूत घातली — मोठमोठे लोक पायांशी आले, धरणे धरून गेले. तो धनशेटी. नुसती ओळख होण्यासाठी दहा हजार सुवर्णमुद्रा देत होता. तो लक्ष्मीदास. कसलीही अपेक्षा न सांगता त्याने नवरत्नांचा हार पाठविला. पण त्याला स्पर्श तर सोडाच. हिने त्या हाराकडे पाहिले सुद्धा नाही. सारखी तुमची ओढ. तुमची आठवण ——– अरे ! काय तरी मी वेडी. मीच तुमच्याशी बोलत आहे. तुम्ही आत चला ना. या इकडून असे."

चार पावले चालून ती त्याला थांबवते. त्याचा हात धरते. त्याच्याकडे पाहून अर्थपूर्ण हसते. मग अगदी विश्वासाच्या सुरात त्याला हळूच सांगत असते,

"एक हं. रागावू नका. माझे तसे म्हणणे नाही. तुम्ही समजुतदार अहात. पण आईचे काळीज म्हणून सांगते. तिला संभाळून घ्या. तिला अजून अनुभव नाही. कुणाचा हात लागलेला नाही. ती भिईल. बावरेल. —— आणि ती कोवळी आहे. नाजूक आहे. तुम्ही येणार म्हणून फुलांचा हार करीत बसली त्यानेच किती दमून गेली. नाजूक कळी आहे. हळूच फुंकर घाला. हलक्या हाताने फुलवा – या असे. जा आत."

मालती आत असते. ती प्रेमार्त दिसावी असा साजशिणगार तिला दिलेला असतो. तिचा अभिनय बठविलेला असतो. छटेल भपका न दिसावा पण दैन्यही दिसू नये असे माफ्या घडणीचे चपखल अलंकार तिला लेवविले असतात. धूप दिलेले धुंद केस मोकळे सोडलेले असतात. वस्त्रे कुंदकळ्यांसारखी, हंसाच्या पिसांसारखी शुद्ध धवल आणि धूपगंधी असतात.

कुलीन स्त्रीच्या भेटीला कामुक जातो तेव्हा ती प्रत्यक्षात अस्वच्छ असली तरी त्याला तशी शंका शिवत नाही. उलट गणिका स्वच्छ असली तरी तिच्या प्रेमिकाच्या मनात अशुद्धीची शंका असते. ही शंका मुळातच जिरावी असे गणिकेचे दर्शन हवे असते. कांदालसूण तिला अभक्ष्य असतात. छिचोर रंग, उत्तान गंध तिला वर्ज्य असतात. जिथे मलीनता संभवतच नाही अशी शुचितेची सरस्वती पुढे उभी दिसावी अशी गणिकेची भूषा हवी असते.

चिंतामणी आत येतो. क्षणभराने त्याच्या डोळ्याना मंद प्रकाशाची सवय होते तेव्हा त्याला शुचिर्भूतदर्शना मालती दिसते.

विनम्र. अवनतमुखी तृप्तीची अभिलाषा आणि वैफल्याची आशंका यांच्या संघर्षाने संभ्रमित झालेली. बावरून किंचित् कापणारी. जराशी मलूल–अतिशय कोमल–आणि–आता पडेल असे वाटणारी.

तसे वाटते. चिंतामणी तिला आधार देतो. वेल वृक्षाला लिपटावी तशी ती त्याला लिपटते. आणि — हमसाहमशी रडूच लागते.

विचारा चिंतामणी ! बावरतो. विरघळतो. पाठीवर हात फिरवून तिचे सान्त्वन करू लागतो. सान्त्वन कसे करून घ्यावे हे

## आली, आली निवडणूक आली (१)




घेरा डालो !









अनुक्रमणिका



**प्रियकर अचानक घरी आला.** आता त्याचे मंगल कसे करावयाचे? पण ती तन्वी डगमगली नाही. नील कमलांची माला तिच्या जवळ नव्हती. पण तिने नीलनयनानीच एक लांब स्वागत-माला बनविली. तिच्याजवळ कुन्दाची, जाईची फुले नव्हती. पण तिने स्मितानेच पुष्पवर्षाव केला. अर्घ्य द्यावयास जलकुंभ नव्हते. आता काय करावयाचे ? संभ्रमामुळे अचानक कुचकुंभावर आलेले स्वेदबिन्दू कुचाग्रांवरून त्याच्या हातात सोडले आणि त्याला अर्घ्य प्रदान केले.

(अमरुशतक ४५)

मालती शिकलेली असते. स्त्रियांचे सारेच काही प्रेमिकाना सुखदायक असते. मालतीचा शोकही चिंतामणीला सुखद होऊ लागतो. पाठीवर हात फिरवून, हनुवटी धरून, डोळ्यात पाहून तिला धीर देणे त्याला रुचू लागते. ती त्याच्या आधारात विकल असते. सारे त्याच्या स्वाधीन करून.

तो तिला गोड गोड प्रश्न विचारू लागतो. त्याच्या छातीवर मान घासत ती हो नाही करते तेव्हा तिचे केस त्याच्या नाकात वेड भरीत असतात. ती हळू हळू हूं हूं म्हणू लागते. खुदकन हसू लागते. लाडे लाडे बोलू लागते. त्याच्या छातीत नाक खुपसू लागते. त्याला कशा तरीच सैरभैर गुदगुल्या होतात. ओठातले अंतर आटते.

ओठ ओठात बोलतात.

"वेडी. वेडी. मघा रडू कां आले ?"

"ते नाही तुम्हाला कळायचे. बायकांचे मन तुम्हाला ओळखता नाही यायचे. तुम्ही आलात ते परत जाण्यासाठी. मी वाटेकरीण दयेची. प्रेमाची माणसे दुसरीच. अमृतकुंभ हातात आला आहे. पण ओठाला लागण्याअगोदरच तो हरपणार आहे. अखेर तुम्ही तिचे हा विचार काळीज कुरतडतो. काळीज चिरले जात असता सूख कसे लागणार. तुम्ही आलात या आनंदापेक्षा तुम्ही जाणार ही व्यथाच मला असह्य झाली. शेवटी मी दयेची मालकीण. मी भिकारीण–"

"वेडे, मी तुझ्याकडे आलो तो रहावेना म्हणून. ओढीने. प्रेमाने."

"असे नका म्हणू. तशी माझी योग्यता नाही. मी तशी अपेक्षा करणार नाही. तुमच्या बायकोचे भाग्य मी लुटणार नाही. माहेरी नव्या मातृत्वात रंगलेल्या त्या साध्वीची स्वप्ने मी उधळणार नाही. मी तिचे शाप घेणार नाही. ती कंठातील रत्नमाला. मी पायींची वहाण. ती हृदयाची राणी. मी पायांची दासी. सुग्रास तो तिचा. उष्टे ते माझे."

मालतीला हुंदका येतो. चिंतामणी म्हणतो,

"नाही. लाडके—"

"अंहूं. ती लाडकी. मी पाहिली आहे तिला. किती सुंदर आहे ती. ती किती भाग्यवान. तिच्याकडून मिळणाऱ्या सुखात तुम्ही इतके तृप्त की, तुमची नुसती भेट होईतो माझी ही दशा झाली. पूर्वपुण्याईमुळे इतक्या दिवसांच्या आशा आज क्षणभर फळल्या तरी हारलतेचा जो शेवट झाला तोच माझा होणार आहे."

"हारलता ? कोण हारलता ?"

"माझी मैत्रिण ————"

वस्तुतः हारलता कोणीही नसते. ती असते एक काल्पनिक कहाणी. तिची नाइका हारलता मालतीसारखीच गुणपाल नावाच्या तरुणाच्या प्रेमात पडते. तो येऊन तिला काही काळ सुखवितो आणि मग सोडून जातो. तो विरह हारलतेला सोसत नाही. त्या असह्य दुःखाने तिचे हृदय पिचते आणि ती मरून जाते.

मालती ही कथा मोठ्या नाट्याने, सुरांच्या आरोहा अवरोहांवर आणि हुंदके आणि सुस्कारे यांच्या साथीवर सांगते. चिंतामणीच्या मांडीवर आरोहण करूनच ती वरारोहा हे शोकनाट्य रंगवीत असते. कधी त्याच्या मिठीत जाते. कधी कुशीला बिलगते. अनेक कोनानी आपल्या वळणांचे दर्शन त्याला घडविते. सान्त्वनाचा प्रतिसाद देणारा त्याचा हात त्याच्या प्रयत्नांशिवाय त्याला हव्या त्या अंगावरून फिरेल असे विकल पवित्रे घेते.

नाट्य चालते करुणेचे. फुलत असतो शृंगार. पाऊस पडतो अश्रूंचा. भडकून उठतो अंगार. मालतीला मिठीत चुरगाळीत, तिचे अश्रू ओठानी पिऊन टाकित चिंतामणी वचन देतो.

"मी कधीही तुला टाकून जाणार नाही. कधीही नाही."

ओठ मोकळे नसल्याने त्याचे शब्द तुटक असतात. पण वचन मात्र पुरे असते.

गणिका ही नटी असते. तिच्या प्रेमात भावना नसतात. नाटक असते. गणिका या नाटकाची नायिका असते तशी सूत्रधारही असते. ही सूत्रे ती कामशास्त्राने चालवीत असते. खोट्या विश्वासात त्याला गुंतवून खऱ्या आणाभाका त्याच्याकडून काढण्यासाठी.

कामशास्त्राच्या मर्यादा कामशास्त्र जाणते.

शास्त्राणां विषयस्तावद् यावन्मन्दरसा नराः
रतिचक्रे प्रवृत्ते तु नैव शास्त्र न च क्रमः ॥ वा. २।२

सहचर थंड असतो तोवर शास्त्राचा अधिकार चालतो. एकदा तो उन्मुक्त झाला की, कसले शास्त्र आणि कसले नियम ? गणिकेने मग फक्त काही अवधाने सांभाळावयाची असतात.

यद्यद्वांच्छति हन्तुं यद्रष्टुं यच्च विलिखितुं गात्रम्
तत्तदपसारणीयं सावेगं ढौकनीयंच ॥ १५४ ॥

गणिकेने प्रेमिकाचा विरस करावयाचा नसतो. त्याला जिथे वेदना करावीशी वाटेल तिथे करू द्यावयाची असते. त्याला जे पहावेसे वाटेल ते आता अधिक नखरे न करता पाहू द्यावयाचे असते. तो ९ करू म्हणेल ते करू द्यावयाचे असते.

मा मा मामतिपीडय मुंच क्षणमदय ना समर्थाऽस्मि
इति गद्गदास्फुटाक्षरमभिद्यातव्यस्वपा कामी ॥१५८॥

घसमुसळा, आडदांड, राक्षस अशी छद्म विशेषणे प्रकट करणारे लाडके शब्द बोलून आणि लाडक्या कृति करून त्याचे सामर्थ्य प्रत्ययकारी आहे अशी आत्मगौरवाची भावना त्याच्या मनात फुलवावयाची असते.

असमंजसमश्लीलं दूरोज्झितधैर्यमविनयप्रसरम्

व्यवहारमाचरिष्यसि वृद्धिमुपेते रतावेगे ।।१६०।।

जे शब्द स्वतःशी बोलायला एरवी लाज वाटेल, ज्या कृति मनात कल्पायला एरवी संकोच वाटेल अशा अशिष्ट कृति करावयाच्या असतात. असंमजस शब्द बोलावयाचे असतात. निर्लज्ज व्यवहार करून अविनयाने वागावयाचे असते.

अशी अनेक अवधाने असतात. या अवधानांचा कौशल्याने उपयोग करण्यावर गणिकेचे यश अवलंबून असते. जो निर्लज्जपणा क्षणापूर्वी केला असता प्रेमिकाला रुचणे शक्य नसते तो त्याच क्षणानंतर त्याला निरतिशय आनंदाच्या गुदगुल्या करणार असतो. हा क्षण अचूक ओळखण्याची वुद्धी हे गणिकेच्या कौशल्याचे गमक असते. स्वर्ग फुलणार नाही असे कुशल गणिकेच्या मिठीत प्रेमिकाला कधी वाटतच नसते.

चिंतामणीचा स्वर्ग फुलतो.

पण प्रपंच मांडलेला असतो तो चिंतामणीचा स्वर्ग फुलावा म्हणून नसतो. ते केवळ साधन असते. साधना वेगळीच असते. आता ती साधावयाची असते.

तृप्तीने मोहरलेली मालती शयनावरून उठलेली असते. शरीर स्वच्छ करून आणि हात पाय धुवून तिने सैल वस्त्र वेढलेले असते. पदर असतो–नसतो. काचोळी नसतेच. ती केस वळवीत असते.

फुललेली सूर्यफुले अजून मिटलेली नसतात. गुलावात अजून गुलाब असतात. कळ्यात अजून कळे दिसतात. मघा घडले ते अजून मनात घडत असते. जगज्जेत्याची तृप्त धुंदी चिंतामणी कृतार्थपणे अनुभवीत असतो. इतक्यात ——

वाहेर काही गलवला ऐकू येतो. मालती, दचकते, कानोसा घेते, घावरते. गलवला वाढतच जातो. मालती थरथरते. गुलाब विरतात. ती पांढरी फटक पडते. चिंतामणी काळजीने विचारतो,

"काय आहे ?"

मालती बोलत नाही. ती विकल होत आहेसे दिसते. सारे सूख कायमचे नासले असा भाव तिच्या मुखावर दिसतो.

"काय झाले ?"

"————————"

पुन्हा प्रश्न. पुन्हा मौन.

वाढलेल्या गलवल्याचे स्वरूप आता स्पष्ट झालेले असते. मालतीची माता कुणाच्या तरी करुण विनवण्या करीत असते. तो कोणी तिला अपशब्द बोलून तिची अब्रू घेत असतो.

मालती अगतिक असते. पण चिंतामणी पुरुष असतो. समर्थ असतो. सत्ताधीश असतो. अतीतटीने प्रतिकार करणाऱ्या, 'नको नको' म्हणणाऱ्या मालतीला दूर सारून तो दार उघडतो. वाहेर जातो. दरडावून विचारतो.

"काय आहे ?"

मालतीची आई कपाळाला हात लावून म्हणते,

"अरे देवा !"

सारी टाळाटाळ करतात पण चिंतामणी दाद देत नाही.

शेवटी खुलासा होतो.

वाण्याचे देणे दहा वर्षांचे तुंवलेले असते. आईचा व्यवसाय वंद झाल्यापासून आज दहा वर्षे मालती पुढे नशीव काढील या भरंवशावर वाण्याने देणे राहू दिले असते. मालतीने धंदा न करण्याचे ठरविल्यापासून गेले वर्षभर तो तगादा करीत असतो. आता तर तो हातघाईला आलेला असतो.

चिंतामणी विचारतो,

"देणे किती आहे ?"

"आई म्हणते,

"माझ्या मुला, तू किती ठिकाणी पुरा पडणार ? आकाश फाटले आहे."

"म्हणजे ? आणखीही देणी आहेत ?"

मालती मधे पडते.

"आई, आई, शपथ आहे. हे याना सांगशील तर मी जीव देईन."

पुन्हा टाळाटाळ. पुन्हा आग्रह.

शेवटी खुलासा होतोच. नृत्यशिक्षक, गीतशिक्षक, सुवर्णकार, वस्त्रकार, फुलवाला—अशा साऱ्यांचीच देणी असतात.

"आई, तुम्ही सांगा. एकूण देणे किती आहे. मी फेडतो."

"नको. नको. मला नरकात जावयाचे नाही. पोर धंदा करती

तर वेगळी गोष्ट होती. पण तिचा भाव मला विकावयाचा नाही. मी घर विकीन, दार विकीन, भीक मागेन आणि देणे देईन. एका पोरीच्या सुखात जीव गुंतला होता. तुम्ही तिला भेटल्यावर आता मी रस्त्यावर पडावयास मोकळी झाले."

चिंतामणी वाण्यास विचारतो,

"किती ऋण आहे ?"

"दहा सहस्त्र सुवर्णमुद्रा. शिवाय व्याज."

"मी चिंतामणी. मला ओळखतोस ?"

"तुम्हाला कोण ओळखत नाही ?"

"उद्या प्रासादावर ये आणि धन घेऊन जा. इतर देणेकरी माहित आहेत ?"

"होय महाराज."

"त्याना हिशोब घेऊन माझ्याकडे यायला सांग."

"होय महाराज."

"आता इथून चालता हो. पुन्हा इथे अपशब्द उच्चारलेस तर घरावरून नांगर फिरवीन. ही माणसे माझी आहेत."

"मला माहित नव्हते. क्षमा करा. क्षमा करा."

वाण्याचे सोंग घेऊन आलेला विट निघून जातो. नवथर भोळा चिंतामणी इतक्याच नाटकाला फसेल अशी अपेक्षा असतेच. हे नाटकच फसते तर एकावर एक वरचढ अनेक नाटके तयार असतात. मालतीला पिटून काढण्यापर्यंत, तिच्यावर अत्याचार करण्यापर्यंत, अगदी घराला आग लावण्यापर्यंतही. पण एवढेच पुरते.

भलतेच झाले असा अपराधी हताशपणा घरात असतो. चिंतामणी खिशातून धनाची पिशवी काढून विचारतो.

"खर्चाला धन आहे काय ?"

त्याला मिठी घालून मालती म्हणते,

"नाही. नाही. मी असे करू देणार नाही."

आई हताश मौनात असते. चिंतामणी पुन्हा विचारतो. आग्रहाने विचारतो. तेव्हा आईची मान नकारात हालते. मालती चिडून म्हणते,

"आई, खबरदार पैसे घेशील तर. आमची जात बदनाम झाली ती यामुळेच. अखेर आम्ही आम्हाला विकणार असे लोक म्हणतात ते उगाच नाही. मी विकून घेणार नाही. मी माझे पैसे घेऊ देणार नाही."

"अग ऽ पण —"

"अग ऽ पण काय ? चिमण्याने चिमणीला चारा घालावा तसा यानी विडा चाऊन मला ओठानी भरविला. सुख घेताना मी श्रमले तेव्हा यानी स्वतः माझा घाम पुसला. मला दुखले खुपले त्याची जाण घेऊन स्वतःला आवरले. त्यांच्या मांडीवर मला ऊब मिळाली. तिचे मूल्य तू वसुंधरा त्यांच्यावरून ओवाळलीस म्हणून तरी होईल काय ? उलट तूच त्यांच्याकडून मोल घेतलेस तर मी डोके आपटीन. वीष पिईन...."

म्हणत ती निघून जाते. जाताना तिची सैल साडी पाठमोरी सुटत जाते ती सावरावयास सुद्धा ती थबकत नाही. आई म्हणते,

"किती भोळी. पोरीला व्यवहार म्हणून कळत नाही. माझ्यामागून हिचे कसे होणार ? या निरागस पाडसाचा कसा पार लागणार ?"

धनाच्या पिशवीचे हस्तांतर होते. चिंतामणी म्हणतो,

"तिला कळू देऊ नका."

"एक ऐकलंत तर."

"काय ते ?"

"तुम्ही आत जाऊन तिची समजूत काढा. तुम्ही सुख दिलत ते तिच्या देहात रुतले. काळजात मुरलं. तनूवर उमललं. रोज आठवण येईल तिला."

"केवळ तिलाच कां म्हणून ?"

चिंतामणी पुन्हा आत जातो. घळताना दिसलेल्या वस्त्राने त्याला चाळविलेले असते. मघा शोकातून शृंगार फुलला. आता रागातून अनुराग फुलावयाचा असतो. शयनावर तशीच पालथी पडलेल्या मालतीला सामोरे करण्यात सुद्धा मोठा रस असतो. मोठे सुख असते.

असे दिवस जातात. चिंतामणी लक्षाधीश असतो तो भिक्षाधीश होतो. मग त्याला तुटकपणा, असहकार, विलगता, दुर्लक्ष, अपमान, अर्धचंद्र अशा पायऱ्यानी तोडले जाते. त्याचे धन संपलेले असते पण जिद्द कायम असते. त्या जिद्दीने तो पुन्हा वैभव जमवितो. तो पुन्हा श्रीमंत होताच पुन्हा त्याच्या भोवती जाळे टाकले जाते. मालतीच्या स्मरणात असे काही स्फुरण असते, असा काही जोप असतो, बेहोषी असते की, त्याची जागा चिंतामणीची दुर्दैवी पत्नी भरून काढू शकत नाही. रोमांच फुलविण्याची मालतीची गमके ज्ञात नसल्यामुळे त्या साध्वीचे आत्मार्पण व्यर्थ जाते. चिंतामणी जुना अनुभव विसरून पुन्हा मालतीकडे जातो.

हा प्रकार त्याची जिद्द मोडेपर्यंत चालतो. जिद्द मोडली, तो लाचार झाला की, त्याला शेवटची लाथ दिली जाते. पुन्हा कधीही ते दार त्याच्यासाठी उघणार नसते.








अनुक्रमणिका

मालती काही राक्षसीण नसते. तिचे अंतर अनेकदा कालवते. तिला करुणा येते. पण हा संग्राम जीवनाचा असतो. उमेदीची मोजकी वर्षे करुणेत वाया गेली तर उद्या अंगे सैल झाल्यावर तिला कोणी विचारणार नसतो. संसारात सर्वस्व ओतणाऱ्या विवाहितेला ज्या प्रतिष्ठेची आणि चिरंतन स्वास्थाची शाश्वती असते ती मालतीला नसते. दहा वर्षानी भीक मागावयाचा प्रसंग नको असेल तर तिला आज कमाविणे भाग असते. त्यासाठी तिला मन मारावे लागते. दयामाया करुणा आवरावी लागते. क्रूर व्हावेच लागते. ती तशी होईल अशी काळजी विकराला घेत असते. ती रोज सारा आढावा घेऊन मालतीला शिकवीत असते.

पक्वाम्रमिव विमोक्ष्यसि पूर्ववदाचूष्य सूभ्रु निःशेषम्
भुक्त्वा यावन्मांसं त्यक्षसि चर्मास्थिशेषितं मत्स्यम् ।। ७३४।३५

शेवटचा थेंब चोखून झाल्यावर आंब्याची वाटी हात धरून वसू नको. गीर ओरपून झाल्यावर सरंग्याचा काटा पानात ठेवू नकोस.

स्वाभीमानाला मुकलेला लाचार चिंतामणी शेवटी परत जातो तेव्हा जाताना तो पुन्हा वळून पहात असतो. मालतीकडे—तिच्या जघन भागाकडे. तिने त्याच्याकडे पाठच फिरविलेली असते.

☆ ☆

[दामोदरगुप्ताच्या आगेमागेच्या काश्मीरच्या राजकीय स्थितीबद्दल राजतरंगिणी या इतिहास ग्रंथात पुढील वर्णन आढळते:

"राजाच्या दुर्नयाने आणि दुष्टपणाने डागळलेल्या त्याच्या राज्याचा उपयोग वारांगनाना मिळाला. पापकर्मांनी संपादिलेली संपत्ती नट आणि विट यात विभागिली गेली. पैदाशीला अनुरूप तिला विनियोग झाला. गणिकांचे आप्त राजाचे अधिकारी झाले आणि त्यानी राजाला वेश्यागमनात मोठा पंडित बनविले. बाजारबसव्यांनी ओरखडलेले अंग आणि कुरतडलेले केस त्याला राजमुकुटापेक्षा भूषणीय वाटू लागले. शूर आणि विद्वान लोकांपेक्षा अश्लील कथा सांगणारे लोक त्या राजाला रुचत. थोड्या स्त्रियांवर तृप्त रहाणारास तो मूर्ख समजे व म्हणे. त्याची वासना जळती असल्याने असंख्य वेश्यांच्या सहवासालाच तो ब्रह्मानंद मानी. दिग्विजय करणाऱ्या राजांचा तो उपहास करी. तो नीच विटांच्या सहवासात राही. हे विट प्रतिष्ठित वृद्ध विद्वानांचा हलकट शब्दात उपहास करीत. तो स्वतः अश्लील बोलण्यात अट्टल भोंद्याप्रमाणे निष्णात होता आणि असे बोलणारास तो मोठी इनामे देत असे. तो गणिकाना मांडीवर घेऊन सिंहासनावर बसे आणि जे मंत्री लोक वेश्यागमनाच्या खुणानी रंगलेले झगे घालून सभेत येत त्यानाच मान देई." तरंग चवथा. ६६० ते ६७०]

●●●



अनुक्रमणिका

यण्याजाण्याच्या खोलीला आतून कडी असते. दाराच्या फटीतून प्रकाशाची टोके त्याच्या डोळ्यात भाल्यासारखी घुसतात. एकाच. आणि तो भाल्याच्या जखमेइतकाच आतल्या आत विव्हळतो. पाऊल न वाजवता दाराच्या फटीत डोळा भिडवतो....!




-मनोहर तल्हार

रस्त्यावरला खडबडाट सुरू झालेला असतो. ऐकू येऊनही तो झोपेतून उठत नाही. डोळा उघडून रस्त्यावरची रहदारी न्याहाळतो. आणि सकाळच्या लख्ख प्रकाशाने डोळा भोवळतो म्हणून तो गप्पकन् बंद करतो. झोप उडालेली असते पण सुस्तपणा असतोच. रहदारीच्या रस्त्यावरल्या एका दुकानाच्या पायऱ्या-वर असे झोपून राहणे बरे दिसणारे नव्हे हे पटूनही तो उठत नाही. काही हालचाल करीत नाही.

"भांचोद, कोन सोया ह्यांपे?" सणा-णून एक शिवी त्याच्या कानातून थेट मेंदूत घुसते आणि तो जखमी झाल्या-सारखा खडबडून जागा होतो. उठून बसतो.

"क्यों बे, ये सोनेकी जगा है क्या?"

"सोनेकी नही तो क्या चांदीकी है?" तो उलट उत्तर देतो तसा तो गृहस्थ चवताळल्यागत अंगावर येतो. म्हणतो—

"अभी बताता तेरेकूं! पोलिसमे दिया तो मालूम पडेगा दालआटेका भाव!" आणि मग गेला तितक्याच वेगाने मागे सर-कत स्वत:शीच कुरकुरल्यासारखा म्हणतो—

"माँ बाप मर गये, औलाद छोड गये!" आणि लगेच उघडपणे मोठ्याने म्हणतो— "कहां कहांसे पैदा होते क्या मालूम?"

"तुम जहांसे हो गये वहीसे! समझे?" तो तीक्ष्ण नजरेनं बघतो.

त्या गृहस्थाला त्याच्या या घाणेरड्या उत्तराचा संताप येतो. परंतु शिकलेल्या माणसाने इतके संतापून जाऊन स्वत:चा पाणउतारा करून घेण्याला दुसऱ्याला संधी देणे बरे नाही हे पांढरपेशी तत्त्व पटून तो समजूतदारीच्या सूरात म्हणतो—

"अरे भाई, ये क्या सोनेकी जगा है?" 'साला पुन्हा तोच प्रश्न!'

"सोनेको मना नही. लेकिन आठ आठ बजे तक्के? फिर दुकान कब खोलना?"

तो त्यावर काही बोलत नाही. धीमे-पणानं आळोखे पिळोखे देतो. उठून

तरुणाची आठवण होते आणि त्याचे माथे भडकते. तो निर्धाराने पुढे जातो आणि तो तरुण तिथे बसलेला बघून तो त्याच्या नजरेला नजर भिडवून घिमेपणाने चालतो.

"मैं हूं एक आँख का पंछीऽऽऽऽ" तो तिरमिरीने त्याच्याजवळ जातो. त्याच्या शर्टाचा गळ्याजवळचा भाग एका हातात धरतो आणि दुसऱ्या हाताने त्याच्या मुस्काटात भडकावतो. तोही प्रतिकार करतो, त्याच्या पाठीत गुद्दे लगावून. तोंडावर ओरखडतो. तसा तो कातावतो. पिसाळून जातो. साऱ्या शक्तिनिशी त्याला दोन्ही हाताने उचलून खाली जोरदार आदळतो. बूटपालिशच्या खोक्यावर.

"साला भांचोद, पाकिस्तान भेज दूंगा. तेरी मांको ×× रोज रोज एकही गाना और ओभी मेरेकू देखकेयू. तेरे क्या वापका खाता हूं साले?"

आणि मग पंधरावीस जण गोळा होतात. मारामारीच्या कारणाची चौकशी करतात. खाली आदळलेला तरुण केविलवाण्या सुरात कैफियत मांडतो—

"मैंने गाना बोला करके इसने मारा. गाना बोलना भी गुना हो गया है!"

"साले, झूठ बोलता! ऐसा ही करनेकी आदत है सालेहो तुम लोगोंको! मेरेकूं देखके ये रोजाना गाना बोलता है—मैं हूं एक आँखका पंछी! मैं एक आँखसे अंधा हूं इस लिये मेरेकू समझता नही?"

आणि मग साऱ्यांची सहानुभूति त्याच्याकडे वळते. आणि तो कुणाच्या उपऱ्या सहानुभूतीची पर्वा न करता चालू लागतो. हातवारे करीत.

'भांचोद, सारं म्हातारीमुळं झालं. दोन्ही डोळे कां फोडले नाहीत? पूर्ण आंधळा झालो असतो तर भीक मागायला लाज तरी वाटली नसती. म्हणे ती वाकळ शिवत होती. आणि तिच्या पाठीमागून मी तिच्या गळ्याला मिठी मारली. आणि डोळ्यात सुई गेली. वाकळ शिवायची मोठी सुई. सालं, आम्ही कोणत्या जन्माचं पाप केलं होतं? सारे साले हरामखोर, दुसऱ्यांच्या व्यंगावर विनोद करणारे. एक आँख का पंछी. . . .

. .एक आँख का पंछी तेरा बाप! मूर्ख साला. हलकट, हरामखोर, पाजी, लफंगा. साल्याना जितक्या शिव्या दिल्या तेवढ्या थोड्या.'

तो आपल्या घरी परततो.

त्याला बघून कुणालाच आनंद होत नाही. आई आपली पूजा करीत असते. त्याला बघून माळ ओढायची थांबवते आणि मग कपाळावर आठ्या चढवून जोरजोराने माळेचे मणी ओढू लागते

वडिलांचा जप सुरू असतो—

"हरे राम हरे राम, राम राम हरे हरे
हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे"

तो मनातल्या मनात म्हणतो. . .

"रामनाम सत् है सत् बोलो गत् हैचा जप करा आता." आणि म्हाताऱ्याकडे जळजळीत नजरेनं बघतो. म्हातारा त्याची ही नजर ओळखतो. तो खूप रागावून—कातावून असला की त्याचा चेहरा—त्याची नजर ही अशीच विचित्र असते आणि अशावेळी घरातली शांति नष्ट होते हे म्हाताऱ्याला माहित असल्याने—म्हातारा शक्यतो शांतीप्रयत्न म्हणून उपरेपणानं त्याची काळजी वाहतो. त्या काळजीतला कोरडेपणा जाणवतो.

"दिनू, चहा घेतलास?"

"हो, जेवणही करून आलो!"

त्याच्या उलट थाणि टोमणेवजा उत्तराने म्हातारा डगमगून जात नाही. चोपकारल्यासारखा आत ऐकू जाईल असा आवाज काढून म्हातारा म्हणतो—

"बेटा प्रभा, दुध आहे ना ग?"

आतून उत्तर येत नाही. त्याऐवजी मध्ये मध्ये कडमडणाऱ्या मुलाच्या पाठीत दणका आणि त्याची प्रतिक्रिया तेवढी ऐकू येते. छोकरा डोळे मनगटानं चोळत म्हाताऱ्यापुढून निघून जातो. सारे असह्य होऊन म्हातारा आपला जप सुरू करतो.

"हरे राम हरे राम, राम राम हरे हरे
हरे कृष्ण हरे कृष्ण, कृष्ण कृष्ण हरे हरे!"

आणि जप चालू असतानाच मलमलचे शर्ट अंगात घालतो. घातल्यावर बाजूचे

आली, आली निवडणूक आली (२)




निवडणुकीत हमखास यशासाठी भेटा:—राजरतन पॅटीस बाबा दिव्य दृष्टीवाले

खिसे चाचपडतो. डबी काढून तीतली चिमटभर नस, नाकात, कोंबतो. दोन्ही नाकपुड्या फेंदारून–फुगवून. मनगटानं नाकाचा शेंडा घुसळून काढतो. कापडाचा लाल जोडा पायात घालून बाहेर पडतो.

तो बसून बसून कंटाळतो. बैठक बदलतो. कधी दोन पायावर बसतो तर कधी मांडी घालून. बसल्या बसल्या दाढी खाजवितो. दाढी खाजवीत घरातला अंदाज घेतो.

मोठा भाऊ कधीचाच बाहेर पडला असावा हे तो हेरतो. संघाच्या शाखेत तो रोज भल्या पहाटी अर्धी चड्डी घालून जात असतो. खूप खेळून झाल्यावर घरी परतण्याऐवजी मोफत वाचनालयात जे हाती पडेल ते वाचीत बसतो. ऑफिसात जाण्यापूर्वीच्या तासाभरात घरी उतरतो. आल्यावर तो कधी कुणाशी बोलत नसतो आणि दिनू असला तर तो बायको-पोरांशीही बोलत नसतो. मुक्या जनावरासारखा, जबाबदारीने वाकल्यासारखा मान खाली घालून, चेहरा पाडून वावरतो, चोरासारखा हालचाल करतो.

वीणा न्हाणीघरातून येते आणि त्याच्या जवळून जाते. त्याला बघून ती काही बोलत नाही. नुसती टकटक् बघते आणि टीचभर असलेल्या स्वयंपाक खोलीतल्या गर्दीत वहिनीजवळ जाते.

नंतर वहिनी आणि तिची बाचाबाची होते खोबरेल तेलावरून. वीणाचा आवाज मोठा असतो. म्हणत असते–

"तुमच्यासाठी वासाचं तेल आणि माझ्यासाठी खोबरेलसुद्धा नाहीय्!"

"कुठलं वासाचं तेल वन्सं? काही तरीच काय बोलता?"

"तुमच्या केसांचा वास येतो तो गोडया तेलाचा का? किल्ली द्या ट्रंकेची म्हणजे दाखविते काय काय आहे त्यात!"

"माझ्या आईकडून आलेली बाटली आहे ती!"

"बारा वर्षापासून तुमच्या आईने उकडा लावलाय् या साऱ्या वस्तूंचा! माझ्या मेलीसाठीच इतकी काटकसर. मला खोबरेल तेल द्या. नाही तर मी रॉकेल लावते केसाना आणि आगपेटीची काडी तुम्ही लावा. कटकट मिटवून टाका माझी नित्याची!"

"काय ग वीणा हे अभद्र बोलणं?" आई किंचित् दटावल्यागत – किंचित् पुळका येऊन–अशा मिश्र सूरात विचारते.

"तू माळ ओढीत बैस आई मुकाट्याने तिथे. दिवसभर तेच ते. दुसरं काही करू नकोस. स्वर्गप्राप्ती तरी होईल. काय मेली एक एक खुळं?

तो उठतो. दाढी खाजवीत देवघरातल्या दादाच्या कपाटापाशी रेंगाळतो. वहिनी ते हेरते. कामाच्या निमित्ताने तो काय करतो यावर लक्ष ठेवते आणि तिचे घुटमळणे लक्षात येण्याइतके संशयास्पद वाटते तेव्हा ती पुन्हा स्वयंपाक खोलीत शिरते.

तो कपाट हुसकतो. भारत ब्लेड काढतो आणि खिशात घालतो.

पुन्हा बैठकीत येतो.

वीणा मोकळ्या केसानं वावरत असते. चेहऱ्यावर संतापाचे भाव असतात. त्याच सूरात ती विचारते–

"दादा, तुझ्याजवळ एक आणा आहे काय?" तो चांचपडून बघतो. दाढी खाजवितो–

"म्हणतो, ब्लेडसाठीसुद्धा नाहीत पैसे! मीच तर दादाच्या कपाटातलं ब्लेड घेतलं!"

ती देवघरात येते. आलमाऱ्यात खुडबूड करते.

तो आरसा बघण्यासाठी देवघरात येतो. म्हातारीची माळ पुरी होते आणि ती परडी घेऊन फुले गोळा करण्यासाठी निघते. आरसा जागेवर नसतो. काहीच काम नसल्यामुळे तो तिथेच भिंतीला टेकून बसतो. खिशातली आगपेटी काढतो. तीतली एक काडी काढून गुलाकडच्या भागाने कान टोकरतो.

"दादा, गुलाकडून कान टोकरू नकोस!"

"कां?"

[दीपा. ९]

"एकाजणाचा कान बहिरा झाला आहे!"

"कोण एकजण?"

"आमचा एक मास्तर. दिक्षित त्याचं नाव!"

"असं! बरं होईल कान बहिरा झाला तर. निदान ही रोजची कटकट तरी ऐकू येणार नाही."

"तू नोकरी कां करीत नाहीस?"

"आतापर्यन्त केली नाही का? सुटली म्हणून. दूसरी मिळायला तर हवी? एखाद्या वस्तूसारखी ती दुकानात विकत मिळते काय? पाच पैसे दिलेत की चहाची पूड हाती!"

"चहा घेतला नाहीस का?"

"घेतला ना, स्पेशल चहा. हॉटेल ब्रँड!"

"गेल्या आठ दिवसात का आला नाहीस?"

"माझ्यासाठी जेवायचे राहिलेत का आठ दिवसात कुणी?"

ती निरुत्तर होते. कपाटातले पोलके काढते आणि भिंतीला टेकून बसते. त्याच्यासमोर.

भिंतीच्या कडेनं पंधरावीस मुंग्या एक अर्धमेला किडा घेऊन जात असतात तिकडे तो बघतो. मग वीणाकडे बघतो.

ती पोलक्याच्या दाटातले धागे तोडण्याचा प्रयत्न करते. कधी दातानं तर कधी नखानं. जमत नाही. पुन्हा उठते. कपाट हुसकून बघते. सुईदोरा काढून पुन्हा बसते. दोन्ही पायाच्या गुडघ्यांवर पोलकं ठेवून सुईने टाके उचकते.

तो तिच्या हालचाली एकटक बघतो. मग स्वतःशीच बोलावा तसा बोलतो—

"याच सुईनं माझा घात केलाय्. एक आँख का पंछी झालो! साला मादरचोद. रोज तेच ते गाणं म्हणत होता. आत्ता? म्हणशील—? एक दोन तीन— चांगल्या बसल्या श्रुतरात आणि आदळला ढुंगणावर! ×× वीचा!"

"कुणाला शिव्या मोजतोस?"

तो काहीच बोलत नाही. एकटक शून्यात बघत असतो.

"स्वप्नात आहेस का?" ती विचारते आणि लगेच बसल्या बसल्या कसला तरी किडा पोटरीपर्यंत चढल्याने ती पाय अधिकच फाकविते आणि हात घालून काढते तसं त्याचं लक्ष जातं आणि—

आणि तो चटकन् उठून उभा राहतो आणि बैठकीतून निघून जातो.

वहिनी चहाचा पेला घेऊन येते. तिला विचारते—

"कुठं गेलेत दिनकरराव?"

"आताच बाहेर गेलाय्. असेल इतक्यात कुठे!"

"चहा केलाय् त्यांच्यासाठी!"

वहिनी चहाचा पेला तिथेच ठेवते. वर बशीचे झाकण ठेवून.

"वहिनी आरसा कुठाय्?"

"मुलानी इकडे आणलाय्. देते आणून!"

वहिनी आरसा आणून देते. निघून जाते.

फुलांची परडी घेऊन आई देवघरात येते. चहाची कपबशी बघून विचारते—

"हा म्हणीत काय करतोय् मघापासनं! चहा थंड होतोय् इकडे!"

"स्नानासाठी मी खोळंबलेय् केव्हापासनं!" वहिनी वाऱ्यावर बोलावी तशी बोलते. आणि स्वयंपाक खोलीत येते. नंदा मातीची भाकर खात असते.

तिच्या पाठीत धपाटा घालून ती बड-बडते—

"मेल्यांच्या एकेक सवयी. आता माती खायचीच वेळ येणार आहे म्हणून आतापासून तालीम करतात. जळ्ळी मेली यांची लक्षणं!"

नंदा भोकांड पसरते म्हणून मंदाही रडू लागते. दोघीही एका सूरात रडतात. म्हातारी दोघीनाही घेऊन बाहेर पडते.

दिनकर येतो. वीणा त्याला विचारते—

"किती वेळ हा दादा?"

"दाढी केलीय्!"

"न्हाणीत?"

"हो. इथे आरसा कुठे होता? तिथे बादलीतल्या पाण्यात चेहरा दिसतो. आपल्या दाढीला साबण नकोच ! कशी झाली दाढी?"

"छान!" ती त्याच्याकडे बघून हसते. तसा तो विचित्रपणे तिच्याकडे बघतो, निराळ्या नजरेनं.

"चहा थंड झालाय्!"

तो मुकाट्यानं पेला उचलतो आणि गटागटा चहा पितो.

मुलीना खेळती करून म्हातारी येते. काळजीनं विचारते—

"आठ दिवस कुठे झोपलास?"

"रांडेकडे!"

म्हातारी तोंडात मारल्यासारखी चूप होते.

तो रोज झोपायला असला म्हणजे सारी पंचाईत होते. सारे अडचणीत येतात. दादा-वहिनीला बैठकीच्या खोलीत एकत्र झोपता येत नाही. आणि मग त्यांचा आकांत दुसऱ्या दिवशीच्या वागणुकीतून दिसतो. ती दोघेही चरफडतात. मुलाना मार देतात. अद्वातद्वा बोलतात. आडून पाडून टोमणे मारतात कुणालाही.

देवघर, स्वयंपाक खोली आणि समोरची येण्याजाण्याची खोली तीच दादा-वहिनीची झोपायची खोली. दिनकर असला म्हणजे तो पहिल्यांदा तिथेच झोपतो. तो तिथे झोपला म्हणजे वहि-नीला सासू आणि वीणा सोबत देवघरात झोपावं लागतं. म्हातारा, वसंतदादा आणि मुले दिनकर झोपतो तिथे झोपतात. स्वयंपाक खोलीत झोपता येणे शक्य नसते. तिथल्या मोरीचा वास रात्री चांगलाच जाणवतो.

आणि असं झालं म्हणजे दादा मोठमोठे डोळे करून ज्याच्या त्याच्याकडे बघत असतो. चहा न घेता बाहेर निघून जातो.

त्याला हे सारे असह्य होते आणि म्हणून तो आठ आठ दिवस घरी परतत नाही. नाही आला तर कुणी कधी चौक-शीही करीत नाही.

आता त्याचा सूर आणि नूर बदललेला असतो. तो उर्मट उत्तर देतो तरी ती विचारते—

"चहा घेतलास?"

"खूप काळजी आहे तुला?"







"मला कुठली काळजी? मी तुझी आहे तरी कोण?"

"काळजी असती तर वाट पाहून प्राण सोडला असता एखाद्या आईनं. पण तुला घास गिळतो मी नसलो म्हणजे. या घरात माझी एक पीडाच. मी नसलो तर दादा वहिनीना स्वर्ग लाभतो. माझ्या-पेक्षा फक्त तीन वर्षानं तो मोठा. पण त्याला सारं काही व्यवस्थित मिळतंय्. तीन मुलं आहेत. आणि मी–मी बोकडा-सारखा वाढलोय् ते तुम्हा म्हाताऱ्याना दिसतं कुठं? दृष्टी अधू झालीय् ना? मला कसल्या भावना नाहीत. मी माण-सात मोडतच नाही. एका डोळ्यानं आंधळा करून ठेवलं आणि जेव्हा तेव्हा लग्नाच्या गोष्टीत तो आडवा येतो. सगळे साले ढोंग धतुरे. एखादी लंगडी तर बघा–"

आणि मग तो स्वतःशीच पुटपुटतो–

"हरामखोराना चांगला मार हवाय्!"

वहिनी ओलेत्यानेच आत येते. पदरावर स्तनाग्रे टचटचून उमटतात.

तो तिच्याकडे बघतोच राहतो.

"तीन मुले असलेली ही बाई. बाई? की तरुणी? अजूनही मस्त आहे. गोरी गोरी पान, फुलासारखी छान, दादा मला एक वहिनी आण. आणलीच. खायला प्यायला साजूक असतं. नेसा-यला तलम मुलायम किंमती वस्त्रे असती तर कॉलेजातील एखादी आकर्षक पोरगी झक् मारतेय्. सारं आपलं तकदीरच गांडू! राक्षसासारखं शरीर आणि डोळा फुटलेला. मैं हूं एक आँख का पंछी–उडता हूं नील गगन मे—"

आणि तो तिरीमिरीने उठतो. पायात चपला अडकवितो आणि घराबाहेर पडतो.

दुपार होईपर्यंत कॉलेजातल्या पोरी बघतो. वखवखल्या नजरेने. आणि परत-ताना त्याला ती दिसते. तिची न त्याची नजरानजर होते आणि ती चटकन् ओळख पटल्याने गोरीमोरी होते. मान खाली घालून झप्झप् चालू लागते. ती कोण आहे हे त्याला माहित नसते. कुठे राहते तेही माहित नसते. या कॉलेजात शिकत आहे हे प्रथम कळतं. आणि त्या प्रसंगानंतर ती पुन्हा कधीच दिसली नसते, ती आता अचानक दिसते. बघते. नजरानजर होते. ओळख पटते आणि शरमिंदी होते. मान खाली घालून झप्झप् निघून जाते.

आणि त्याच्या अंगातून वीज लहरून जाते. एवढी मस्त पोरगी आणि तो क्षण.

दुर्गापूजा. सातव्या दिवशी धमाल गर्दी उडालेली असते. सिल्व्हर टाऊनसारखी रोषणाई, बंदिस्त आवारातल्या असंख्य दुकानांचा मेळावा. दिव्यांच्या झगमगा-टातली अनेक आकर्षक दुकाने–स्त्री पुरुषांची झुंबड. आणि अनेक आकर्षक पोरी. तरुण–चित्र विचित्र पोशाखातल्या. दुर्गामातेच्या दर्शनाच्या निमित्ताने आपल्या यौवनाचं–सौष्ठवाचं तलम, मुलायम रंगी-बेरंगी, सौम्य–भडक कपड्यातून प्रदर्शन करणाऱ्या, ख्रिश्चन, गुजराती, मारवाडी,

बंगाली, मद्रासी, महाराष्ट्रीयन. अनेक कॉलेज तरुणांचे तांडे, पाठलाग करणारे आणि त्यांच्यावर आणि सर्व व्यवस्थेवर नजर ठेवणारे दंडुके घेऊन फिरणारे पोलिस.

एकाएकी 'लाईट' जातात. सर्वत्र अंधार. सारा गोंधळ, चित्कार. आणि त्या परिस्थितीचा फायदा अनेकांप्रमाणे तोही घेतो. हाती आल्या तरुणीला दाबतो. मनसोक्त. राक्षसीपणाने—वक्षस्थळ कुस्करतो. आणि एकदम लाईट येतात. ती तरुणी रडत असते. अनेक बदमापाना मारझोड होते. पोलिस त्यालाही ठोकतात. चांगला चापून काढतात. अनेकाना पकडण्यात येते. त्यात तोही असतो. व्हॅनमध्ये घालून कोतवालीत नेतात. तिथले आणखी काही पोलिस आपले हात साफ करतात. त्यात त्याला बराच मार बसतो. पाठ हिर्वी-निळी होते. पण चेहऱ्यावर असीम समाधान असते. असा दुर्मिळ लाभ झालेला असतो म्हणून. कोर्टात केस चालते आणि तो सांगतो: 'माझा काचेचा डोळा खाली पडला होता तो मी बघत होतो'. त्या विधानाच्या पुष्टीदाखल तो मॅजिस्ट्रेटपुढे चटकन् आपल्या डाव्या डोळ्याच्या खाचेतील काचेचा कृत्रिम डोळा दाखवितो. काचेचा डोळा जप्त करण्यात येतो. त्याची मुक्तता होते. त्यानंतर ती मुलगी त्याला कधीच दिसत नाही. तो कधी शोधही घेत नाही. त्याची त्याला गरजही नसते. आणि आठवण ठेवण्याइतका जिव्हाळाही नसतो. पण आता ती दिसते. नजरानजर होते. ओळख पटते. म्हणून शरमिंदी होते. नजर झुकविते. मान खाली घालून झपझप् निघून जाते.

तो मात्र चेकाळतो.

पोटात आगीचा डोंब उसळतो. खिशात पैसा नसतो. घरी खायला जाण्याची इच्छा नसते. आणि मग गरजेपोटी तो स्टेशनावर फिरतो—बस स्टँडवर फिरतो. पाच वाजेपर्यंत हमाली करतो. मिळालेली कमाई मोजतो. अडीच रुपये. स्वस्त अशा ग्रँड हिंदु मटण हॉटेलात जाऊन चापून जेवतो. ढेकर देऊन बाहेर पडतो. आणि पानपट्टीच्या दुकानातून एक तेजपान घेऊन तोंडात कोंबतो. एक आण्याच्या विड्या घेतो. पानपट्टीच्या दुकानाच्या बाजूला एक भले मोठे पोस्टर असते: America by Night.

पोस्टरवरील अर्धनग्न तरुणींचा तांडा तो न्याहाळतो. खिशातली चिल्लर बघतो. बारा आणे.

तो पिसाट वेगाने थिएटरवर येतो. थिएटरवर धमाल गर्दी असते. सर्व थरातले प्रेक्षक. शिकलेले—रिक्षावाले. तो अंगातले शर्ट काढून गर्दीत घुसतो. मोठ्या प्रयासाने तिकीट काढतो. विजयोन्मादाने थिएटरात जातो.

चित्रपट संपल्यावर परततो तो बेफाम होऊन. चित्रपटातली ती अर्धनग्न नृत्ये, मांड्या आणि अर्धाअधिक उरोज उघडा टाकणाऱ्या पोरी. साऱ्या मस्त!

आणि त्याला एकाएकी फरीदाची आठवण होते. फरीदा, चार वर्षांपूर्वीची अल्लड तरुणी—नुकतीच यौवनात पदार्पण करणारी म्हणून जास्त भाव घेणारी. पण आता शरीराची लक्तरे वाळवायला घातलेली. . . .फुटाण्याला मोताद असलेली. एका चहाच्या पेल्यासाठी शय्यासोबतीला तयार होऊ शकेल इतकी लाचार झालेली.

तिच्या पूर्वीच्या रूपाचे रसपान करणारे तिच्याकडे आता ढुंकूनही पहात नसतात. पण त्याला ती तरीही आवडते. त्याला तिचे पूर्वीचे रूप. . . . .दिमाख आठवतो. आणि तो बेभान होतो. गोऱ्या गोऱ्या मांड्या. . . अर्धे उघडे उरोज. तो तडक तिच्याकडे निघतो. रात्रीचे दहा वाजलेले असतात.

फरीदा, सराईत व्यवहारचतुरासारखी म्हणते—

"बहुत दिनके बाद तुम्हारे फरीदाकी तुमको याद आयी?"

"हां!"

"बैठते क्या?" हात वर करून ती एक फिल्मी आळस दते. त्यामुळे तिच्या उरोजाची हालचाल होते. तिकडे तो नुसताच बघतो. पोलके पारदर्शक असते आणि आत बॉडी नसते.

तो उत्तर देत नाही. ती त्याच्या तोंडाकडे पहाते. आश्चर्यानं—कुतुहलानं. पुन्हा विचारते—

"क्यों? क्या सोच रहे हो?"
तरीही तो बोलत नाही.
ती निर्वाणीच्या सुरात विचारते -
"फिर बैठने क्या?"
"पैसे कल दूंगा!"

"उधारी बंद किया. कलही आना. अभी धंदेका टाईम है!" आणि ती आत निघून जाते.

एक चाद्दली रांड पण तीही असा अपमान करते. तो तिथून उठतो. अपमानल्या चेहऱ्याने बाहेर पडतो आणि झपझप् चालू लागतो. दिशा नसल्यासारखा. तीन मैलाचे अंतर तोडतो. विचारांच्या एका गुंतवळ्यात अडकून पुरता गुरफटतो.

त्याचे पाय आपोआप त्याच्या घराकड वळतात.

घर बंद असते.

येण्याजाण्याच्या खोलीला आतून कडी असते. आणि दाराच्या फटीतून प्रकाशाची टोके भाल्यासारखी डोळ्यात घुसतात. एकाच. आणि तो भाल्याच्या जखमेइतका आतल्या आत विव्हळतो. आणि निग्रहाने ती प्रकाशाची टोके एकाच डोळ्यात सामावून घेतो, पाऊल न वाजविता दाराच्या फटीला डोळा भिडवून.

दादा आणि वहिनी. . .त्याच्या डोळ्यात ठिणगी उडते आणि तो आतून पेटून जातो. वेड्यागत मागे सरकतो.

झपझप् पाऊले उचलून चालू लागतो. पाय नेतील तिकडे.

☆ ☆

दुर्गापूजा ग्राऊंड अंधारात बुडालेले असते. दूरवर असलेल्या रस्त्यावरल्या विद्युत्दीपांचा अतिशय फिक्कट प्रकाश त्या गडद काळोखात मिसळतो.

दुर्गापूजा ग्राऊंडच्या परिसरात चिटपाखरू नसतं. तो झगमगाट नसतो. आणि तीहि नसते. पण अंधार तोच असतो. तेव्हाचा. पण दूरवरच्या प्रकाशाने किंचित् फिकट झालेला. त्याची भली मोठी आकृति ग्राऊंडवर मुद्रीत झालेली असते.

तो जमिनीवरल्या आपल्या भल्या मोठ्या छायेकडे बघतो. बराच वेळ.

आणि मग अंगावरला एकेक कपडा काढून तो आपल्याच छायेवर उपडा पडतो. ● ● ●








जुन्या पिढीला फक्त हरिनामाचा एकच सप्ताह माहिती होता. पण अलिकडे 'सौजन्य सप्ताह,' 'दारुबंदी सप्ताह,' 'सुतकताई सप्ताह,' 'आरोग्य सप्ताह,' 'रोग निर्मूलन सप्ताह,' असे जनतेच्या कल्याणार्थ असंख्य सप्ताह साजरे होऊ लागलेले दिसत आहेत पण सुखाचा खरा मूलमंत्र कोणता, हे कुणालाच आकळलेले नाही. जबाबदार व्यक्तींनी हा लेख वाचला तर थोडा तरी प्रकाश पडेल. निदान दिवाळी तरी सुखाची जाईल........ !

# हास्य-परमिट

रमेश मंत्री

वास्तविक असे होऊ नये; पण झाले. त्याला काही आपला इलाज नाही. होऊ नयेत अशा अनेक गोष्टी घडतच असतात. त्यातलीच ही एक.

सुदाम पुरोहित हा सरकारी नोकरीत नुकताच चिकटला होता. त्याच्या बरोबर आणखी दोघे तात्पुरते म्हणून काम करीत होते. नुकतीच पदवी मिळविलेले ते तीन शिलेदार ताज्या दमाचे होते. त्यांचे मन सरकारी नोकरीत कसे रमावे ? रोज जेवणाच्या वेळी ते जुन्या सरकारी नोकरांची थट्टा करीत असायचे. सुपरिंटेंडंटला विनोद वुद्धि नाही, असिस्टंट सेक्रेटरीला आपल्यातली गंमत कळत नाही, फातरफेकरबुवाना हसायचे कसे ते माहीत नाही असे शेरे मारीत ते जेवणाची वेळ भरून काढीत.

माधव देशपांडे एकदा असाच बोलताना म्हणाला, "अरे सुदाम, या सरकारात सगळी खाती आहेत. तसं विनोदाचंहि एक खातं असतं, तर काय मजा झाली असती. सरकारी नोकर हा रडतराव असलाच पाहिजे असा जी. आर. करण्याची जरुरच भासली नसती."

सुदामला ही कल्पना बहुत पसंत पडली. तो म्हणाला, "बरोबर आहे. आजच मी एक मेमो लिहितो की, सरकारात विनोदाचे एक खातं सुरू करा म्हणून."

आणि काय सांगावे ? त्याने दुपारच्या रिकाम्या वेळेत खरोखरच एका मेमोचा तर्जुमा केला. अगदी सरकारी भाषेत. त्याचा आशय असा होता: ज्या अर्थी आज काल लोकांच्या जीवनातील आनंद कमी होत आहे,

ज्या अर्थी दैनंदिन चिंता, अडचणी, टंचाई इत्यादींनी जनता बेजार होऊन गेली आहे,

ज्या अर्थी लोक हसणे खेळणे हळु हळु विसरू लागले आहेत,

ज्या अर्थी लोकाना आनंदी आणि सुखी ठेवणे हे कल्याणकारी सरकारचे एक ध्येय आहे,

ज्या अर्थी लोकाना आनंदी ठेवण्याचा कार्यक्रम युद्धपातळीवर हाती घेणे आवश्यक आहे,

त्या अर्थी विनोदासाठी एक वेगळे खाते स्थापन करण्याचा निर्णय सरकार घेत आहे. या खात्याची रूपरेषा ठरविण्याचा अधिकार जनरल ॲड्मिनिस्ट्रेशन या खात्यास देण्यात येईल. विनोद खात्यासाठी खास मंत्री असेल व त्यांच्या दिमतीस एक उपमंत्री असेल. त्याशिवाय आवश्यक तो नोकरवर्ग भरती करण्यात येईल.

सुदाम पुरोहितने हा मेमो गंमत म्हणून लिहिला. दुसऱ्या दिवशी जेवताना आपल्या मित्राना दाखवून त्याना चकित करावे असा त्याचा विचार होता. इतक्यात सुपरिंटेंडेंट खांबेटे त्याच्या टेबलाजवळ येताना दिसले म्हणून त्याने पिवळसर कागदांच्या एका फायलीत तो मेमो दडवून ठेवला आणि समोरच्या उघडया 'अर्जंट' फायलीत लक्ष घालण्यास सुरुवात केली. ती फाईल संपवून त्याने बाजूला ठेवली. मग त्याने हळूच टेबलाचा खण उघडला आणि 'श्यामा' मासिकातील





अनुक्रमणिका

एक चुटचुटीत कथा तो वाचू लागला. सव्वाचार वाजता चहासाठी कँटीनमध्ये भेटायचं त्यानं सुनंदा वाघ्यापूरकरला आश्वासन दिलं होतं. म्हणून त्या सुमाराला उगीचच हातात चार कागद घेऊन त्यानं शेजारच्या टेबलावरच्या सामंताना म्हटलं, "अकौंट सेक्शनमध्ये एवढा हिशेब देऊन येतो." सामंतानी त्याच्याकडे अविश्वासाने पाहात, "बरं" असं म्हटलं आणि "हा लेकाचा चहा प्यायला जातो आहे." अशी मनाशी खूणगांठ बांधली.

सरकारी कचेरीतल्या कँटीनमध्ये चहा मिळायला वेळ लागतो तेवढा त्यादिवशी लागलाच. पुनः एक तरुण आणि तरुणी भेटल्यावर त्यांच्या गप्पा रंगल्या यालाहि आश्चर्य नाही. पण खरे आश्चर्य पुढेच आहे. सुदामने पावणेपाच वाजता कशावशा गप्पा आवरत्या घेतल्या. आणि काखेत कागदांचा गठ्ठा घेऊन घाईघाईने आपल्या खोलीत त्याने प्रवेश केला. तेव्हा बहुतेक कारकून दिवसाचं काम संपवून कचेरी बंद होण्यापूर्वीची आवराआवर करीत होते. सुदामनेहि उगीचच गडबड असल्याचं दाखवीत चार कागद इकडून तिकडे नि तिकडून इकडे ठेवले. इतक्यात त्याच्या लक्षात आलं की, मघाची 'अर्जंट' म्हणून लाल अक्षरांची चिट्ठी असलेली फाईल आपल्या टेबलावर नाही. त्यानं ओरडून शिपायाला हाक मारली, "शिर्प्या, इथली अर्जंट फाईल कुठं आहे."

"श्रीपतराव म्हनत्यात मला" त्या शिपायाने आपला दबदबा काय आहे तो सांगितला.

"बरं तुला मी गोपाळशेठसुद्धा म्हणतो. पण लेका फाईल कुठाय्?"

"खांबेटे सायबानी अर्जंट मागितली म्हून दिली." श्रीपतरावानी शांतपणे सांगितले.

मग मात्र सुदामच्या छातीत धस्स् झालं. कारण त्या अर्जंट कामाबरोबर त्याच्या खालची फाईलहि साहेबाकडे गेली होती आणि त्या फायलीत तर 'सरकारने विनोदाचे खाते स्थापन करावे' असा विनोदी मेमो होता ! काय वाटेल ते करून तो मेमो हस्तगत केला नाही, तर आपली कंबक्ति आलीच हे सुदामाने ओळखले. तो धावतच सुपरिंटेंडंट खांबेटेंच्याकडे गेला.

"सर ती मघाची फाईल जरा परत हवी आहे––" त्याने चांचरत सांगितले.

खांबेटेंनी हातातल्या घड्याळात पाहिले पाचला पाच मिनिटं होती. चष्मा काढला. तो चष्म्याच्या घरात घातला. खिशातून दुसरा चष्मा काढला. तो नाकावर चढवीत ते म्हणाले, "मिस्टर पुरोहित, ते सगळे कागद सही करून गेले असिस्टंट सेक्रेटरी साहेबांच्याकडे. तुमच्यावर आणि सामंतांच्यावर केवढा विश्वास आहे पहा माझा. तुमच्यासह्या मी पाहिल्या आणि मी समजलोच की, सारं काही व्यवस्थित असणार म्हणून आणि सगळं वाचायला वेळ तरी कुठं होता ? आजच्या तारखेचे अर्जंट काम काय वाटेल ते झालं तरी आजच साहेबांच्याकडे गेलं पाहिजे. गेल्या एकवीस वर्षात एक दिवसहि लेट झालेला नाही माझ्या कामाला. काय समजलेत ? चला. पाच वाजले."

खांबेटे उठले, तेव्हा सुदामलाहि आपल्या टेबलाजवळ परतणे भाग पडले. त्यानेहि दोनचार मिनिटात आवराआवर केली आणि मित्रांच्या बरोबर तो बाहेर पडला. विनोदाचे खाते स्थापन करण्याचा आपला कागद चुकून असिस्टंट सेक्रेटरीसाहेबांच्याकडे गेल्याचे हृदयविदारक वृत्त त्याने मित्राना सांगितले. ही सगळी गंमत होती तोपर्यंत ठीक होते. पण आता मात्र सर्वानाच चिंता वाटू लागली. कारण सरकारी कामात अशी थट्टा मस्करी केली, तर प्रकरण अंगाशी आल्यावांचून राहणार नाही, अशी त्यांची खात्री होती.

दुसऱ्या दिवशी सकाळी अकरा वाजताच असिस्टंट सेक्रेटरी खटावकर यानी खांबेटेना तांतडीचं बोलावणं पाठवलं. ते आल्यावर खटावकर गंभीरपणे म्हणाले, "मिस्टर खांबेटे, तुमची नोट मी वाचली. तुमचं म्हणणं मला पटलं. आपण सरकारी कामात अशी स्वतंत्रबुद्धि दाखवली पाहिजे. आय् अप्रीशिएट युवर मेमो."

"थँक यू सर" खांबेटेंची छाती अभिमानानं फुलून गेली. कोणत्या मेमोबद्दल साहेब आपली पाठ थोपटताहेत याची त्याना कल्पना येईना. पण एकवीस वर्षांच्या नोकरीचं सार्थक झाल्याचा भाव त्यांच्या चेहऱ्यावर उमटला.

"तुमच्या मेमोवर मी शिफारशीचा शेरा मारून डेप्युटी सेक्रेटरी साहेबांच्याकडे पाठवला आहे. यावर्षी प्रमोशनसाठी नावं पाठव-



**'विनोद खाते' काढण्यासाठी मंत्रीमंडळाची खास बैठक**

ताना मी तुमची आठवण ठेवीन. गुड वर्क मिस्टर खांबेटे" असं म्हणून खटावकरानी खांबेटेना जाण्याची अनुज्ञा दिली.

खांबेटे आपल्या खुर्चीवर आल्यावर आदल्या दोन तीन दिवसांची कामं आठवण्याचा प्रयत्न करू लागले. आपल्या कोणत्या कामाची साहेबांच्यावर एवढी छाप पडली असावी बरं ? पाणी टंचाईच्या वेळी विहिरी खोदाव्या म्हणून त्यानी एक मेमो लिहिला होता. काटकसर करावी म्हणून युद्धकालाप्रमाणे टाचण्याऐवजी बाभळीच्या झाडाचे काटे वापरावे अशी एक सूचना त्यानी केली होती. पण त्यांची सर्वात स्वतंत्र आणि मूलगामी सूचना होती ती सरकारी बक्षिसे आणि मराठी साहित्य यांच्या बद्दलची होती. परीक्षक मंडळाकडून त्या त्या वर्षीच्या पुस्तकांची तपासणी करून घेऊन उत्कृष्ट पुस्तकाना बक्षिसे दिली जातात, ती पद्धत चुकीची व खर्चाची आहे असे मत खांबेटे यानी आपल्या मेमोमध्ये व्यक्त केले होते. त्याऐवजी मराठीतील लेखकाना दरसाल चाळीस बक्षिसे द्यावीत व ती लेखकांच्या नावाप्रमाणे आकारविल्हे द्यावीत असे त्यानी सुचवले होते. म्हणजे पहिल्या वर्षी असोलकर, अमोणकर, आपटे, उनडने, इथापे, इत्यादीना बक्षिसे द्यावीत. दुसऱ्या वर्षी कुळकर्णी, कारेकर, करमरकर अशा नावाच्या लेखकाना बक्षिसे द्यावीत. त्यानंतर खांडेकर, गरगटे


पांढऱ्याशुभ्र कपड्यांचे रहस्य?'
'Tinopal'
















मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





इत्यादि लेखक शिस्तीने आणि क्रमवार घ्यावेत. अशा पद्धतशीर बक्षीस वाटपामुळे परीक्षकाना द्यावा लागणारा पैसा वांचेल आणि सर्वत्र लेखकाना बक्षिसे मिळाल्याने कोणीहि असंतुष्ट राहणार नाही असा खांबेटे यांचा कयास होता. आपली हीच सूचना असिस्टंट सेक्रेटरी साहेबाना आवडली असावी याबद्दल त्यांची खात्री झाली.

त्यानंतर चार दिवसानी सुपरिटेंडंट खांबेटेना खुद्द डेप्युटी सेक्रेटरीनी बोलावले. ते म्हणाले, "मिस्टर खांबेटे, तुमच्या सूचनेवर मी बराच विचार केला. तुमच्या म्हणण्यातला पॉइंट माझ्या लक्षात आला. तुमची सूचना फार महत्त्वाची आहे."

"थँक यू सर."

कल्याणकारी सरकारनं लोकांच्या जीवनाचा मूलगामी विचार केला पाहिजे. त्याशिवाय लोक सुखी होणार नाहीत. नुसत्या वरवरच्या उपायांचा उपयोग होणार नाही. सरकारनं आता या बाबतीत त्वरित आणि कडक पावलं टाकली पाहिजेत.

"यस् सर."

"तुमची सूचना मी माझ्या शिफारशीसह सेक्रेटरी साहेबांच्याकडे पाठविली आहे. साहेबानी कायदा-खात्याकडे जी. आर. ड्राफ्ट करायसाठी ती पाठवली आहे. पण हे पहा. अजून हे काम कॉन्फिडेन्शियल आहे. कुठं बोलू नका."

"नाही सर. कुठे बोलणार नाही."

त्या खोलीतून बाहेर आल्यावर खांबेटेना स्वर्ग दोन बोटंच उरला. आपण आपल्या सूचनेनं जी. आर. करू शकतो, याचा त्याना रास्त अभिमान वाटला. कल्याणकारी राज्य वगैरे शब्द त्यांच्या मूळ मेमोत नव्हते, पण वरिष्ठानी ते घातले असावेत अशी त्यांची खात्री झाली.

मंत्री मंडळाच्या बैठकीत त्या जी. आर. वर गंभीरपणे चर्चा झाली. सरकारने विनोदासाठी वेगळे खाते काढावे याबद्दल एकमत झाले. एक उपमंत्री म्हणाले, "आपण सर्वजण विनोद निर्माण करण्यासाठी आपआपल्या परीने प्रयत्न करतो हे खरे. पण आपण तरी किती कार्य करणार ? आपल्या मर्यादा स्पष्ट झाल्या आहेत. आपल्या कित्येक निवेदनानी लोक आता हसत नाहीत ही वस्तुस्थिति आहे. त्यासाठी खास वेगळे खाते स्थापन केले पाहिजे."

"माझा याला पाठिंबा आहे." दुसरे मंत्री म्हणाले, "विनोदी लेखकांच्या भाषणात हशा पिकतो. नवकवींच्या काव्य गायनात लोक हसतात. आमच्या भाषणांच्या वेळी मात्र ते गंभीर राहतात. लोकानी अधिक हसले पाहिजे."

शेतकी मंत्री म्हणाले,"अधिक धान्य पिकवा या मोहिमेसारखीच 'अधिक हशा पिकवा', 'खसखशीचे मळे पिकवा', 'हसा आणि लठ्ठ व्हा' अशा मोहिमा सरकारने हाती घेतल्या पाहिजेत."

अर्थमंत्री म्हणाले, "अधिक धान्य पिकविण्याची मोहीम अयशस्वी झाली, तर पावसाला दोष देता येतो. पण अधिक हसण्याची मोहीम अयशस्वी झाली तर मात्र पावसावर जबाबदारी टाकून अंग झटकता येणार नाही."

अशा प्रकारे बरीच चर्चा होऊन शेवटी विनोदासाठी सरकारात





वेगळे खाते काढावे असे ठरले. या नव्या खात्याचे मंत्रीपद कोणाला द्यावे हा प्रश्न अर्थातच अत्यंत वादग्रस्त होता. हे खाते एखाद्या प्रथितयश विनोदी लेखकाकडे जावे असे एका मंत्र्याने सुचविले. तेव्हा दुसरे मंत्री म्हणाले, "राजकीय कार्यकर्त्यात विनोदबुद्धि नसते असे म्हटले म्हणजे आमचा अपमानच आहे. कोणत्याहि पक्षाचे निवडणूक जाहीरनामे पहा. त्यात जितका विनोद असतो, तितका विनोद कोणीहि कल्पक लेखक लिहू शकलेला नाही. पक्षाच्या वदलत्या धोरणानुसार आम्ही आमची निवेदने जेव्हा फिरवतो तेव्हा काय कमी विनोद होतो ? अतिशयोक्ति हा विनोदी लेखकांचा हुकमी एक्का असतो. पण आम्ही सरकारच्या आणि देशांच्या प्रगतीची चित्रे रेखाटताना जी अतिशयोक्ति करतो, तेवढी एका तरी विनोदी लेखकाला कधी साधली आहे काय ? पायांचे दगड वसविताना आम्ही जी भाषणे करतो, ती काय विनोदी साहित्यिकांच्या लेखापेक्षा कमी प्रभावी असतात? अशा प्रसंगी पोलीस फार मोठ्या प्रमाणावर हजर असल्यामुळे आमच्या भाषणांच्या वेळी लोक हसत नाहीत हे खरे. पण म्हणून आम्ही विनोदास कमी आहोत असा मात्र अर्थ काढू नये. या खात्याचा मंत्री आपल्यापैकीच राजकीय कार्यकर्ता असला पाहिजे असं मला वाटतं."



**वा, वा ! अशी डाळ आम्ही उभ्या आयुष्यात खाल्ली नाही, हीः हीः हीः**

ही सूचना मंत्री मंडळात संमत झाली. मग नव्या खात्याच्या स्थापनेची यंत्रे जोरात फिरू लागली. नवीन खात्यात खास विनोदबुद्धि असलेल्या नवीन नोकरांची भरती करण्यासाठी जाहिराती देण्यात आल्या. त्यात पात्रतेच्या अटी अशा होत्या: अर्जदाराचे वय २५ हून अधिक असता कामा नये. मागासलेल्या जमातीच्या बाबतीत ही वयोमर्यादा ४५ वर्षांची राहील आणि वन्य जमातींच्या बाबतीत ही वयोमर्यादा ५५ वर्षांची राहील. अर्जदारास हसण्याचा अनुभव किमान १५ वर्षांचा असावा. मागासलेल्या जमातीना हा अनुभव तीन वर्षांचा व वन्य जमातीना सहा महिन्याचा असला तरी चालेल.

अर्जदाराला विनोदबुद्धि असल्याचे सर्टिफिकेट गॅझेटेड ऑफिसर किंवा जे. पी. यांचे असावे. पूर्वीच्या नोकरीत अर्जदाराने विनोदबुद्धि दाखविल्याचे दाखले असल्यास उत्तम. 'हंसा व लठ्ठ व्हा' हे या खात्याचे ब्रीद वाक्य असल्याने हसून लठ्ठ झालेल्याना अधिक सवलति. मात्र नुसतेच लठ्ठ अर्जदार या सवलतीना पात्र असणार नाहीत. ते इतर कोणत्याहि कारणानी लठ्ठ झालेले नसून केवळ हसून लठ्ठ झाले आहेत, असे ज. पी. चे सर्टिफिकेट अर्जासोबत जोडावे.

ही सरकारी जाहिरात वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाल्यावर सगळीकडे मोठीच खळबळ माजून राहिली. कारण 'सरकार' आणि 'गंभीर' या शब्दांचा इतका अतुट संबंध आहे की, सरकारला कधी काळी विनोदाची गरज लागेल असे कोणाच्या स्वप्नातसुद्धा येत नाही. 'अन्नप्रश्नाचा सरकार गंभीरपणे विचार करीत आहे.' 'पाणी टंचाईचा सरकारपुढे गंभीर प्रश्न', 'संपाच्या गंभीर परिस्थितीवर सरकारचे गंभीर उपाय' अशा वातम्या वाचण्याची लोकाना सवय असल्याने सरकारला आता कधी नव्हे ती विनोदाची आठवण व्हावी याचे सर्वांना आश्चर्य वाटू लागले. 'विनोदी नोकर न मिळाल्यामुळे सरकारची गंभीर परिस्थिति' अशा वातम्या वाचण्याचीहि लोकानी आता तयारी ठेवली.

पण दुर्दैवाने तसे काही झाले नाही. आलेल्या हजारो अर्जातून सरकारी पद्धतीने निवड झाली. अनेक विनोदी लेखकांचे अर्ज आले होते. त्यातील काही जणाना सुपरिटेंडंट म्हणून घेतले. पाश्चात्य साहित्यावर डल्ला मारून किंचित् विनोदी काव्ये लिहिणाऱ्याना 'औटवर्ड-इनवर्ड' क्लार्क म्हणून घेतले. ग्रामीण लेखकाना ग्रामीण भागातील विनोदी मामलेदार व अव्वल कारकून म्हणून जागा मिळाल्या. फुकटच्या वाङ्मय फौजदाराना विनोदी इन्स्पेक्टर्स म्हणून घेण्यात आले. विनोदी नटाना निवडणुकीच्या वेळी सरकारतर्फे आश्वासने देण्याचे नाटक करण्याकरता नेमले गेले. इंग्रजीवरून मराठी साहित्य गुपचूपपणे स्वतःच्या नावावर चढविण्याचा लेखिकाना स्त्रियांच्या बातम्या सरकारकडे गुपचूपपणे पोचविण्यासाठी सी. आय्. डी.कडे नेमण्यात आले. संपादकाना बोलावून त्याना सरकारच्या नव्या धोरणास पाठिंबा देण्याची विनंति कण्यात आली. थोडक्यात म्हणजे सरकारने विनोद खात्याच्या कायद्यांची अंमलबजावणी करण्याची सर्व सिद्धता केली.

एखादी महत्त्वाची घोषणा करावयाची असल्यास मुख्यमंत्री नभोवाणीवर जनतेस उद्देशून भाषण करतात. त्याप्रमाणे यावेळीहि मुख्य मंत्र्यांचे भाषण झाले. ते म्हणाले, "लोक हो, हसा आणि लठ्ठ व्हा. हे आमच्या नव्या खात्याचे ब्रीद वाक्य आहे. उद्यापासून आपल्या राज्यात विनोदाचे नवे खाते सुरू होत आहे. ते सुरळीत चालावे म्हणून राज्यपालानी दोन वटहुकूम काढले आहेत.त्यामुळे या नव्या खात्याच्या नियमाविरुद्ध आता कोणालाहि न्यायालयात जाता येणार नाही. विनोदाच्या या नव्या खात्याची रूपरेषा मी थोडक्यात अशी मांडतो.

आपल्या राज्यातील लोक गेल्या काही वर्षात अधिकाधिक दुःखी होत असल्याचे सरकारच्या निदर्शनास आले असल्याने त्याना आनंदी करण्यासाठी सरकारने हे नवे खाते काढले आहे. त्यामुळे जनतेच्या आनंदात भर पडेल अशी सरकारची खात्री आहे. यापुढे दर बुधवार व शनिवार हे खास विनोदासाठी राखून ठेवण्यात येतील. या दोन दिवशी लोकानी आनंदी असावे, हसावे, विनोद करावेत व इतरांचे विनोद लक्षपूर्वक ऐकावेत अशी तरतूद करणारे नियम सरकार जारी करीत आहे. त्याशिवाय आवश्यकता वाटल्यास दर सोमवारी संध्याकाळीहि लोकानी आनंदी राहावे अशी तरतूद करणारा निर्बंध लागू करण्यात येईल.

उद्यापासून अमलात येणाऱ्या सरकारी नियमानुसार सर्व कारखानदार व दुकानदार याना दर बुधवारी व शनिवारी आपला कामगारवर्ग व गिऱ्हाईके याना निदान दोन तास हसत ठेवल्याचे किंवा आनंदी ठेवल्याचे फॉर्म भरून सरकारकडे पाठवावे लागतील. सर्व दुकानदारानी आपल्या दुकानात आलेली गिऱ्हाईके किती हसली याचे फलक सर्वाना सहज दिसतील अशा ठिकाणी लावले पाहिजेत. हे फलक बरोबर लावले आहेत की, नाही हे पाहण्यासाठी वाङ्मय फौजदार जातील. असे फलक न ठेवल्याबद्दल कमाल सहा महिने सक्त मजुरी व पाचशे रुपये दंड या शिक्षेस दुकानदार पात्र होऊ शकेल. ही शिक्षा त्याला हसत हसत भोगावी लागेल.

दर बुधवारी व शनिवारी नभोवाणीवर विनोदी भाषणे होतील. पहिले वर्षभर दर शनिवारी या नव्या खात्याचे मंत्री स्वतः भाषण करतील व बुधवारी उपमंत्री भाषण करतील. ही भाषणे ऐकून जनतेने भरपूर हसावे व सरकारशी सहकार्य करावे अशी विनंति आहे. हसा आणि लठ्ठ व्हा हे या नव्या खात्याचे ध्येयवाक्य असल्याने गृहनिर्माण खात्यापुढेहि अनेक गंभीर समस्या निर्माण होतील. लोकांचा आकार मोठा होईल व त्याची तरतूद म्हणून गृहनिर्माण खात्याच्या आगामी गाळयांचा आकारहि मोठा धरावा अशी सूचना त्या खात्यास करण्यात आली आहे.

वृत्तपत्रानी दर बुधवारी व शनिवारी हास्यकारक लेख छापून सरकारशी सहकार्य करावे अशी त्याना विनंति करण्यात येत आहे. वृत्तपत्रानी सध्याप्रमाणेच आंतरराष्ट्रीय राजकारणावर अभ्यासू अग्रलेख लिहावेत, म्हणजे विनोदासाठी त्यांचा वराच उपयोग होईल अशीहि त्याना सूचना करण्यात येत आहे. विनोदाच्या या प्रश्नाकडे जनतेने गंभीरपणे पाहावे अशी विनंति करून मी माझे भाषण पुरे करतो."

दुसऱ्या दिवसापासूनच नव्या विनोदी कायद्यांची आणि नियमांची अमलबजावणी होण्यास सुरुवात झाली. मुख्य मंत्र्यानी मंगळवारी रात्री भाषण केले होते. त्यामुळे दुसऱ्या दिवशी सकाळपासूनच दुकानदारांवर आणि कारखानदारांवर गिऱ्हाईक व कामगार याना हसत ठेवण्याची जबाबदारी येऊन पडली. त्यामुळे सतत भांडण्याची मोठीच पंचाईत होऊन गेली. एखाद्या रेशन दुकानात असे दृश्य दिसू लागले:

संतापलेले गिऱ्हाईक : अहो, काल ही डाळ नेली, ती सगळी किडकी निघाली. हे काय दुकान आहे की थट्टा आहे ?

दुकानदार : हाः हाः हाः तुम्ही फार गंमतीदार बोलता बुवा. मग काय, आमची डाळ शिजत नाही म्हणता ?

गिऱ्हाईक, अधिक संतापाने: किडकी डाळ देता आणि वर आमचीच चेष्टा करता ? मी सरकारकडे तक्रार करीन. मी वर्तमानपत्रात पत्र लिहीन (इतक्यात लाईनीतला एक इसम पुढे येतो. आपण वाङ्मय फौजदार व सरकारी इन्स्पेक्टर असल्याचे ओळखपत्र दाखवून गिऱ्हाईकाला दटावतो) इन्स्पेक्टर : मिष्टर, आज बुधवार आहे. आज भांडता काय ? आनंदी रहा. हसा. नाहीतर सहा महिने सक्तमजुरी.

गिऱ्हाईक : अर्रर्र ! खरंच की, विसरलोच होतो मी. वाणीसाहेब, तुमची डाळ बेष्ट आहे हां. हॉः हॉः हाः ! इतकी विनोदी डाळ आम्ही कधीच पाहिली नव्हती. म्हणून तर तुमचं अभिनंदन करायला आलो होतो.

हे उद्गार ऐकताच दुकानातील इतर गिऱ्हाईकेहि खदखदा हसायला लागतात. कारण विनोद खात्याच्या इन्स्पेक्टरची कडक नजर त्यांच्याकडे असते. दुकानदारहि आपल्या फलकावर खडूने येथे दर बुधवारी व शनिवारी हसविले जाईल, असे जाहीर करतो. ते पाहून समाधानाने सरकारी तपासनीस खाली उतरतो.

कारखान्यातहि बुधवारी आणि शनिवारी कामगारांच्यावर रागावणे मॅनेजरला किंवा जॉबरला अशक्य होते. कामगाराने काहीहि चूक केली, तरी 'हात्तिच्या! एवढंच ना ? तुझ्या या चुकीमुळं माझी खूपच करमणूक झाली. पण गुरुवारी मात्र अशी चूक करू नकोस हं." असं म्हणणं त्याना भाग पडत असे. कामगारांचे प्रमाद हसण्यावारी नेले नाहीत, तर फॅक्टरी इन्स्पेक्टर खटले भरतील, अशी कारखानदाराना नेहमीच भीति वाटत असे. कामगारानी वारंवार रजेचे अर्ज केले, तरी व्यवस्थापकाना ते हसतमुखाने पास करावे लागत असत.

सार्वजनिक क्षेत्राप्रमाणेच खाजगी आणि वैयक्तिक क्षेत्रातहि विनोद खात्याच्या नियमाने चांगलाच गोंधळ उडवून दिला. पूर्वी नवरा बायकोना केव्हाहि भांडण्याचे स्वातंत्र्य होते. पण आता त्याना भांडण्यापूर्वी कॅलेंडरवर वार पहावा लागत असे. तो पहायचा एखाद्याने विसरला, तर विपरीत प्रसंग ओढवला जाई. उदाहरणार्थ, नवरा रात्री उशीरा आला, तर बायको तो वार बुधवार असल्याचे

विसरून ओरडत असे, "काय हे ? किती वाजले ? उशीर करायला काय सुमार ?"

"मार ? छेः छेः अग मी काही तुला मार देणार नाही" नवरा हसत हसत म्हणतो.

"वर हसायला काही वाटतं का मनाला ? वसला असाल सिगरेटी फुंकीत, नाहीतर पत्ते झोडीत. आम्हा बायकांचं नशीवच—"

"थोर म्हणून आमच्यासारखे नवरे मिळतात. होय ना ? हॉः हॉः हॉः अग आता मी तुला एक गंमतीची गोष्ट सांगतो. एकदा काय झाले, एक हत्ती होता –"

"चुलीत घाला तो तुमचा हत्ती." ती फणकाऱ्याने म्हणते.

तरीहि तो हसतच राहतो. म्हणतो, "अग चूल ती केव्हढी आणि हत्ती तो केवढा."

पण तिच्या रागाचा पारा वाढतच असतो. मग तो हळूच तिच्या जवळ येऊन कानात सांगतो, "अग, आज बुधवार आहे. आनंदी रहायला पाहिजे. आपल्या शेजारच्या उपावाई सी. आय. डी. आहेत ना ?"

मग पत्नीलाहि नवे कायदे आठवतात आणि ती मोठमोठ्याने



अग, आपल्या शेजारच्या उपावाई सी. आय. डी. त आहेत. हसत रहा !

हसायला लागते. म्हणते, "खरंच. तुमची हत्तीची गोष्ट किती छान आहे हो. मला तर वाई हीः हीः हीः हसूच आवरेना."

हे शब्द ऐकून भितीला कान देऊन वसलेल्या उपावाई सुटकेचा निश्वास टाकतात आणि सरकारकडे शेजारची केस रिपोर्ट करायचा विचार सोडून देतात.

पण विनोद खात्याच्या कायद्यांच्या कडक अमलवजावणीमुळे कोणाची सर्वात अधिक कुचंवणा झाली असेल, तर ती काही रडतराव लेखकांची आणि टीकाकारांची. आपला संवंध असलेल्या आणि नसलेल्या गोष्टींची आठवण काढून सतत सुतकी चेहरा करायचा, हृदय नेहमी हुंदक्यानी भरलेले असायचे आणि इतरांच्या नांवे नेहमी वोटे मोडीत रहायची या लोकाना इतकी सवय लागली होती कीं आठवड्यातून दोन वेळा आनंदी रहायची सरकारी ऑर्डर आपल्या मुळावरच आली आहे असे त्याना वाटू लागले. विशेषतः आंवट चेहऱ्याने उदास विचार व्यक्त करण्यातच ज्यानी आपले जीवन साफल्य मानले अशा काही टीकाकारांची तर या कायद्याने फारच पंचाईत केली. दारूवंदीच्या काळात काही अट्टल लोक शेजारच्या राज्यात जाऊन आपली हौस भागवून येत, तसे काही कट्टर उदासीन लोक आपल्यावर हसण्याची पाळी येऊ नये म्हणून दर बुधवारी शनिवारी शेजारच्या राज्यात जाऊन राहू लागले. मराठी चित्रपटांच्या काही दिग्दर्शकांचीहि या कायद्याने अडचण झाली. कारण डोळ्यातून भरपूर अश्रू काढणारे चित्रपट त्यानी तयार केले होते. पण नव्या कायद्याच्या पालनासाठी बुधवारी व शनिवारी त्यांची चित्रपटगृहे ओस पडू लागली. काहीहि करून प्रेक्षकाना रडवायचेच अशी प्रतिज्ञा केलेल्या नाटककारानीहि आपल्या कौटुंबिक आणि रडव्या नाटकांचे या दोन दिवसांचे खेळ वंद केले.

पुढील शालेय वर्षापासून शाळा व कॉलेजातहि विनोदाचा एक तास ठेवावा अशी सूचना नव्या विनोद खात्याने शिक्षण खात्यास केली. या वातमीचा सुगावा लागताच आपलीच क्रमिक पुस्तके या अभ्यासक्रमाना लागावीत, म्हणून काही ठेकेदार लेखक व प्रकाशक यांची वर्दळ शिक्षण खात्याकडे चालू झाली. त्यामुळे विनोदी लेखकांचा भाव एकदमच वधारला. शिक्षण खात्यानेहि या नव्या तासाचा हसतमुखत विचार केला आणि विनोदाच्या क्रमिक पुस्तकात जो कोणी जास्तीत जास्त गोंधळ करील, त्याला त्यांचे कंत्राट देण्याचे शिक्षण खात्याने ठरवले. या नियोजित गोंधळाचा ठपका कोणावर ठेवायचा हेहि आधीच ठरविण्यात आले.

विनोद खात्याच्या नव्या कायद्याची अंमलवजावणी होऊन एक महिना पूर्ण झाल्यावर त्या खात्याच्या मंत्र्यानी नभोवाणीवर या कायद्याच्या प्रगतीचा आढावा घेतला. त्यासाठी त्यानी भरपूर आकडेवारी गोळा केली होती. मंत्री महाशय म्हणाले, "विनोद खात्याची स्थापना होऊन त्याच्या कायद्याची अमलवजावणी झाल्याला आज एक महिना पूर्ण झाला आहे. एवढ्या अल्प मुदतीत या खात्याने प्रचंड प्रगति करून हास्याचा आणि आनंदाचा धवधवाच निर्माण केला आहे. या खात्यामुळे राज्यातील लोक अधिक सुखी आणि आनंदी झाले आहेत, अशी सरकारची खात्री झाली आहे. या मुदतीत चार बुधवार आणि पाच शनिवार आले. राज्यातील दोन कोटी अडतीस लक्ष सात हजार एकशेचार लोक या मुदतीत खदखदा हसले आणि एक कोटी तीन लक्ष पंचवीस हजार एकशे अठ्ठावीस लोकानी नर्म हास्य केले. वाकीच्या वहुतेकानी दर बुधवारी व शनिवारी मंद स्मित केले. गेल्या वर्षी याच मुदतीत राज्यात किती लोक हसले याची आकडेवारी उपलब्ध नाही, पण तो आकडा यापेक्षा खूपच कमी असावा असा सरकारी तज्ञांचा अंदाज आहे.

सरकारी कायद्याची कडक अमलवजावणी करण्यास दुसऱ्या बुधवारपासून सुरुवात झाली. त्यानंतरच्या तीन आठवड्यात, सरकारी नियमाप्रमाणे न हसल्यावद्दल राज्यात तीन हजार तीनशे छपन्न लोकांवर खटले भरण्यात आले. त्यापैकी एक हजार लोकाना एक आठवडा ते तीन महिनेपर्यंत शिक्षा झाली. वाकीच्याना ताकीद देऊन सोडण्यात आले. खुद्द विनोद खात्याच्या मंत्र्यांच्या वेळी न हसणारा एक इसम आढळला. त्याला पोलिसानी तात्काळ अटक केली. त्याला जास्तीत जास्त म्हणजे सहा महिन्याची शिक्षा झाली. या खात्याचे काम अतिशय समाधानकारकपणे चालले असून आगामी काळात लोक अधिकाधिक हसतील असा सरकारचा विश्वास






आहे. या खात्याच्या तत्त्वांच्या प्रचारासाठी 'लोकहास्य' नावाचे मासिक या खात्यातर्फे काढण्यात येणार असून भरपूर हसणाऱ्याना व हसविणाऱ्याना ते मोफत पाठविण्यात येईल."

सरकारच्या बहुतेक कायद्यांप्रमाणे या कायद्यानेहि जनतेची कुचंबणा सुरू झाली. कारण केवळ सरकारी हुकूम आहे म्हणून दर बुधवारी आणि शनिवारी उठल्या सुटल्या हसणे कोणालाहि तापदायक वाटणार. वरिष्ठांच्या विनोदाला कनिष्ठाना हसावेच लागते. पण म्हणून काय उगीच कोणाच्याहि विनोदाला हसत सुटायचे ? प्रजेला अधिक आनंदी करण्याचा हा सरकारी धोपट मार्ग जनतेत सुवर्णनियंत्रणासारखाच अप्रिय होऊ लागला. सरकारी इन्स्पेक्टर्सच्या भीतीने लोक आठवड्यातून दोन वेळा कसे बसे हसू लागले, तरी जवळपास इन्स्पेक्टर्स नाहीत असे पाहून ते खुशाल त्रस्त होऊन या कायद्याच्या भंगाची चर्चा करू लागले. इतर राज्यातून या राज्यात येणाऱ्या लोकाना या कायद्याची कल्पना नसल्याने बुधवार शनिवारी या कायद्याचा सर्रास भंग होऊ लागला. दारूबंदीच्या कायद्याप्रमाणेच या हास्यकारी कायद्यातूनहि पळवाटा निघू लागल्या. दोन दिवस आनंदी न राहिल्याबद्दल ज्यांच्यावर खटले भरले होते, त्यांच्या बचावाच्या वकिलानी "आमचे अशील आजारी होते. त्यांच्या पोटात दुखत होते व डॉक्टरांचा उपचार चालू होता." असा बचाव देण्यास सुरुवात केली. इतकेच नव्हे तर या निवेदनाच्या पुष्ट्यर्थ त्यानी डॉक्टराची पूर्वीच्या तारखेची बिले सादर करण्यास सुरुवात केली. त्यामुळे शेकडो लोक निर्दोष सुटू लागले.

काही वकिलानी तर "आमचे अशील नवकवी आहे." किंवा "प्रतिवादी हे मराठी टीकाकार आहेत." असा बचाव दिला. या दोन्ही जातीतील लोकाना हसणे हे नैसर्गिकरित्या अशक्य असल्याची कोर्टाची खात्री असल्याने ते निर्दोष सुटू लागले. लोकाना या कायद्याचा त्रास होतो हे पाहून विरोधी पक्षानी त्याचा फायदा घेण्याची जय्यत तयारी सुरू केली. 'विनोदी कायद्याचा निषेध असो', 'रडा आणि बारीक व्हा', 'बुधवारी शनिवारी शोकदिन पाळा' अशी उघड कायदेभंगाची चिथावणी देणारी पत्रके विरोधी पक्षाने लावली. इतकेच नव्हे, तर एका बुधवारी विधिमंडळावर प्रचंड मोर्चा नेऊन या कायद्याविरुद्ध निदर्शने करण्याचा निर्णय सर्व विरोधी पक्षानी जाहीर केला. 'आमच्या हाती सत्ता आली, तर जनतेला कधीहि हसावे लागणार नाही.' असे जाहीर आश्वासनहि विरोधी पक्षाने दिले.

ठरल्याप्रमाणे बुधवारी जनतेचा प्रचंड मोर्चा विधिमंडळाच्या दिशेने निघाला. बुधवार असूनहि लोकानी खिन्न चेहऱ्याने त्यात भाग घेतला. नेहमीप्रमाणे पोलिसानी पांढऱ्या घोड्याजवळ मोर्चा अडवला. पण बुधवारचे सरकारी महत्त्व लक्षात घेऊन पोलिसानी लाठीमार किंवा अश्रुधूर यांचा वापर मुळीच केला नाही. हे जनतेचे सरकार असल्याने जनतेच्या भावना पोलिसानी मुळीच दडपता कामा नयेत अशा सूचना त्याना देण्यात आल्या होत्या. त्यामुळे त्या दिवशी पोलिस व त्यांचे अधिकारी आदि



**साला, बुधवार असून हसत नाही ?**

हसतमुखाने मोर्चा अडवीत होते. पण मोर्चातील लोकांचा त्वेष अनावर होत होता. त्यानी हसणाऱ्या पोलिसाना धडक मारून पलीकडे विधिमंडळाच्या आवारात घुसण्याचा निर्णय घेतला. तेव्हा पोलिसानाहि अखेरचे शस्त्र उपसावे लागले. हे शस्त्र म्हणजे नव्या विनोद खात्याने दिलेले विनोदी चुटक्याचे एक प्रचंड पुस्तक होते. पोलिसानी लाऊडस्पीकर चालू केले आणि त्या पुस्तकातील चुटके मोठ्याने वाचायला सुरुवात केली.

ते सरकारी विनोदी ऐकून मात्र मोर्च्यातील लोकांचे मनोधैर्य गळले. तीव्र स्वरूपाच्या लाठीमारानेहि जे काम होऊ शकले नसते, ते पोलिसांच्या निवडक विनोदी चुटक्यानी केले. लोक वाट फुटेल त्या बाजूला सैरावैरा धावू लागले. अवघ्या अर्ध्या तासातच दहा पंधरा हजार लोकांच्या मोर्चाची पूर्णपणे पांगापांग झाली. त्यामुळे या नव्या शस्त्रावरची पोलिसखात्याची श्रद्धा वाढली. यापुढे कोणत्याहि निदर्शनांवर लाठीमार किंवा गोळीबार करण्यापेक्षा सरकारमान्य विनोद वाचून दाखविणे अधिक परिणामकारक होईल असा त्यानी वरिष्ठांकडे रिपोर्ट केला.

सरकारी विनोदाच्या भयंकर विनाशक शक्तीमुळे विरोधी पक्षांचा मोर्चा जरी अयशस्वी झाला, तरी या नव्या कायद्या विरुद्धचा जनतेचा असंतोष वाढतच होता. काही लोकानी त्याविरुद्ध आझाद मैदानावर उपोषण करण्यासहि सुरुवात केली. वृत्तपत्रानीहि या कायद्याचा फेरविचार करावा अशी मागणी केली. सत्तारूढ पक्षाच्या बहुतेक आमदारानीसुद्धा आपल्याला बुधवार शनिवारीच काय पण इतर वेळीहि हसणे किती कठिण आहे याची कल्पना राज्यकर्त्याना दिली. तरी पण विनोद खात्याच्या मंत्र्यांचा हट्ट कायमच होता. या

[पृष्ठ १०५ पहा]

# घरट!

—ना. व्यं. देशपांडे

बघता बघता तिच्या बाहूंना करंजीच्या फांद्या फुटतात. तिच्या गाजरबुंद टाचांभोवती पांढुरक्या फुलांचा सडा....त्यातून नक्षीकाम करून वळवळत गेलेला टायरचा वण.... करंजीच्या पानांचा स्निग्ध थंडपणा....त्याला विचारावसं वाटतं... पण...पण नकोच... ?



मिस् पाटनवाला त्याच्याजवळूनच चालत असते. सुनीता मात्र सांभाळून दोन हात अंतर राखून चालत असते. पाटनवाला कशी अगदी मित्रानं लगटून चालावं अशी चालते आहे. बडबडते आहे. प्राध्यापकाना शिव्या घालते आहे. सहलीमधल्या गमती पुनः पुनः आठवते आहे. त्या चाखते आहे. चाखवते आहे. धोंडो विठ्ठल 'य्स्... नो' करीत चालला आहे. मध्येच पाटनवालाला जाणवतं. त्याच्याकडे बरंच ओझं आहे. तिला त्याची दया येते. ती पटकन् त्याच्या हातातील बॅग काढून घेते...तिचा पंजा—लांबसडक निमुळती बोटं असलेला—त्याचा हात क्षणभर कुरवाळून जातो. अंतर्यामी तो लालीलाल होऊन जातो. तो फक्त ओशाळं हसतो... घाम टिपतो. स्पर्श झालेल्या ठिकाणची लव मोहरली आहे की काय, त्या ठिकाणी जवसाची निळी इवली इवली फुले फुलली आहेत की काय अशी त्याला शंका येते. सुनीता प्रधानलाही असंच करावसं वाटतं. पण ती बोलत नाही. तसंच अंतर राखून ती चालत असते. पाटनवालाचं घर येतं. 'बाय् बाय्' दोन्ही हातात दोन बॅगा घेऊन ती ज्यूली अँड्र्यूजसारखी नाचत नाचत फाटकाआड अदृश्य होते.

मग त्या दोघांचीच वाटचाल सुरू होते. सुनीता प्रधानचं घरही केव्हा तरी येणार होतं. अन् वाटचाल संपणार होती.

" किती मनमोकळी अन् बडबडी आहे, नाही ? " तो म्हणतो.



अनुक्रमणिका

"हो. स्वभावानंदेखील फार चांगली आहे." ती दुजोरा देते.

एक करंजीचं झाड सावलीचे पाय आडवे पसरून रस्त्याच्या एका बाजूला बसलेलं असतं. त्याची सगळी पानं कशी हिरवीकंच आणि तजेलदार! एकादं पान चुरगाळलं तर त्यातून करंजीच्या कडवट पण स्निग्ध आणि थंड तेलाचे एकदोन थेंब ओघळावेत! सावलीत, त्या तांबड्या रस्त्याच्या धुळीत त्या झाडानं अगदी पहाटे पहाटे आपल्या पांढऱ्या जांभळसर इवल्या इवल्या फुलांची गंधर्वचूळ टाकलेली असते. आता उन्हानं त्या फुलांची कवळीक किंचित् कोमेजलेली असते. सायकलीच्या टायरीचा एक वण सापासारखा त्यातून वळवळत गेलेला स्पष्ट दिसतो.

"आपण क्षणभर थांबू या इथं?" तो धीर धरून विचारतो.

"हो."

"मला फार आवडतं करंजीचं झाड . ."

ती त्या पसरलेल्या, किंचित् कोमेजलेल्या पांढुरक्या जांभळसर फुलांकडे पाहात राहते. त्याची नजर तिच्या लांबट, सरळ नाकाच्या अग्राकडे. . . क्षणैक तिच्या गाजरबुंद टाचांकडे. तिच्या चालण्यात एक प्रकारचा विलक्षण तोल असतो. सर्वांनाच काही सुंदर चालता येत नाही. एकदा तो आपल्या मित्राला म्हणाला होता : "काय चाल आहे रे तिची. अगदी खुडून घ्यावीशी वाटते . . . बघ!" ते संभाषण परत एकदा आठवतं.

त्या गर्द सावलीत ते क्षणभर विसावतात. . . . सुखावतात . . . अन् गाणेदेखील विसरून जातात.

"निघू या ना? आई वाट पाहात असेल . . ."

"तो भानावर येतो . . . 'अं ऽ हो . . हो. उशीर झालाय् खरा . . . चलू या भरभर . . ."

त्यानं प्रिझम्चा चष्मा नाकावर चढवलेला असतो. सगळं कसं सप्तरंगी दिसत असतं त्याला.

ती काहीतरी म्हणत असते. निथळणारा घाम टिपीत असते. काखेपाशी घामाचा ओलसर डाग विस्तृत होत चाललेला असतो. "छत्री घ्यायला हवी होती!" ती किंचित् तक्रारीच्या सुरात म्हणते.

'कशाला हवी छत्री? या उन्हातदेखील भटकण्यात किती मजा असते! अन् उन्हाचे प्रकार तरी किती विविध! सकाळचं कोवळं रेशमी ऊन, पावसाळ्यातलं ढगांच्या अभ्रयातून झिरपणारं ऊन, दुपारचं रखरखीत ऊन, थंडीतलं ऊबदार ऊन . . कातडीवरच्या रंध्रारंध्रातून ऊन झिरपत असतं आत . . शरीरातल्या रोगांना आणि विकृतींना कदाचित् भाजून काढत असेल—शरीर निरोगी राहावं म्हणून . . . उन्हाची किमया उघड्या डोळ्यांनी बघण्यात गंमत असते. गॉगल् घालणाऱ्यांना त्याचं काय स्वारस्य?" मन चाहेल ते तो बडबडत असतो. ती चकित होऊन ऐकत असते.

तिचं घर जवळ येत असल्याचं त्याला जाणवतं. अन् तो विचार त्याला नकोसा वाटतो. बुद्धिबळातल्या प्याद्यासारखं त्याला जरा पुढं टोलवावं असं वाटतं.

मध्येच एक मोटार भुर्कन् निघून जाते. तो पाहात राहतो. मोटारीतल्या व्यक्तीला तो ओळखतो. अन् पाठमोरा होऊन लहान होत जाणाऱ्या मोटारीकडे पाहात राहतो अन् एक सुस्कारा टाकतो.

"काय हो; काय झालं?" ती चमकून विचारते.

"त्याच्या शेजारी ती बसलीय् ना, ती त्याची बायको."

आता तिला हसू आवरत नाही. ती विचारते :

"मग काय झालं त्यात?"

"ही त्याची दुसरी बायको. पहिलीशी लग्न केलं. गडगंज पैसा मिळाला तिच्याकडून. आपलं उच्च शिक्षण वगैरे सर्व पुरं केलं त्यातून. पैसा हातात खेळायला लागल्याबरोबर दिला घटस्फोट. लोक म्हणतात; तो लग्न झाल्यापासून नवरा या नात्यानं वागलाच नाही तिच्याबरोबर आणि घटस्फोट मात्र ती वांझ आहे या कारणावरून घेतला. वरून दिसतो कसा रुबाबदार बेटा!" तो बोलायचं थांबतो.



### पहाट

शीग भोगाची सांडली
उता आली माझी रती
तेव्हा कुठे अर्थावली
देवळातली आरती.

उसळत्या अंगरंगा
फुटे मद्याच्या डहाळ्या
तेव्हा देह झाला देहू
ऐके तुक्याच्या चिपळ्या.

सुसाटल्या या रातीचा
संग तमाशी पिसाट
त्यातूनच टॅह्याऽऽ टॅह्याऽ
हाका मारते पहाट

—मधुकर केचे

भोवरा खेळताना लहान मुले जशी दुसऱ्याच्या भोवऱ्याला गुच्चे मारीत राहतात, तसा मनातल्या मनात तो त्या रुबाबदार बेट्याला गुच्चे मारीत राहीला.

सुनीता प्रधान हळहळली. इतक्यात तिचं घर आलं आणि संभाषणही तिथंच तुटलं.

तिला पोहोचवून तो परत फिरला तेव्हा पहिल्याप्रथमच त्याला ऊन जाणवतं. पण तो काहीशा गुंगीत होता. त्याच्या नाकावरचा प्रिझम्चा चष्मा अजून उतरला नव्हता. रंगांची सरमिसळ होत होती. मघाचा तो बेटा आणि त्याची मोटार काही डोक्यातून जात नव्हती. आपण आणि सुनीता दोघांनी असंच जायला हवं नाही—मोटारीतून?— छे! छे! आपली अशी वर्गातील ओळख व्हायला नको होती. अगदीच अन्रोमँटिक!

मग तो सुनीताला पाहतो ती मोटार चालवताना सारा रस्ता निर्मनुष्य असतो. अशीच निवांत दुपार आहे. तो आपल्याच गुंगीत असतो. हॉर्नचा आवाज त्याला ऐकू येत नाही. मग एकदम ब्रेक्सचे खेकसणे.

डोळयांपुढे काजवे चमकतात अन् सगळाच अंधार...

डोळे हळूहळू उघडतात ते हॉस्पिटलमध्ये ...मोगऱ्याच्या फुलांचा शीतल-कोमल स्पर्श गालाना लागून ! तो हळूहळू डोळे उघडतो..मोगऱ्यांचा परिमळ खोलीभर पसरून राहिलेला असतो. त्या परिमळाच्या नितळ थरातून त्याला दिसते एक अप्सरा. त्याने डोळे उघडलेले पाहताच हिंदी चित्रपटातील नायिकेसारखी ती आनंदाने चित्कारते. "बाबा ते पहा त्यानी डोळे उघडले ! " तिचे वडील मंद स्मित करतात. तेही हिंदी चित्रपटातील नायिकेच्या वडिलांसारखे. त्याना सारे कसे छान् उमजते. तिची शुश्रूषा सुरू होते.

एक दिवस कपाळावरील पट्टीवरून हात फिरवता फिरवता ती विचारते : "आता बरं वाटतं ना ? "

तो नकळत तिचा हात आपल्या हातात घेतो; कुरवाळतो व म्हणतो : "असे हात शुश्रूषा करायला असले म्हणजे कां नाही बरं वाटणार ? पण इतके दिवस झाले तुमचं नाव नाही सांगितलंत ? "

ती लाजत लाजत सांगते; "सुनीता प्रधान."

मग ती हिंदी फिल्म अशीच लांबत जाते.

धोंडो विठ्ठल मघाच्या करंजीच्या झाडापाशी येतो. चमकून घड्याळात पाहतो. अडीच वाजलेले असतात. मग तो आपल्या फिल्मचे भेंडोळे त्या करंजीच्या सावलीत ठेवून चटाचटा चालू लागतो.

तरी पण धक्का देणारी ती मोटार मात्र त्याच्या मनात घरघरत असतेच !

☆ ☆

स्वयंचलित वाहनं सुसाट धावत असतात पिसाट वाऱ्यासारखी. एवढीशी जागा दिसली की, घुसवलेच मोटारीचे नाक पुढे ! मग रहदारीचे नियम गेले झक् मारत ! ते नियम पाळायचे पादचाऱ्याने फक्त ...

पलीकडच्या फुटपाथवर नजर ठेवून धोंडो विठ्ठल उभा राहिलेला आहे. अलिकडे तो जरा फुगला आहे. फोफसा झाला आहे. लोक म्हणतात धोंडो विठ्ठलला मानवले आहेत दिवस. पँट पोटाला फिट् बसते. पण खरं म्हणजे धोंडो विठ्ठलला गॅसेस्चा विकार जडलाय् अलीकडे. पोट कसं सदा भरलेलं आणि फुगलेलं ...

छत्रीवर किंचित् भार देऊन धोंडो विठ्ठल तसाच उभा आहे. घरी इतक्यात जाऊन तरी काय करायचं ? तो सहजी मागं वळून पाहतो. तो चमकतो. भल्या मोठ्या काचेमागे त्याची सुनंदा त्याच्या आवडीच्या कुसुंबी रंगाचं पातळ नेसून सस्मित उभी ! डावा हात किंचित् डावीकडे जमिनीला समांतर झुकलेला आहे. त्यावरून साडीचा पदर ओघळतो आहे. उजव्या हाताची तर्जनी किंचित् उंचावून ती विचारतेय् : "अहो, पाहताय् कुठं ? माझ्याकडे की, माझ्या साडीकडे ? "



**मधुचंद्राच्या दुसऱ्या दिवशी**

**तिला सखीने विचारले, "रात्री, तुझ्या पतीनं काय काय केलं ते सांग ना?"**

**त्यावर ती म्हणाली, "हे मंचकावर येताच माझ्या वस्त्राची गाठ आपोआप सुटली. पण वस्त्र साफ गळून पडलं नाही. मेखलेच्या आकड्यात अडकल्यामुळं वस्त्राचा किंचितसा भाग माझ्या शरीरावर राहिला होता. एवढंच मला आठवत आहे. पुढं त्यांचा मला स्पर्श झाल्यावर ते कोण, मी कोण, आम्ही करीत आहोत काय याचं मला भानच राहिलं नाही. मी आठवणीची तशी पक्की आहे हे तुला माहीतच आहे."**

**(अमरुशतक १०२)**

रस्त्याला पाठमोरा होऊन तो त्या डमीकडे तसाच पाहात उभा राहतो... तिच्या अवतीभवती नाना तऱ्हेचे, नाना रंगाचे कापड झुळझुळत असते. पावसाळ्यात घाटामधून गाडीतून येताना कडेकपारीतून वेगवेगळ्या रंगाचे, आकाराचे प्रवाह उड्या मारीत असताना दिसतात त्याप्रमाणे. त्या कापडांचे रंग आणि डिझाइन्स पाहता पाहता तो हरखून जातो. हे टेक्स्टाइलवाले वेटे मोठे कल्पक आणि रसिक ! या रंगाची नांवं तरी सांगता येतील काय आपल्याला ? छे ! रंगच रंग. गडद, फिके, आरस्पानी, चकचकीत, मळकट, झुळझुळीत. त्या कापडाच्या भाऊ गर्दीत त्या शोकेसमध्ये एका पांढऱ्याशुभ्र कॅनव्हासवर दोन पिवळीधम्मक फुलपाखरं दिसतात. ती आपल्या मिशा एकमेकांना स्पर्शून कुजबुजत असतात, 'मार्च वुइथ करंट फॅशन.' आपल्या पंखांवरील आकृत्या या टेक्स्टाइलवाल्यानी चोरल्या असल्याचं सुचवीत असतात. त्याच्या डोळयांपुढे करंजीचे गर्द झाड उभं राहतं. तो हिरवाकंच तजेलदार रंग ! .. रस्त्याच्या बाजूला झुकलेल्या फांदीवरील पानांवर लालसर धुळीची किंचित् पुट्टे चढलेली. खाली लालसर मातीत इतस्ततः पसरलेली गोजिरवाणी, पांढरकी—जांभळसर फुले. त्यावरून नक्षीकाम करून गेलेला सायकलीचा टायर ! साऱ्याचं सुंदर डिझाईन तयार होतं... अगदी तसलीच बॉर्डर असलेल्या बेडशीटची सुबक घडी त्याला त्या शोकेसमध्ये दिसते.

"एकदा असले बेडशीटस् घेऊ या हं आपण ! " सुनंदा सांगत असते. 'किती मुलायम आहे यांचा पोत— आणि रंगच्छटा तरी किती नाजूक !'

"अहो त्या बेडशीट जोडीची किंमत काय ? "

"ही ना साहेब ? " विक्रेता उल्हसून म्हणतो, "फार काही नाही फिफ्टीसिक्स नाइन्टी. संपूर्ण सेट आहे साहेब यात. आपल्याला त्याच रंगाचे दोन अभ्रे मिळतील. किती सेटस् देऊ ? "

अनुक्रमणिका








तो सुनंदाकडे पाहतो. तिच्या काखेपाशी घामाचा ओला डाग विस्तृत होत चाललेला दिसतो त्याला. मग किंचित् वाळले हसून तो विचारतो : "धुवर मांजरपाट आहे का ?"

विक्रेत्याचा उत्साह निम्मा मावळतो. 'त्या पलीकडच्या कौंटरवर जा साहेब. अरे किसन, साहेबाना मांजरपाट दाखव . ."

त्याला इतक्यात आठवते. आपल्याला पलीकडे जायचे आहे. तो पुनः पाठमोरा होतो अन् रस्त्याला सामोरा होतो. वाहनं अजून तशीच पळताहेत. उत्तरदिग्विजयासाठी . . मग तो मोटारी निरखू लागतो अन् त्यातील सजीव शिल्पे पाहून वर्फाच्या खड्यासारखा विरघळायला लागतो . .

एकामागून एक, दोन दोन, चार चार ओळींमध्ये मोटारी निसटत आहेत. त्याना धाकधूक आहे तांबड्या दिव्याची. हिरवे वाण अजून तजेलदार आहेत तोवर निसटून जाण्याची त्याना घाई असते. एका लालचुटुक मोटारीत ती एकमेकाना कशी खेटून वसली आहेत. त्याचा अधिरा हात तिच्या अंगावरून फिरतो आहे, सारखा. दोघंही कशी मस्त, बेपर्वा होऊन राहिली आहेत. कोण आहेत ती दोघं ? नवपरिणित ? वाग्दत्त ? चोरटे ? भुरटे ? कदाचित् दोन तासांची रखेली देखील असू शकेल. आज शनिवार आहे. केमिस्टच्या अन् मारवाड्यांच्या दुकानातील शीथ्सच्या चकचकीत डब्या खमंग गरमागरम भज्यांसारख्या भराभर खपताहेत.

त्या लालचुटुक मोटारीपाठीमागून ही दुसरी मोटार निघाली. जरा मोठी आहे. आत गोकूळ भरले आहे. छोटे छोटे गुबगुबीत पंजे आहेत. काही वाळमुठीतून रंगीबेरंगी फुग्यांची निसटण्याची धडपड चालू आहे. मुलावाळांवर प्रेम करणारा कुणी शेटजी असावा. शहरी कोंदट वातावरणात मुले खुरटतात. त्याना मोकळ्या हवेत नाचायला बागडायला नेलं पाहिजे असं त्याला मनापासून वाटत असावं. आपल्याला शेटाणीवरोबर तो मुलांचाच

[दीपा. ११]

विषय काढत असला पाहिजे. पाहिलात कसा गप्पात रंगला आहे तो ?

यांच्या पाठीच धावते आहे ही स्पोर्टस्कार दोन दणकट हातांचे तरुण शेजारी शेजारी वसले आहेत. हाकणाऱ्याचे लक्ष स्पीडोमीटरकडे निम्मे आणि मित्राच्या भाषणाकडे निम्मे आहे. समोरच्या त्याच्या गाडीच्या मानाने चालणाऱ्या संथ गतीच्या वाहनांचा त्याला राग आहे. त्याला बेछूटपणाने सोडायची आहे गाडी ! जान गेली तर पर्वा नाही ! बेछूटपणातलं थ्रिल् अनुभवायचं आहे त्याला.

ही एकटीच कां चालली आहे टॅक्सीतून ? भिरभिरत्या नजरेनं काय न्याहाळत आहे ? कोठे जायचं आहे तिला ? अभिसारिका आहे का खंडिता ? प्रोषितभर्तृका आहे का विरहोत्कंठिता ? . . . सालं, या वेशभूषेवरून तर काय उमज पडत नाही बुवा !

धोंडो विठ्ठलला रस्ता पार करायचं लक्षातच राहात नाही. त्याचे डोळे जागच्या जागीच लेफ्टराईट् करायला लागतात. तो आपलं अस्तित्वच विसरून जातो त्या वेगाच्या झळाळीमध्ये. इतक्यात तो भानावर येतो. आपल्याला घरी जायचं आहे लक्षात येतं त्याच्या. तो एक पाऊल पुढं टाकतो—

त्या कारमध्ये बसला आहे कोणी गिरणीमालक. कशी वाऱ्यासारखी मोटार पळवतोय. एक कल्पना सळसळून जाते . . वीज जमिनीत घुसून जावी तशी . . तिच्याखाली आपण सापडलो तर ? अगदी चाकाखाली नव्हे हं. किंचित् धक्का लागावा. फार तर हाड मोडावं एखादं . . . .

एकाएकी ब्रेक्सचे कर्कश आवाज ऐकू येतात. लोकांची पळापळ आणि बघ्यांची गर्दी जमते. कोणी हाकणाऱ्याला शिव्या घालतो तर कुणी पादचाऱ्याचा बावळटपणा काढतो. मोटारीचा मालक त्याला उचलतो. मोटारीत घालून हॉस्पिटलमध्ये पोचवतो.

. . . सुनंदा घाबरली आहे. पोरं भेदरली आहेत. त्याना काय माहिती आपली

ट्रिक ? सुनंदाला सांगावं कां ? . . . अग वेडी आहेस्. मुद्दाम घडवून घेतला अपघात म्हणून काय झालं ? नुकसानभरपाईचे पैसे मिळतील आपल्याला . . . आहेस कुठं?

तीन आठवड्यात घरी परतायचं. मग वकीलाचा सल्ला घ्यायचा. चाळीसहजारांचा क्लेम मागायचा. जीव काय मातीमोलाचा आहे ? इंग्लंड—अमेरिकेमध्ये नुसत्या मेंटल शॉक्साठी केवढी प्रचंड नुकसानभरपाई मिळते. आमचाही देश स्वतंत्र आहे. इथं चाळीस पन्नास हजार मागा-

यला काहीच हरकत नाही. हो? अगदी जीव जायचा प्रसंग होता. फ्रॅक्चरवरच भागलं म्हणून बरं... ठीक आहे. चाळीस-पन्नास हजार नाही तरी पाच हजार तरी मिळतील. तडजोडीला बसल्यानंतर काय? ठीक ठीक. पाच हजार तरी कुणी पाहचलेत? ठीक आहे. पाच हजार तर पाच हजार! आज अगदी नड आहे. शिवाय आपणहून ओढवून घेतलेला अपघात. कुणाला कळायचं नाही हे गुपित! चोरट्या सोन्याचा, चोरट्या दारुचा व्यापार करून पैसे मिळविण्यापेक्षा हे आत्मक्लेशाचे पैसे काय वाईट? ... या पाच हजारातून काय काय घ्यायचं बरं? सुनंदाच्या साऱ्या हौशी फिटवून टाकू आपण! मुलांचे सगळे हट्ट पुरवू आपण. फार दिवसात—फार कुठले—एकदाही नाही. थंड हवेच्या ठिकाणी जाऊन राहिलो नाही आपण..जाऊ उत्तरेकडे मसूरीला किंवा दक्षिणेत उदकमंडलम्ला.

...अरे, हे काय? आपण पलीकडच्या फूटपाथवर कसे अल्लद आलो? कुठे दुखापत नाही, साधं खरचटणंही नाही... कुठला धक्का न् कुठचं फ्रॅक्चर? सारं कसं शाबूत आहे. मोटारी तशाच मधा-साररूया पळताहेत. क्षणभराचाही श्वास न घेता... बेगुमानपणे अन् आपण रस्ता सुरळीतपणे पार करून आलो. धोंडो विठ्ठल कपाळाचा घाम पुसत पुढे चालू लागतो.

☆☆

संध्याकाळ हलक्या पावलाने पसरत आहे...

खिडकीशेजारी टाकलेल्या खाटेवरून धोंडो विठ्ठलला आकाशाचा निळाभोर चौकोनी तुकडा दिसतो आहे. अंगावरील खरबरीत चादरीपेक्षा, तेवढा आकाशाचा चौकोन कापून अंगावर पांघरला तर किती बरं वाटेल नाही? नितळ, झुळझुळीत. साईसारखा मऊमऊ स्पर्श असेल नाही त्याचा? अवघडलेला उजवा पाय दुमडण्यासाठी तो पाय वर घेऊ लागतो. मग लक्षात येतं कीं, आपला पाय फ्रॅक्चरमध्ये आहे. बिल्कुल हलवता येत नाही. काय गमतीदार अपघात बुवा! हो. गमती-दारच—नाहीतर काय? अगदीच अकल्पित. रस्त्यावरून चाललो होतो थोडेच आपण? फूटपाथवर चक्क उभे होतो. एक मूल बेफिकीरपणे पतंग उडवीत होते. त्याच्या बेभानपणाचं कौतुक करीत आपण उभे होतो...आणि त्या बेफिकीर मुलाची रस्त्यावरची पळापळ पाहून जीव खालीवर होत होता. त्याला ओरडून सांगावेसे वाटत होते.."ए पोरा. हट बाजूला. एवढा सोन्याचा जीव नकोसा झालाय काय तुला?" इतक्यात केवढा मोठ्ठा कर्णकर्कश आवाज झाला. दोन मोटारींची अगदी रानडुकरांच्या मुसंडीसारखी टक्कर. त्या धक्याने त्या लोकूमलची—हो. लोकूमलच तो—गाडी एकदम माझ्या बाजूच्या फूटपाथवर चढली. मी क्षणार्धात कोसळलो. पुढं काय झालं कोण जाणे?

दोन चार दिवस सरकारी हॉस्पिटलात पाहुणचार उपभोगला अन् मग कुणाच्या प्रेरणेनं कोण जाणे, तेथून आपली रवानगी या शांत स्वच्छ, खासगी हॉस्पिटलात झाली. आपण कसलीच तक्रार केली नव्हती. अस्वच्छतेबद्दल, परिचारक व परिचारिका यांच्या बेफिकीरीबद्दल. मग, कुणी आपल्याला हलवलं? सुनंदाला विचारलं तर म्हणते त्या सिंध्यानेच—लोकूमलनेच आपण स्वतः पैसे खर्च करून इकडे हालवलं आपल्याला. ठीक आहे. आपली इथंही काही तक्रार नाही. सर्व काही सुरळीत आहे.....

तो पुनः आकाशाच्या निळचाभोर चौकोनाकडे पाहू लागतो. त्या निळ्या रंगाकडे एकाग्रतेनं पाहता पाहता त्याच्या डोळ्यात पाणी येतं. मग बाजूला तोंड फिरवतो. त्या खोलीच्या भितींना फिकट गुलाबी प्लॅस्टिक पेंट दिलेला आहे. त्याच्या दृष्टीबरोबरच तो आकाशाचा चौकोनी तुकडा त्या भिंतीवर थोडा वेळ तरळत राहतो अन् हळू हळू त्या फिकट गुलाबी रंगात मिसळून जातो. एक विलक्षण नीरवता भरून राहिली आहे खोलीत. खाटेशेजारच्या छोट्या कपाटावर एका बशीमध्ये दोन लठ्ठ पण लोभसवाणी लालचुटुक सफरचंदे हसताहेत. त्याच्या-शेजारी हॉस्पिटलचे नाव असलेले स्टेनलेसचे तांब्याभांडे. खिडकीलगतच्या कोपऱ्यातील फुलदाणीत फुले खोवलेली दिसताहेत. तिच्या वरच्याच बाजूला नाजूक गुंफण घातलेल्या प्लॅस्टिकच्या इलेक्ट्रिक वायरी भिंतीवर सरकत सरकत खाटेच्या दिशेने झेप टाकत आल्या आहेत आणि त्याच्या उशालगत दोन वेगवेगळ्या रंगाचे वेडस्विचेस् लोंबत आहेत—देवळातील लहानमोठ्या घंटांसारख्या. एक आहे बेलचे स्विच्. दुसरे आहे दिव्याचे. दोन्ही स्विचेस् वेगवेगळ्या रंगाची आहेत. धोंडो विठ्ठलची नजर फिरत्या सिनेकॅमेऱ्याप्रमाणे प्रत्येक वस्तूवर क्षणभर स्थिरावत स्थिरावत, एक वर्तुळ पुरं करते. त्याच्या देहाचे फूलपाखरू पुनः एकवार त्या वस्तूंवर बसून येते. वेडस्विचेस् वायरी, फुलदाणी, फुले, स्टेनलेसचे तांब्याभांडे, ती सफरचंदे, ही खाट, आपण, खिडकीतून दिसणारा तो आरस्पानी चौकोन.....काही अतूट नातं आहे काय? छे! कधीच संबंध नव्हता यांचा मग आज कसे एकत्र आलो आपण? हे सफरचंद खाऊन संपवायचे आहे....उद्या हे तांब्याभांडे हलवले जाईल...हा वल्वही केव्हा तरी जळून जाणार आहे. मग उगाच कशाला त्याभोवती नातं जोडायचं?

खोलीचं दार करकरतं. डॉक्टर आले वाटतं. अरे वा. त्यांची डॉक्टरपत्नीपण आलेली दिसतेय्.

"कसं वाटतं आता?" डॉक्टर विचारतात.

त्यांची पत्नीपण मंद हंसते. काय चकचकीत दात आहेत डॉक्टरांचे! बघतच राहावेसं वाटतं.

"वा छान् आहे ना!"

डॉक्टर त्याचा पाय हलवून वगैरे पाहतात. त्यांच्या बायकोची नजर कोपऱ्यातील फुलदाणीकडे असते. तिचा प्रोफायल् काय झक्क दिसतो. चाळीशी उलटली असली तरी तिचा अटकर बांध तसाच शाबूत आहे. आपल्या कॉलेज-









मधल्या त्या सुनीता प्रधानसारखा. कानाच्या पाळीखाली, मानेजवळचा तीळही तसाच...धोंडो विठ्ठल दचकतो. नक्कीच! ही सुनीता प्रधानच....बघता बघता तिच्या बाहूना करंजीच्या फांद्या फुटतात. तिच्या गाजरवुंद टाचांभोवती करंजीच्या पांढुरक्या फुलांचा सडा.....त्यातून नक्षीकाम करून वळवळत गेलेला टायरचा वण.. करंजीच्या पानांचा स्निग्ध थंडपणा... त्याला विचारावसं वाटतं........पण नकोच.. तिच्या आठवणीतही नसेल कदाचित्. तसा आपला कितीसा संबंध आला होता? तांब्याभांडे, फुलदाणी, सफरचंद, ही खाट, या वायरी, आपण अन् हा आकाशाचा चौकोनी तुकडा.....तसंच.....

ती दोघंही बाहेर पडतात. तिच्या टाचांकडे धोंडो विठ्ठल पाहात राहतो. मग उशीखाली हात घालून दोनतीन पत्रे काढतो. एक त्याच्या मुलाचे—नानाचे—लंडनहून आलेले पत्र असते. ते पुन: वाचतो. त्याला कळवायला पाहिजे होती ही अपघाताची बातमी. सुनंदा म्हणाली होती खरं. मीच नको म्हटलं. काय करायचंय् कळवून? महिन्याभरात होईन बरा. नानाचं हे अखेरचं वर्ष. चला, संसारातील इतिकर्तव्यता संपली. त्यानं बायकोही पाहून ठेवलीय् असं ऐकतो. आनंद आहे. विषाद करण्यासारखं काय आहे त्यात? सुनंदाला आपलं वाटतं. वेडी आहे ती. तिला दाखवली पाहिजेत ही सफरचंद, ही फुलदाणी, या वायरी, हे तांब्याभांडे.....बस्स. कशासाठी वाईट वाटून घ्यायचं! आता हेच पहा ना? वास्तविक तिनं यावेळेपर्यंत इथं यायला हवं होतं. नाही आली. काही काम निघालं असेल, अडचण उद्भवली असेल. म्हणून झाला असेल उशीर. एवढं चरफडण्यासारखं तरी काय झालंय्? अन् सुनंदा तरी माझी कोण? मी तिचा कोण? हो. आठवतायत् मला ते दिवस. त्या रात्री, ते रुसवे, ते मोहक हंसणे...त्या चिंता—अंत:करण कुरतडणाऱ्या. पण आता काय त्याचं? त्या रात्रीच्या देहांच्या गुंफणी! आता प्लॅस्टिकची वायर बनली आहे.. ते रुसवे आणि हसणे या बेडस्विचेससारख्या हवेवर झुलताहेत, आमचा नाना-हॉस्पिटलचे नाव मिरवणाऱ्या या तांब्याभांड्यासारखा. मी? मी कसा? या सफरचंदातून अलगदपणे काढलेल्या बी—सारखा. वा! मस्त मजा आहे... कसं छान् वाटतं आता.

पुन: दार वाजतं. कोण? सुनंदा आली वाटतं. नव्हे. हे तर लोकूमल. साठीच्या घरात पोचला आहे. या बेट्याला आपल्याविषयी एवढा कसला लोभ वाटतोय्? कां आपलं कुतुहल ?

"या लोकूमल........"

"कसा वाटतो जोशीसाब आता?"

"वा! मस्त!"

लोकूमल आपल्या लालसर सिंधी त्वचेवरून हात फिरवतो अन् धोंडो विठ्ठलकडे पाहात राहतो. मग थोड्या वेळानं तो विचारतो:

"जोशीसाब, तुम्ही क्लेम्स ट्रायब्यूनलला अर्जी दिला काय?"

धोंडो विठ्ठल नकारार्थी मान हलवतो.

लोकूमलला आश्चर्य वाटतं. 'तुमी मराठी लोक मोठा अजीब. दहा हजार रुपये मिळाले असते तुमाला. आम्हाला दुखापत झाला असता तर हे पसे मिळवून बेपारात घातला असता. अहो अजून तरी देऊन टाका अर्ज. तुमच्या बायकोला, मुलाला तरी उपयोग व्हईल."

धोंडो विठ्ठल पुन: मान हलवतो.

आकाशाचा आरस्पानी चौकोनी तुकडा हसतो आहे. ओझं न वागवणाऱ्या कलंदरासारखा! ●●●



अनुक्रमणिका

# एकांतिनी

—गोपाळकृष्ण भोबे

**बोलता बोलता मन अनावर झालं, ताब्यात राहिलं नाही. आजपर्यंत कधीही न धरलेला तिचा उजवा हात धरून तिला खसकन् जवळ ओढली. चैतन्य हरवल्यासारखी ती जवळ आली; पण तिला छातीशी कवटाळून तिचे चुंबन घेणार तोच....!**



जी वनातल्या त्या एका क्षणाला राधेने आपले उभे आयुष्य दिले. त्या क्षणावर तिने प्रेम केले. त्या क्षणावर तिने जीव ओवाळून टाकला. तो क्षण जोपासण्यासाठी तिने सगळे आभाळ पाठीवर तोलले. एका वाराच्या व्रताचे एक आवर्तन संपले की, दुसरे सुरू; दुसरे संपले की तिसरे. शिवाय एकादशा, प्रदोष, चतुर्थ्या, संकष्टी आणि काय काय...! कशासाठी हे सारे राधे, कशासाठी ?

कर्दमाचे नाले चहूदूर भळभळ वाहत असताना, वासनेने लडबडलेले सारे जग त्यात आंघोळ करून समाधानाने नाचत असताना राधे, तू त्या एका क्षणाची सती होऊन काय साधलेस ? छे छे, कल्पनाही सहन होत नाही. सध्याच्या जगात अशी पराकोटीची भावडी माणसे असू शकतात यावर विश्वास बसूच शकत नाही. सारेच चमत्कारिक.

हो सारेच चमत्कारिक. राधेचे वय त्रेपन्न वर्षांचे. मी चाळीशीच्या उंबरठ्या-वरचा; पण राधेचे नि माझे एक अनामिक नाते आहे. कुठलाही पार्थिव स्पष्ट शब्द मला त्या नात्याला लावता येणार नाही. म्हणूनच ते अनामिक. या नात्याचे मला सुख वाटते, दुःखही वाटते. कधी वाटते अनंत कालपर्यंत या नात्याचे सुख भोगत राहावे. कधी या नात्याचा इतका भार होतो की, वाटते ते खाली आदळून त्याचा निकाल लावावा. हजार वेळा मी त्यापासून दूर झालो आणि तितक्याच वेळा विलगलो. कित्येक शपथा घेतल्या आणि मोडल्या

अनुक्रमणिका








राधची नि माझी ओळख सहज एका प्रसंगातून झाली. त्यांच्या घरी मला गाणे ऐकण्याकरिता आमंत्रण आले, त्यांच्या घरी जायची ती पहिलीच वेळ. सुस्तावलेल्या मनःस्थितीत तेवढ्याच निर्विकार-पणे त्या घरात मी प्रवेश केला. घराच्या नसानसात घुमणारी एक धुंद लय नि ट्यूबलाइटचा निळसर झगमगता प्रकाश पाहून माझी सुस्ती उडाली. सगळीच माणसे मायेच्या कातडीची. सगळ्याचेच चेहरे सोनचापयासारखे. समाधानाचे अमृत प्यायलेले. अकृत्रिम स्नेहाने खिळवून ठेवणारे.

बसल्या जागेवरून उठावेसे वाटेना. एका चांगल्या गायिकेचे गाणे झाले. मुष्किल रागदारी, ठुमऱ्या, भजन, गाणे शेवटपर्यंत रंगत गेले. मध्यरात्र झाली तसे वरेचसे निमंत्रित निघून गेले. मलाही निघून जावेसे वाटले. निरोप घेण्याकरिता उठलोही; पण आग्रह झाला. आर्जवी शब्दात विनंति केली गेली– 'आणखी एक अर्धा तास थांबा!'

पांच मिनिटं गेली आणि आढेवेढे घेत एक पोक्तशी बाई बैठकीवर येऊन बसली. पन्नाशी उलटलेली गोल चेहेऱ्याची. डोळ्याना भोगाची वलये नसलेली. कानशिलावरच्या सुटलेल्या बटाना रुपेरी कडा होती तेवढीच. एरवी केस काळे आणि खूप. साध्या सैल आंबाड्यावर ना वेणी ना फूल. स्थूलपणा होता पण तो सुस्तावलेला नव्हता.

"राधा आत्या, आता नाही म्हणायचं नाही हं. शपथ आहे माझी. तू गायलंच पाहिजेस!" तंबोऱ्याच्या गवसणीची गाठ सोडत एका सोळा सतरा वर्षाच्या मुलीने आग्रह केला.

'छे, छे! शपथ घालू नको राजा, सुटली म्हण!"

"नाही, नाही, खरंच शपथ आहे माझी. तू गायलंच पाहिजेस!"

"अग पण गाणं सोडून झाली किती वर्स? उगाच माझी शोभा करायला बसवता आहात तुम्ही मला. आताच इतकं चांगलं गाणं झालं. विनाकारण शपथा घातल्यास आणखी. एकदा नाही दहादा. मी गाते. पण हसू नका हं कुणी!"

मुलीच्या हातातील तंबोरा बाईने स्वतःकडे घेतला. आणि पेटीवाल्याला सूर धरायला सांगून तंबोऱ्याच्या तारा उलट सूलट पिळवटून दोन तीन मिनिटातच स्वरात लावून घेतल्या नि गाण्याचे व आपले नाते किती घनिष्ट आहे याची चुणूक दाखविली. तानपुरा कानाकडे धरून छेडीत डोळे मिटून तिने षड्ज लावला मात्र, क्षितिजाकडून एखादे लखलखीत नक्षत्र वर यावे तसे वाटले. कोंडलेला तो स्वर बाहेर फुटला. करुण, आर्त. कसल्या तरी व्यथेने ग्रासलेला. विरहाच्या कळाना सर्व बाजूनी स्पर्श करणारा.

आणि कोणता तरी एक राग. गाण्याची चांगलीच ओळख असलेल्या त्या दिवाणखान्यातील सर्वांना बुचकळ्यात टाकणारा. पेटीवाल्याच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह. सारंगियाच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह; दोघेही सुराला सूर देत होते. आधी गायलेली गायिका तर थक्क होऊन पुतळ्यासारखी बसली होती. रागाचे रूप रेखीव तशीच बाईची सगळी हालचाल रेखीव. रियाज सुटला होता. कित्येक वर्षे; पण कमविलेल्या स्वरानी गळ्याला सोडलेले नव्हते.

फक्त अर्धाच तास; पण सगळा दिवाणखाना साक्षात्कार झाल्यासारखा स्तब्ध झाला. माझ्या तोंडून नकळत एक भाराव-लेली दाद गेली– "वाहवा! क्या बात है!" गोल चेहऱ्याचे सतेज डोळे माझ्यावर खिळले. क्षणभर स्थिर झाले. पूर्व जन्मीची ओळख असल्यासारखे पुनः पुन्हा वेध घेऊ लागले–सगळा दिवाणखाना रिकामा होईपर्यंत. एक दोन वेळा मीच नजर चुकविण्याचा प्रयत्न केला; पण जमले नाही. गोंधळ दिसू नये म्हणून प्रश्न केला–

"आता गायलात तो राग कोणता?"

"माझ्या गुरुनी मला रागाचं नाव सांगितलं नाही!"

"निव्वळ थाप आहे ही. श्रोते कोड्यात पडले की, त्याना अशी काही उत्तरे देऊन उगाच झुलविण्याची काही गाय-कांची अगदी ठरलेली पद्धत आहे ही. तुम्हाला रागाचं नाव सांगयचं नसलं तर नका सांगू. राग कोणताही असो पण तुम्ही तो गायलात उत्तम. मला आवडलं तुमचं गाणं!"

"आभारी आहे मी तुमची; पण थाप मारली असा आरोप मात्र करू नका. उभ्या आयुष्यात मी खोटं बोलले नाही. माझ्या गुरुनी मला काही काही रागांची नावं सांगितली नाही. फक्त रूपं शिकविली. त्यानी रागांची नावं सांगावीत म्हणून मीही खनपटीला बसले नाही. कित्येक वर्षानी आज गायला बसले. त्या मुलीने शपथ घातली म्हणून. कुणाला कोड्यात टाकावं म्हणून नाही गायले मी तो राग. ऐन वेळी जे सुचले ते गायले!"

"तुमचे गुरु कोण?"

ती घुटमळली. माझ्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर देताना तिचे डोळे पुन्हा पुन्हा माझ्या चेहऱ्यात काहीतरी शोधित होते. गुरुचे नाव ओठावर आले पण कसल्या तरी विचाराने ते परतवले गेले. सगळ्या प्रश्नांची उत्तरे एकदम देऊन मुलाखत एकदम संपवून टाकायचा विचार दिसला नाही. काही तरी निश्चय केल्यासारखा विचार करून ती म्हणाली–

"पुन्हा जेव्हा याल तेव्हा सांगेन सारं. केव्हा याल? सोमवारी?"

"सोमवारी? . . . हं . . . . हो वेळ मिळाल्यास येईन!"

डोळ्यात निराशेची झाक तरारली. जणु त्या दृष्टीला म्हणायचे होते, असे अधुरे उत्तर देऊ नका. याच. मी त्या नजरेने भारलो. आणि सोमवारी सायंकाळी यायचे वचन देऊ लागलो.

"नको नको, सायंकाळी नको. दुपारीच या. सायंकाळी मी घरात नसते. मला अतिशय महत्त्वाचं काम असतं!"

"बरं, मग दुपारी येईन, झालं. मात्र सांगा हं सगळं–!"

सोमवारी दुपारी मी राधेकडे गेलो. आणि सांज टळली तरी परतू शकलो नाही. गाण्यावर बोलता बोलता सायंकाळ झाली. तशी नेसत्या वस्त्रानिशी राधा माझ्याबरोबर बाहेर निघाली.







चौपाटीवर आली. माझ्यावरोवर रेतीत वसली. कसली तरी अस्वस्थता तिला बेचैन करीत होती. वराच वेळ ती समुद्रात चारी वाजूना काहीतरी धुंडत होती. एका वाजूला माझ्याशी वोलत होती; पण वोलण्यात तिचे लक्ष नव्हते. थोड्या वेळाने हवे ते सांपडल्यासारखा तिने एक दीर्घ निःश्वास सोडला. आणि काळोख पडू लागला तशी ती म्हणाली,

"चला!"

"हवं ते सांपडलं का?"

"हो!"

"काय ते?"

"होडी!"

"होडी?"

"हो होडी, कुणीतरी वल्हवीत नेणारी होडी. तशी होडी डोळे भरून एकदा पाहिली की, मी घरी जाऊन माझा सोमवारचा उपास सोडते!"

"पण होडीचा आणि उपासाचा काय संवंध?"

"हा प्रश्न विचारला नाही तर नाही का चालणार? असते एकेकाची काही तरी सवय!"

"पण ही तुमची सवय विचित्र वाटली म्हणून खुलासा विचारला हो! उपास सोडायचे म्हणून काही पूर्वापारचे संकेत आहेत. कुणी सूर्यास्तानंतर देवळात जाऊन येऊन उपास सोडतात. कुणी चंद्रोदय पाहून, तर कुणी घरच्या शिवलिंगाची पूजा करून खडीसाखर खाऊन उपास सोडतात; पण होडी पाहून उपास सोडायची ही नवी पद्धत अजव वाटली म्हणून वुचकळ्यात पडलो!"

"अहो पण काही व्रतपालनाचे संकेत हे ज्याच्या त्याच्या खाजगी जीवनाशी निगडीत असतात. ते दुसऱ्याला सांगण्यासारखे नसतात. ते सांगितले तर व्रतभंग होतो म्हणतात!"

राधा गंभीर झाली तशी मी तो विषय सोडून दिला. मी तिला घरापर्यंत सोडून परत फिरताना ती म्हणाली—

"आता पुढील सोमवारी येता ना?"

तिला नाही असे उत्तर देऊन मोकळे व्हायचे एकवेळ मनात आले; पण तसे उत्तर मी देऊ शकलो नाही. आणि मग दर सोमवारी राधेला भेटणे हा एक परिपाठच झाला. प्रत्येक खेपेस तिने म्हणावे—

"पुढल्या सोमवारी भेटणार ना?" आणि चक्रात सापडल्यासारखा मी तिला भेटायला जात असे. निःसंकोच. राधा केवढी मी केवढा! तिचे वय त्रेपन्न वर्षांचे होते, मी चाळीशीच्या आतला. तिचा संगीताचा व्यासंग इतका जवरदस्त होता की, एकेका विषयावर वोलताना, त्यातील वारकावे ऐकताना सोमवारची सायंकाळ कशी संपली कळत नसे. राधा एकेक नवा राग नि एकेक अस्ताई अशी मांडून दाखवी की, आश्चर्याने थक्क होऊन तिच्याकडे एकटक पाहण्याव्यतिरिक्त मी काही करू शकत नसे.

पुढे भेटीतले आठवड्याचे अंतर पार संपले आणि त्यावरोवर आम्हा दोघातलेही. माझा कोणताही शब्द तिला मोडवेना आणि तिचा मला मोडवेना.

"राधे तानपुरा घे. तू परवा सांगितलेली 'लंकादहन सारंगाची' अस्ताई मला ऐकायची आहे."

"अरे, पण लंकादहन गायची ही वेळ आहे का? सायंकाळी हा राग गातात का?"

"मला ऐकायचा आहे राधे, आत्ता!"

ती मुकाट्याने तंवोरा काढी आणि लंकादहन असा गाई की, माझे सारे शरीर पेटून उठे. माझी प्रत्येक आज्ञा ती झेलू लागली. मी दिसलो की, तिला उचंवळून येई. कधी प्रेयसीसारखी, कधी पत्नीसारखी, कधी वात्सल्याने भरलेली अशी तिची दृष्टी माझ्याभोवती सारखी पिंगा घालू लागली. मला जे जे आवडे तें ते पुरविण्यासाठी ती आपल्या जीवाचा आटापिटा करी. तिच्या त्या वागण्यात कृत्रिमपणा वासाला देखील नसे. पन्नाशी उलटलेली राधा. पण मी दिसलो की, पंचविशीतला अल्लडपणा तिच्यात संचारे. तिचे वय वाढले होते पण शरीराच्या कमनियतेत वेडोलपणा आलेला नव्हता. यौवनाला तिने कधीच फेसाळू दिले नाही. विलक्षण निग्रहाने साऱ्या इंद्रियावर तावा ठेवला. तिचा सैलसर आंवाडा, मानवळ, घट्ट नितंव, नऊवारी नेसणातून डोकावणाऱ्या गोऱ्या गोऱ्या उठावदार पोटऱ्या हे सारे एखादी कामायनीचे होते. एकदा पाठमोरी असताना पाठी मान वळवून डावा हात आंवाड्यावर सहज ठेवून ती हसली, तेव्हा माझ्या

## आली आली, निवडणूक आली! (३)




**आगाऊ ऑर्डर नोंदल्यास पेट्या गडप करण्याची फी आकारली जाणार नाही**








डोळ्यात वासनेची लाट उसळली. तिच्या नजरेतून ते सुटले नाही. पुन्हा ती तशी उभी राहिली नाही. तशी हसली नाही.

मी हट्ट केला तेव्हा माझ्या समाधानासाठी तिने तो पवित्रा घेतला, पण त्यात ती पहिली झाक नव्हती. मला पाहायला, भेटायला, माझ्याशी पोटभर बोलायला ती आतुर असे. आपले हरवलेले काहीतरी सापडले अशा आनंदात ती वावरू लागे; परंतु माझ्या मनात मात्र वासनेची पाल चुकचुकू लागली, डोळे आरक्त होऊ लागले. त्या डोळ्यातील शब्द राधेला कळत नव्हते असे नाही. माझ्या उन्मत्त दृष्टीकडे ती टक लावूनही पाही. माझ्या या भावना वेगळ्या शब्दानी वळणे घेत मी तिच्याजवळ अनेक वेळा व्यक्त केल्या पण तिने त्या सहज झेलल्या. विरोध दाखवला नाही पण स्वीकारही केला नाही. आपला विपुल केश-संभार मानेवर मोकळा सोडून शुभ्र वस्त्र नेसून ती माझ्या स्वागताला आली की, मनाला आवर घालणे मुष्किल होई.

सोमवारच्या एका सायंकाळी चौपाटीच्या एका कोपऱ्यात आम्ही बसलो असताना बोलता बोलता मध्येच गंभीर होऊन मी म्हटले—

"कसं घडलं हे राधे?"

"काय ते?"

"कधी ध्यानी मनी नसलेला तुझा माझा संयोग!"

"हा काय वेडयासारखा प्रश्न? घटित कधी सांगता येतं काय रे? कधी कधी ध्यानी, मनी स्वप्नी नसलेलं घडतं. त्यालाच आपण अघटित म्हणतो. आपण घडवतो. ही अहंता माणसाला नसावी. आपण काही घडवीत नाही बाबा, करता करविता . ."

"नको राधे नको. आताच्या या मत्त मनःस्थितीत वेदांत नको. राधे, ते गुलमोहराचं झाड पाहिलंस? कसं तृप्तीत उभं आहे ते. संध्याकाळच्या सरत्या प्रकाशात त्याच्या फुलांचा रंग की नाही, माझ्या मनात कसली तरी खळबळ माजवतो. वाटतं. . . . ."

"एखाद्या दृष्याकडे पाहून मनाची चलबिचल होत असली ना की, त्या तसल्या दृष्याकडे पाहूच नये आपण. दुसरीकडे पाहावं!"

"राधे, का छळतेस मला? दुसरीकडे पाहावं म्हणतेस? ठीक आहे पाहीन मी दुसरीकडे. उद्यापासून भेटणार नाही मी तुला."

"का, काय झालं?"

"काय झालं म्हणून थंडपणानं तू नित्य विचारावंस? मला काय होतंय् याकडे तुझं लक्षही जाऊ नये. तुझं मेलेलं मन अशीच उत्तरं देत राहाणार आणि मोहरून येणारी माझी गात्रं अशीच सुकून जाणार. मला हे सहन होत नाही राधे!"

"बरोबर आहे. या फुलावरून त्या फुलावर झेप घ्यायचं वय तुझं. मी अशी उताराला लागलेली. माझे दस सरले, पाच उरले; किंबहुना त्यापेक्षा कमीच. मी तुला कुठवर अडवून ठेवणार?"

"असं नकोस बोलू. माझी वृत्ती तशी चंचल नाही!"

"म्हणूनच तर तू मला आवडतोस. तुझ्या चिंतनाशिवाय मला दुसरा विषय नाही रे. तू दृष्टीआड झालास की, मी बेचैन होते.

## लावणी-इंद्रधनूची



तुझ्या नेत्रात पाणी गं कसलं?
मला इंद्रधनु त्यात दिसलं.
गालि ये रक्तिमा
दिलं अव्तान अम्हा
त्याला नव्हती सीमा
सीमा ओलांडु का? मन रुसलें
तुझ्या नेत्रात पाणी गं कसलं?"
फोड नारिंगाची
जोड ठिव्ली जशी
सांग चोखू कशी?
भोंति मंतार जिवाचं बसलं
तुझ्या नेत्रात पाणी गं कसलं?"
घामिन् पिवळी धमक
सोनं मारीतं झक
नागमोडी झलकं
पान भीतीचं मनि खुसफुसलं
तुझ्या नेत्रात पाणी ग कसलं?"
गोड हिरवं हसं
लाविते ग पिसं
कुणा सांगु कसं?
समदं शिवार डुलत्यालं दिसलं
तुझ्या नेत्रात पाणी ग कसलं?"
पारव्याची जोडी
कधी मारी दडी
मधि काढि खोडी
म्हणें 'गुटुर्घुम्' असं भासलं
तुझ्या नेत्रात पाणी ग कसलं?"
निळं पातळ छान
झालं पदर विमान
त्यात अडकलि मान्
नको हलवू पदर कुणि फसल
तुझ्या नेत्रात पाणी गं कसलं?"
यावं जांभुळ पिकुन
पुरं पिकुन उलुन्
विसता जावं भुलून
मन उल्लेल्या फटीत बसलं
तुझ्या नेत्रात पाणी ग कसलं?"

- अमर शेख








आणि उद्यापासून मला भेटणार नाही म्हणतोस?"

पुन्हा आपली करुण दृष्टी तिने माझ्यावर रोखली आणि त्या दृष्टीत मी विरघळून गेलो.

एकदा नाही. अनेकदा. ज्या ज्या वेळी माझ्या वासनानी फणा काढल्या त्या त्या वेळी घेतलेला आक्रमणाचा माझा पवित्रा राधेची दृष्टी पाहून साफ कोलमडे. भूल घालावी तशी तिची करुण दृष्टी माझ्या वासनांचा पार निचरा करून टाकीत असे. असे कां होई हे मला कळत नसे. तिला मी अनेक वेळा तोडली आणि ताडली.

पण शेवटी एकदा विकाराने पेट घेतलाच. मी तिच्याकडे गेलो तेव्हा अंगातले पोलके घट्ट होते म्हणून नुसताच पदर पांघरून त्या पोलक्याचे दोरे सोडवत ती बसली होती. मला आलेला पाहून ती हातातील पोलके तसेच बाजूला ठेवून उभी राहिली. आपला पदर बराच ढळलेला आहे याचे भान तिला राहिले नाही. आणि माझेही भान हरपले. शरीरातील कणनकण तापला. एकसारखा तळमळू लागला. बेचैनी असह्य झाली. मी तिच्या जवळ गेलो. तशी ती घाबरलेल्या मुद्रेने मागे सरली. मला संताप आला. त्या भरात मी म्हटले——

"मला असं राहणं शक्य नाही राधे; या गोष्टीचा एकदा सोक्षमोक्ष झालाच पाहिजे!"

"कसल्या गोष्टीचा?"

"मला तू हवी आहेस राधे; मला तू हवी आहेस. तुझ्यामुळे मी अगदी निकामी होऊ लागलेलो आहे. मला तहान लागते ती तुझी, भूक लागते ती तुझी आणि माझ्या शरीराला ओढ आहे ती तुझीच. माझे गात्रन् गात्र तुझ्या स्पर्शासाठी आतुरलेलं असतं राधे! असंच मला तडफडत ठेवायचं होतं तर इतकी ओढ कां लावलीस? का याबाबतीत तुला माझी गरज नाही राधे?" डोळे विस्फारून गंभीरपणे तिने विचारले.

"कसल्या बाबतीत?"

"संगमाची तुझी भूक भागलेली आहे राधे, किंवा ती भागत असली पाहिजे. मी हा केवळ एक रुचिपालट म्हणून साधन!"

"असं कशावरून म्हणतोस?"

"भावीण तू राधे, तू मला काय दाद देशील?" तिने मान खाली घातली आणि तिच्या डोळ्यातून आसवाच्या झरी वाहू लागल्या. तिची आसवे पाहून माझे तापलेले शरीर, वासना एकदम थंड पडल्या.

"माझ्या गळ्याची शपथ आहे राधे, डोळ्यातून पाणी काढशील तर. चुकलो मी; क्षमा कर मला. पुन्हा मी नाही असं कधी वागणार. वाटल्यास तुझ्या गळ्याची शपथ घेतो!"

मी तिच्या गळ्यावर हात ठेवायला जाणार तोच ती मागे सरली—

"थांब, शपथ घेऊ नकोस. तुझ्या स्वभावाची पूर्ण माहिती झालेली आहे मला. तू शपथ घेऊन मोकळा होशील आणि मला त्रासात टाकशील. तुझ्या मनाची तगमग न कळण्याइतकी मी लहान नाही रे, पण—"

"पण काय राधे, राधे कां थांबलीस उत्तर दे राधे, उत्तर दे!"

"पण... पण शक्य नाही रे, ते शक्य नाही. ज्या गोष्टीची तू इच्छा करतोस ती मी तुला देऊ शकत नाही."

"का? मी नालायक आहे का? का तुला कसला रोग आहे?"

"काय बोलतो हे? कसं बोलवतं तुला हे? दुसऱ्यालाही काही भावना असतात याची जाण तुला अजिबात नाही का? ज्यासाठी मी मन मारीत जगले, ज्या मंगल निष्ठांची आजवर जोपासना केली त्याना तुझ्या असल्या बोलण्यानं विटाळतोस? आततायी मनानं तू आपलं कृत्य करून मोकळा होशील आणि मला मात्र जन्माची जायबंदी करशील. किंबहुना जिवंतपणी मी मढ्यासारखी होईन!"

"मग मला अशा मोहात गुंतवून ठेवायचं काय कारण? हजार वेळा मी तोडलं आणि तितक्याच वेळा तू जोडलंस; कां? माझ्या मनाच्या अशा चिंधड्या करायला? का तुझं मनरंजन होत होतं म्हणून? तुझ्या मंगल निष्ठा कोणत्याही असोत. त्या तू जन्मभर जपत राहा; पण त्यासाठी माझा बळी कां देतेस? माझा असा तळतळाट कां करतेस? सूड उगवायचा आहे का कसला तुला? त्यासाठी माझ्यासारखं भोळं सावज पकडलंस? पण मी तुला तो उगवू देणार नाही राधे. मी तुला अशी घट्ट धरीन; कवटाळीन; तुझं चुंबन घेईन; तुझी सारी इंद्रियं भोगीन...."

बोलता बोलता मी आनावर झालो. माझे मन माझ्या ताब्यात राहिले नाही. मी माझे दोन्ही हात पसरले. आजपर्यंत कधीही न धरलेला तिचा उजवा हात घट्ट धरून तिला खसकन् जवळ ओढली. तिने काहीएक प्रतिकार केला नाही. चैतन्य हरवल्यासारखी ती जवळ आली. मी तिला छातीशी कवटाळून तिच्या हनुवटीखाली नाक घालून जबरदस्तीने तिचा चेहरा वर केला आणि तिच्या ओठावर ओठ ठेवणार तो ती शुद्ध हरपल्यासारखी पांढरी फटक पडलेली दिसली. तिचा देह एकदम इतका हलका झाल की, ती माझ्या कवेतून सुटून धाडकन् जमिनीवर केव्हा कोसळली मला कळले देखील नाही. तिची ती स्थिती पाहून मी घाबरलो. तिचा श्वास जोरजोराने चालू होता.

"राधे, राधे सावध हो, सावध हो राधे...!" माझी तर पांचावर धारण बसली. काय करावे मला सुचेना. टेबलावरचे तांब्यातले पाणी घेऊन मी तिच्या डोक्यावर मारले. डोळ्याना लावले.

"राधे, मी काय करू ? मला काही सुचत नाही ग ! राधे, सावध झालीस का ? माफ कर मला. चुकलो मी; पण सावध हो ग !"

मी ओक्साबोक्सी रडू लागलो. तिने हळू हळू डोळे उघडले. आपल्या क्षीण हाताने कण्हत माझा हात आपल्या हाती घेतला आणि तो आपल्या छातीवर ठेवला. आपल्या दुसऱ्या हाताने ती माझे डोळे पुसू लागली.

"ऊठ राधे; ऊठ ! एकाएकी असं काय झालं तुला ?"

ती उठू लागली. माझ्याकडे करुण दृष्टीने पाहात माझ्या खांद्याचा आधार घेत उठली. खुर्चीवर बसली. थोडा वेळ थांबली.

"ये, असा जवळ बस माझ्या. फार त्रास दिलेत ना तुला मी ? आता सारं सांगते–

सोळावं वर्ष लागलं होतं मला. माझ्या आईची इच्छा होती कुणातरी धनवंताशी संबंध जोडून मी संसार करावा. आसपासच्या पंचक्रोशी-तल्या माझ्या वयाच्या मुलींनी तोच मार्ग पत्करून त्या कमी अधिक प्रमाणात सुखी झाल्या. माझे मामा एक नामांकित सारंगिये होते. सबंध हिंदुस्थानात त्यांचं फार मोठं नाव होतं. सारंगीच नव्हे तर गायन-वादन-नृत्यातही ते प्रवीण होते."

"माझ्यावर त्यांचा फार फार जीव होता. वयाच्या सातव्या वर्षापासून त्यांनी मला गाणं शिकवायला सुरवात केली आणि नाचही शिकवला. मोठमोठे गवय्ये बजवय्ये त्यांना भेटायला येत. थोडे दिवस त्यांचा पाहुणचार घेत. दिवसभर गायन-वादनाच्या गोष्टी रंगत. त्या उस्तादांना ते मला काही तरी शिकवायची विनंती करीत. अनेका-कडून मला माझ्या मामानी संगीत विद्या मिळवून दिली. अशाच एका उस्तादानी शिकवलेला पण नाव न सांगितलेला राग मी तुझी माझी प्रथम भेट झाली त्या दिवशी गायले होते. मला गोव्याबाहेर न्यावे, खूप खूप गायन नर्तन शिकवावे आणि हिंदुस्थानभर फिरवावे, माझे नाव राजेमहाराजांच्या दरबारात गाजवावे अशी मामांची इच्छा होती. आपण कुणीतरी व्हावं असं मलाही वाटे; पण व्यस-नाच्या अति आहारी जाऊन मामानी आत्मनाश केला आणि माझ्या आशा आकांक्षांचा चुराडा झाला. घरची गरिबी. त्यामुळे संसारात पडण्यासंबंधी आईचा एकसारखा लकडा असायचा; पण माझी महत्वाकांक्षा वेगळी होती."

"इतर चारचौघींपेक्षा मी बरीच देखणी होते. आल्यागेल्याचे डोळे माझ्या मुसमुसणाऱ्या तारुण्याकडे खिळायचे. मजभोवती घिरट्या घालणारे अनेक भुंगे होते; पण मला ते तुच्छ वाटत. त्यांच्या-पैकी एकाद्याच्या डोळ्याला डोळा भिडवायचा अवकाश की, सावज माझ्या जाळ्यात येईल असा अभिमान मला वाटत होता. माझ्या तारुण्याचा मला गर्व होता. त्याच्या जोरावर मनात आणीन तो पुरुष माझा दास होईल अशा आत्मविश्वासात मी मग्न होते."

"अशीच एक काळोखी रात्र होती. घराशेजारच्या देवीच्या देव-ळाचा प्राकार साफ करून सायंकाळीच मी घरी परतले होते. रात्रीची जेवणं उरकली. तानपुरा घेऊन काहीतरी रियाज करावा असं मला वाटलं म्हणून मी गवसणी सोडून एकटीच गात बसले. नऊ साडेनवाचा सुमार असेल. ओटचावर काकड्याचा दिवा ठेवून आई पत्रावळी लावीत बसली होती. इतक्यात बाहेर कसली तरी कुजबूज ऐकू आली म्हणून मी तानपुरा बंद करून आडवा ठेवला आणि उठून बाहेर डोकावले. तो एक टापशी बांधलेला, लंगोटी नेस-लेला व ज्याचे पाय चिखलाने बरबटलेले आहेत असा एक इसम आकांतून आईला काहीतरी सांगत असलेला मला दिसला."

"काय आहे ग आई ?"

"आईनं मला उत्तर दिलं नाही. दिवा घेऊन ती बाहेर अंगणात गेली आणि अंगणातील माडाच्या सुक्या चुडिताच्या झावळ्या खसा-खसा तोडून त्याच्या दोन मोठ्या जुड्या बांधून घाईघाईनं त्या माणसाच्या हातात दिल्या. त्यातील एक जुडी दिव्यावर पेटवून तो इसम सुसाट धावत खाडीच्या किनाऱ्याच्या दिशेनं गेला. आई घरात आली आणि मला म्हणाली—

"राधे, देवीला नमस्कार कर आणि झटपट वेणी फणी कर जा. स्वप्नात देखील येणार नाही असं भाग्य दाराशी चालत आलेलं आहे. चल लवकर. ते इथं पोहोचायच्या आधी तयार झालं पाहिजे. मी चुलीत विस्तव पेटवून पुढच्या तयारीला लागते."

"मी नाराज झाले. म्हटले – असं काही मी करणार नाही हं आई! माझी इच्छा नसताना मला एखाद्या गर्तेत लोटायला तू कशी तयार होतेस ग ? अशीच काळोखातून धावत खाडीकडे जाईन आणि जीव देईन बघ ! आई माझ्या तोंडाजवळ दिवा आणीत हलक्या आवा-जात म्हणाली–







अनुक्रमणिका

"बापूसाहेब देसाई येताहेत आपल्याकडे. नसते आढेवेढे घेऊ नकोस. वेडे, देवीच्या कृपेने कामधेनू अशी दाराशी चालत येत आहे तिला अशा मर्खपणानं घालवन देऊ नकोस ! जा लवकर !"

"घरातल्या देवाजवळच्या विझत आलेल्या निरांजनातील वात आईनं प्रज्वलीत केली. तेल घातले आणि मनोभावाने प्रार्थना करून ती पुढच्या तयारीला लागली !"

बापूसाहेब म्हणजे एक प्रचंड व्यक्तिमत्वाचा माणूस. जशी त्यांची श्रीमंती तशीच त्यांची दानत. ज्या गावात जावे त्या गावात त्यांच्या मालकीची बागायत आणि शेती भाती. खुद्द आमच्या गावची अर्धी मालकी त्यांची होती. परमेश्वरानं त्याना आपल्या हजार हातानी दिलं होतं. त्यांच्या चरित्राचे पवाडे लोक गात ते अनेक वेळा कानावर आले होते; पण ते दिसतात कसे, त्यांचं वय काय हे माहितीत नव्हते. श्रीमंती असली म्हणून उगाच एखाद्या वयातीत माणसाला माझं शरीर अर्पण करायची माझी इच्छा नव्हती. मी प्रपंचाने गरीब असले तरी एक कलावंत होते. जेवढी संगीत विद्या मला मिळाली तिने एक प्रकारचा सुप्त अभिमान माझ्या मनात उत्पन्न केला होता."

"येणारं कुणी का असेना आपण नीट नेटकं असावं म्हणून विस्कटलेले केस सोडून मी ते पुन्हा विचरले. थोड्याच वेळात मंडळी दाराशी आली. आईनं कंदिल पेटवून बाहेर ठेवला. माजघराच्या झरोक्यासारख्या खिडकीतून मी ओटयावर डोळे लावले आणि काय सांगू, एक तरणाबांड देखणा पुरुष ओटयावर येऊन उभा राहिला. त्याच्या प्रथमदर्शनीच मी हरवले. माझ्या कल्पनेहून अधिक उजवा असा हा पुरुष माझ्यासाठी माझ्या दारात आला या विचाराने मोहोरून गेले."

आली आली, निवडणूक आली (४)




**मत देण्याऱ्यास आकर्षक भेटी (योजना फक्त निवडणुकीपर्यंत)**

त्यांच्या बरोबरच्या नोकरानी जमीन साफ केली. चटई अंथरली. चिखलाने भरलेले आपले हात पाय त्यानी स्वच्छ धुतले आणि ते चटईवर येऊन बसले. कंदिलाच्या प्रकाशात लालबुंद दिसणाऱ्या त्यांच्या चेहऱ्याकडे पाहात कुंकवाच्या करंड्यातलं कुंकू घेऊन मी टिळा रेखू लागले.

"थोड्या वेळाने त्यानी आपल्या नोकराला हाक मारून विचारलं—

"गोंद्या घर कुणाचं ?"

"वत्सला भावणीचं, मालक !"

"त्यानी एक दीर्घ सुस्कारा सोडला. संकटात सांपडल्यासारखा. आई बाहेर डोकावली. हलक्या आवाजांत तिने विचारले— "जेवण करणार का फराळ ? घरात दूध आहे. केळी पण आहेत भरपूर !"

"गोंद्या, तिला म्हणावं काही म्हटल्या काहीही नको. घराबाहेर पडल्यापासून घरी परतेपर्यंत फक्त पाण्याशिवाय कोणतीच वस्तू घेत नाही आम्ही. केळी असली तर आमच्या या तिघा नोकराना द्या. होडी वल्हवून वल्हवून फार थकलेले आहेत ते !"

"माझं मन उगाचच चरकलं. त्यांच्या शब्दांचा अर्थ शोधू लागलं. आईनं त्यांच्या त्या नोकराना केळी दिली. कॉफी करून दिली. आणि अंथरून झोपायला घरातली गोणपाटंही दिली. ओटयाबाहेरच्या सारवलेल्या अंगणात झोपायची बाबासाहेबानी त्याना आज्ञा केली. दिवसभर काबाडकष्ट करणाऱ्या त्या नोकरानी पडत्या फळाची आज्ञा घेऊन गोणपाटं अंथरून जमिनीला पाठी लावल्यादेखील."

"बापूसाहेब मांडी घालून सचिंत बसले होते. डोळे मिटून कसलं तरी चिंतन करीत होते. काळी रात्र चढत होती, तशी माझी धडधड सारखी वाढत होती. नोकर डाराडूर झोपले असल्याचा कानोसा घेऊन आई आत आली. पुन्हा बाहेर गेली. आत येण्याबद्दल बापूसाहेबाना तिने खूण केली. मन अधिरतेने बेलगाम होऊ पाहात होते. मी त्याला सारखी आवर घालायचा प्रयत्न करीत होते. जे स्वप्नी इच्छिलं होतं ते दारात चालत आलं होतं. माझ्यासारखी भाग्यवती मीच होते. माझं स्वप्न साकार होऊन मजपुढे उभं होतं. एक दोन क्षणाचाच काय तो अवधी होता."

"झोपायला जाता ना ? राधा तुमची वाट बघते आहे ?"

"कोण राधा ?" गंभीर आवाजात त्यानी विचारलं.

"ही, माझी मुलगी. शेस घातली आहे तिला; पण मनाजोगता योग्य पुरुष मिळाला नाही म्हणून ती तशीच राहिली होती. तुम्ही आलात; भाग्य उदेलं आमचं. या क्षणापासून ती तुमची झाली. तुम्ही तिचा स्वीकार करा !"

ते काही बोलले नाही. मी वळून त्यांच्याकडे पाहिलं. त्यांच्या दृष्टीचा कटाक्ष माझ्या दृष्टीत मिसळला. पण त्यात कोणतीच भावना नव्हती. त्यानी मान खाली घातली. झटकन् ते वळले आणि बाहेर जाऊन पुन्हा चटईवर बसले. त्यांच्या मागोमाग आई बाहेर गेली. त्यांची आर्जवं करीत म्हणाली—

"मी शपथपूर्वक सांगते; माझ्या मुलीला अजून कुणाचा हात लागलेला नाही. तिला गाणं शिकून मोठं व्हायचं होतं.








बाहेर जायचं होतं नाव मिळवायचं होतं. तिचा मामा सगळं करणार होता; पण माझ्या दुर्दैवानं तो गेला आणि आम्ही उघड्यावर पडलो. देवीच्या कृपेनं आम्ही अन्नवस्त्राला मोताद झालो नाही. देवळा-तील मिळकतीवर आमचं सगळं भागतं. तुम्ही मनात किंतू आणू नका, तिचा अव्हेर करू नका. आजपर्यंत ती अगदी पवित्र राहिलेली आहे!"

"वत्सलाबाई, तुमचा काही तरी गैरसमज झालेला आहे. मी तुमच्या घरात कोणत्याही मतलबाने आलेलो नाही. प्रसंग असा घडला की, माझी सगळी कामं आटोपेपर्यंत ज्या गावात मी गेलो होतो तिथं सायंकाळ झाली. खाडीच्या पाण्याला भरती होती. त्यामुळे तीन साडेतीन तासात आम्ही परत घरी पोहोचू अशी माझी आणि माझ्या नोकरांची कल्पना होती. त्यानी होडी पाण्यात लोटली आणि उणापुरा एक तास लोटला नाही तोच ओहोटी सुरू झाली. पाण्याच्या उलटचा प्रवाहात कितीही वल्हवलं तरी होडी पुढं जाईना. तब्बल साडेतीन तास झाले. वल्हवून वल्हवून नोकरांचे हात दमले; पण दोन मैलांचं अंतर देखील कापलं गेलं नाही."

"काळोखी रात्र. न जाणो एखादा अपघात व्हायचा आणि आम्ही कुठंतरी अडकन पडायचे. त्यातून या खाडीत मगरीही खूप आहेत. म्हणून आसऱ्यासाठी आम्ही किनाऱ्याला वस्ती पाहू लागलो. होडी खाडीच्या या फाटचात घुसविली आणि चटकन् तुमच्या घरातला दिवा दिसला. रात्रीपुरता निवाऱ्याला राहावं आणि उजाडताच निघून जाव म्हणन मागचा पुढचा विचार न करता इथं आलो. वत्सलाबाई, चुकूनही माझ्याकडून असलं कृत्य घडणार नाही. मी कोण आहे हे तुम्हाला आमच्या गोंद्याकडून कळलंच असावं. माफ करा मला. तुमचा गैरसमज झाला. तुमचा काही एक अन्याय नाही त्यात."

सून्न होऊन मी दाराचा आसरा घेऊन उभी होते. त्यांच्या प्रत्येक शब्दाबरोबर साऱ्या शरीराची विकलता वाढत होती. आई पुढं बोलू लागली —

"पण तुमचे पाय या घराला लागले, एक रात्रभर तुम्ही इथं होता हे पट्कर्णी झाल्याशिवाय राहाणार नाही. या गावाची अर्धी अधिक मालकी तुमची. येथील रहिवाशाना उद्या हे कळलं तर ते कोणता समज करून घेतील ? आणि तुम्ही इथं येऊन गेलात हे कळल्यानंतर दुसऱ्या कुणाची छाती होणार आहे इथं पाऊल टाकायची ? या एका अपवादामुळे माझ्या मुलीला जन्मभर तुम्ही दुःखात ठेवून जाता आहात. तुमच्या नावानं तिनं आज कुंकू लावलेलं आहे. शृंगार केला आहे. त्याचा अव्हेर करू नका !"

ते थोडा वेळ गंभीर झाले. त्यानी कसला तरी निश्चय केला आणि म्हणाले—

"वत्सलाबाई, तुमचं म्हणणं बरोबर आहे. जे घडलं ते अकल्पित-पण घडलं. त्याला इलाज नाही. आता अधिक बोलू नका. जास्त बोलायची मलाही सवय नाही; पण तुम्ही निश्चित असा. तुमच्या मुलीनं माझ्या नावानं कुंकू लावलेलं आहे. माझ्यासाठी पहिला शृंगार











केलेला आहे. ठीक आहे; पण मी व्रती आहे. मी तिचा स्वीकार करू शकत नाही. माझ्या वाडवडिलानी ज्या काही कुलाचाराच्या मर्यादा घातलेल्या आहेत त्या उल्लंघन करणं मला कोणत्याच रीतीनं शक्य होणार नाही; पण मी तिला उघड्यावर टाकणार नाही. उद्या सकाळी मी काय तो निर्णय देतो. आता रात्र बरीच झालेली आहे. तुम्ही जाऊन झोपा आता. मलाही स्वस्थपणे विचार करू दे !"

रात्रभर ते बसून होते. मी आणि आईनं देखील ती रात्र जागून काढली. झुंजमुंजू झालं तशी त्यानी नोकराला हाक मारून त्याला उठवलं. त्याच्याशी कुजबुजून त्याला कुठंतरी पाठवून दिलं. तास दीड तास लोटला नाही तोच गावचा पाटील आणि गावची सात आठ प्रतिष्ठित माणसे धावत आमच्या घराकडे येताना दिसली. ती मंडळी बापूसाहेबांजवळ येऊन नम्रपणे उभी राहिली. बापूसाहेबानी त्याना आग्रहानं बसवलं. घडलेली सारी हकिकत त्याना संयपणे हंसत हंसत सांगितली. आणि त्यातील एखाद्याने निर्णयाचं काही बोलायच्या आधीच ते झटकन् म्हणाले—

"मंडळी आता या वत्सलाबाईच्या मुलीची मला काहीतरी व्यवस्था केलीच पाहिजे. योगायोगाने असो, प्रसंग पडला म्हणन असो किवा कोणत्याही कारणाने असो मी एक रात्र इथं या वत्सलेच्या घरी राहिलो ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी सत्य आहे. माझ्या हातून चूक घडली किवा घडली नाही याला महत्त्व नाही. महत्त्व आहे ते माझ्या इथल्या एका रात्रीच्या मुक्कामाला. तिच्या मुलीने माझ्या नावानं कुंकू लावलं, माझ्यासाठी शृंगार केला आणि म्हणूनच जन्मभर तिला ददात पडू नये, दुसऱ्याच्या तोंडाकडे तिला कधीच पाहावं लागू नये अशी तिची तरतूद मी करून ठेवणार आहे. वर्षभर पुरून उरेल एवढं पीक देणाऱ्या दोन शेत जमिनी आणि वर्षभर खर्चाला पुरेल एवढं उत्पन्न देणाऱ्या माझ्या येथील दोन बागायती मी तिच्या नावे दानपत्र करून जात आहे. साक्षी म्हणून तुम्ही आहात. कायदेशीररीत्या हे दानपत्र तुमच्याकडे पाठवून देतो.

हे काय घडतंय मला कळेना. आधी घडलेल्या प्रसंगाने आणि आलोचन जागरणाने मी एखाद्या अचेतन गोळ्यासारखी झाले होते. काळीज घट्ट करून एकदा डोळे भरून मी त्याना पाहिले. त्यानीहि मला पाहिले; पण त्यांच्या दृष्टीत फक्त दया होती.




ते आमच्या घरातून बाहेर पडले. देवळात जाऊन त्यानी नमस्कार केला आणि झपाझप किनाऱ्याकडे निघाले. सगळे लोक त्याना किनाऱ्यापर्यंत पोहोचवायला गेले. मी लपत छपत एका माडाआड राहून ते त्यांच्या होडीत बसेपर्यंत त्याना पहात होते. खाडीच्या फाटयातून होडी मोठ्या खाडीत शिरली आणि काही वेळाने दिसेनाशी झाली. होडी दिसत होती तोपर्यंत मी ती डोळ्यात साठवली. ते गेले. माझं जन्माचं कल्याण करून गेले. माझ्यावर उपकाराचं ओझं ठेवून गेले. त्या बदल्यात त्यानी काही घेतलं नाही. अशा एका असामान्य माणसाच्या नावानं मी ते माझे पती म्हणून त्या रात्री कुंकू लावलं. त्यांची पत्नी म्हणून साज शृंगार केला. पण व्यर्थ. माझ्या एका कटाक्षानं कोणताही पुरुष घायाळ होईल, माझा दास होईल ही माझी अहंता होती. त्या अहंतेची ज्योत पार विझली. मनाच्या गाभाऱ्यातली सारी फुले मलूल झाली. एक प्रकारची विरक्ती आली मला. ते मला जिंकून गेले होते.

तीस बत्तीस वर्षापूर्वीचा—देवाधर्मावर श्रद्धा ठेवून दिवस कंठण्याचा तो काळ. आजच्यासारखी त्याकाळी माणसे अतिसावध नव्हती. खूप खूप भाबडी होती. ते परत यावे, त्यानी माझा स्वीकार करावा म्हणून अनेक व्रतं वैकल्यं करीत राहिले मी. शिवलीलेतील सिमंतिनीने सोळा सोमवारांचं कडक व्रत केलं आणि तिचा बुडालेला पती तिला परत मिळाला, तसाच माझाही पती जसा त्या रात्री होडीतून आला तसाच पुन्हा येईल म्हणून सोळाच काय पण त्यानंतरच्या आयुष्यात अनेक सोळाची आवर्तने केली मी. सोमवारी सायंकाळी खाडीच्या किनाऱ्यावर जाऊन एखादी चालती होडी पाहून उपास सोडायची मला कुणीतरी सूचना केली. आणि तेव्हापासून अव्याहतपणे त्यात खंड पडला नाही; पण ते कधीच परत आले नाहीत. त्या रात्रीचा तो क्षण ताजा टवटवीत आहे. तो कधीच कोमेजला नाही. त्या क्षणाला मी आजवर जपत आले आहे.

त्या दिवशी तू जलशाला आलास. तुला मी त्या दिवशी प्रथमच पाहिले. तुझ्यात आणि त्यांच्यात विलक्षण साम्य दिसले मला. त्या रात्रीसारखेच मन पुन्हा हुरहुरले. टवटवले. चारचौघात गाणं कधीच सोडलं होतं मी. तुला पाहिलं आणि गावंसं वाटू लागलं. आग्रहही झाला आणि गायले. तुझं माझं बोलणं होईल, आपण इतक्या जवळ येऊ, तू माझ्या प्रेमात पडशील, मला एखाद्या तरुण मुलीसारखी बागडायला लावशील याची त्यावेळी कल्पनादेखील नव्हती. मी तुझ्यापेक्षा वयाने कितीतरी मोठी. तू बुद्धीने मोठा; पण अकल्पितपणे तू जवळ आलास आणि आज हा प्रसंग आणलास.

ज्या क्षणाला जपण्याकरिता आजपर्यंत अट्टाहास केला त्याचा इतिहास तुला सांगितला. आता तुला हवं ते तू करू शकतोस. कोणताही निर्णय घेऊ शकतोस. एकच कर, ते एकदम गेले तसा मात्र जाऊ नकोस. तुझ्यात आणि त्यांच्यात विलक्षण साम्य दिसलं म्हणून मी त्या साम्यावर प्रेम केलं. पण तू म्हणजे ते नव्हे हे मी जाणते !"

एकदम आहे त्याहून लहान व्हावे आणि राधेच्या कुशीत शिरून तिच्याकडून थोपटून घ्यावे असे मला त्या क्षणी वाटले. फार फार वाटले; पण मी तसे करू शकलो नाही. तिच्या चेहऱ्याकडे, तिच्या कारुण्यमय नजरेकडे मी एकटक बघतच राहिलो. ●●●

[पृष्ठ ८९ वरून — हास्य परमीट]

कायद्याला तीन महिने झाल्यावर त्यानी नभोवाणीवर भाषण करताना सांगितले, "पहिल्या दोन महिन्यापेक्षा तिसऱ्या महिन्यात या कायद्याच्या भंगाची अधिक प्रकरणे झाली हे खरे असले, तरी ही पोलिसांच्या वाढत्या कार्यक्षमतेचीच खूण आहे."

विनोद-मंत्र्यानी जरी असा जोर धरला, तरी खुद्द मंत्रिमंडळातच पुढे पुढे त्याना विरोध होऊ लागला. सध्याच्या परिस्थितीत हसणे आणि आनंदी राहणे आपल्याला दिवसेंदिवस किती कठिण होत आहे, हे काही मंत्र्यानी मंत्रिमंडळाच्या बैठकीत निदर्शनास आणले. त्यापैकी काही जणाना तर पुढील निवडणुकीत पक्षाचे तिकीटहि मिळण्याची शक्यता नव्हती. मग त्यानी कसे बरे हसावे? जनतेचा रोष, वृत्तपत्राची टीका, कायदेभंगाची वाढती प्रकरणे यानी स्वत: विनोद मंत्रीहि जेरीला आले होते. तरीहि अपयश पत्करण्यापेक्षा त्यानी एक मार्ग सुचवला. ते म्हणाले, "मला वाटतं की, यातून मार्ग काढण्यासाठी परमिट देण्याची पद्धति चालू करावी. आरोग्याच्या कारणासाठी मद्यपानाचा परवाना दिला जातो, त्याप्रमाणे ज्याना आरोग्याच्या कारणासाठी हसणे शक्य नसेल, अशा लोकाना सरकारने बुधवार–शनिवारी न हसण्याचे परमिट द्यावे. पोलिस त्याला पकडू लागले, तर त्याने परवाना दाखवावा म्हणजे झालं."

पण या सूचनेला पाठिंबा मिळाला नाही. कारण परवाना पद्धतीत सरकारी नोकर आणि आमदार खासदार याना परवाना देणे सरकारला कठिण असते. आणि खरी अडचण तर त्याचीच होती. सत्तारूढ पक्षाच्या बहुतेक आमदाराना हसण्याची कला माहीत नव्हती. एक आमदार तर जन्मात एकदाच हसल्याचे लोकानी पाहिले होते. तो प्रसंग म्हणजे त्यांच्या मुलाला दारू विक्रीचे दुकान काढण्याची परवानगी मिळाली, तेव्हाचा होता. हा कायदा मागे घेणे हेच शहाणपणाचे आहे, असे एका ज्येष्ठ मंत्र्यानी सांगितले. ते म्हणाले, "आता निवडणुका जवळ आल्या आहेत. अशा परिस्थितीत जनतेला अप्रिय असे काहीहि करणे शहाणपणाचं ठरणार नाही. इतकंच नव्हे, तर ज्या मंत्र्यानी हा कायदा जनतेवर लादला त्याना येत्या निवडणुकीत भवितव्य नाही."

हे ऐकल्यावर मात्र विनोद–मंत्र्यांचे धाबे दणाणले. निवडणुकीत पराभव पत्करण्यापेक्षा हा कायदाच रद्द करावा असे त्यानी ठरवले. पण मंत्रिमंडळाचा हा निर्णय काही महिने गुप्त ठेवण्याचा सर्वानी बेत आखला. या कायद्याला विरोध करणाऱ्यांची शिष्ट मंडळे मंत्र्याना भेटली. मंत्र्यानी त्यांचे म्हणणे शांतपणेच नव्हे तर हसत हसत ऐकून घेतले. 'जनतेच्या मागण्यांचा सरकार नेहमीच सहानुभूतिपूर्वक विचार करील' असे आश्वासन या शिष्टमंडळाला देण्यात आले. इतकेच नव्हे, तर या कायद्याची फार कडक अंमलबजावणी करू नये, अशा गुप्त सूचनाहि सरकारी इन्स्पेक्टर्स आणि पोलिस याना देण्यात आल्या.

विनोद खात्याचा कायदा रद्द होणार ही बातमी सरकारने 'अत्यंत 'गुप्त' ठेवल्याने साहजिकच ती सर्वत्र पसरली. त्यामुळे विरोधी पक्षांची फारच पंचाईत झाली. येत्या निवडणुकीत या जनता–विरोधी कायद्याचे आपल्याला भांडवल करता येईल ही त्यांची कल्पना खोटी ठरली. जनतेला खूष करण्याचा सरकारचा डाव हाणून पाडण्यासाठी विरोधी पक्षानी आता हा कायदा चालू ठेवावा असा छुपा प्रचार सुरू केला. पण अखेर एका शुभ दिवशी मुख्यमंत्र्यानी हा कायदा रद्द होणार असल्याची घोषणा विधिमंडळात केलीच. ते म्हणाले, "जनतेच्या भावनांची आम्हाला कदर आहे. जनतेला हसायचे नसेल, तर तेहि स्वातंत्र्य तिला दिले पाहिजे. हे कल्याणकारी राज्य आहे म्हणून न हसण्यात जनतेचे कल्याण आहे हे सरकारने ओळखले आहे. सर्व परिस्थितीचा विचार करून सरकारने विनोद खात्याचे बुधवार-शनिवारी हसण्याचे आणि आनंदी राहण्याचे कायदे रद्द केले आहेत. या खात्यातील नोकर वर्ग आता दारूबंदी खात्यात मुरविण्यात येईल."

कल्याणकारी राज्य किती सोयीचे असते. कायदा करण्यात येतो तो लोकांच्या हितासाठी आणि तो रद्द करण्यात येतो, तोहि लोकांच्या हितासाठीच. पण विनोदी खात्याचे विसर्जन झाले, तरी त्याचे कवित्व संपले नाही. कारण सरकारला इतक्या गोंधळात पाडणाऱ्या या कायद्याचा उगम कोठे आहे याची सरकारने गुप्त चौकशी सुरू केली. सेक्रेटरीनी डेप्युटि सेक्रेटरीना आणि त्यानी असिस्टंट सेक्रेटरीना जाब विचारला. असिस्टंटनी सुपरिंटेंडंट खांबेटेना धारेवर धरले आणि खांबेटेंनी मुदाम पुरोहितला फयलावर घेतले. ते म्हणाले, "तुमच्यावर पूर्ण विश्वास टाकून मी त्या कागदावर सही केली. अहो, सरकार कधी बापजन्मी हसले आहे काय? विनोद काय, हसा काय, लठ व्हा काय! सारा पोरकटपणा. मिस्टर सुदाम पुरोहित, तुमच्या विरुद्ध मला डिसिप्लिनरी अॅक्शन घेतलीच पाहिजे." पण याच वेळी त्याना सरकारी नोकर संघटनेचे ब्रह्मांड आठवले आणि ते मऊ आवाजात म्हणाले, "या पुढे तुमच्याकडून येणारा प्रत्येक कागद वाचून मगच मी त्यावर सही करीन, हीच तुम्हाला शिक्षा."

प्राणावर बेतलेले कागदावर निभावले या भावनेने सुदाम पुरोहित आपल्या जागेवर परतला आणि मनसोक्त हसला–तो दिवस बुधवार किंवा शनिवार नसतानाहि हसला! ●●●



**मानिनीला अचानक आणि अवेळी मिठीत घेतल्यावर ती आपल्या करानी प्रियकरास दूर लोटत असते. कृतक कोपाने भृकुटी नाचवीत 'सोड मला सोड' म्हणत असते. अशावेळी आवेगाने तिचा अधरपल्लव चावून ज्याने तिचे चुंबन घेता घेता तिच्या मुखातून सुखाचा सीत्कार काढविला आणि तिचे नेत्र तृप्तीने तरल केले त्यानेच अमृताचा आस्वाद घेतला. अमृतासाठी सागर-मंथन करणारे देव मूर्ख होत.**

(अमरुशतक ३२)











**अंदमानातली ही माणसे. रानात उपजलेली, नारळीच्या बनात सुखाने हासणारी. तिथली आद्यवासी. त्यांचे मार्ग सरळसोट. शहरवासियांची वाकडी वळणे त्याना माहित नाही. त्यांच्या जीवनविहाराचे हे सचे सुरस वर्णन कल्पिताहूनही अद्‌भुत नाही असे कोण म्हणेल?**

काही दिवसापूर्वी नवेजालीची सहचारिणी त्याला कायमची सोडून गेली. तो खिन्न झाला होता. उघडयावर एकटा बसला होता. वारे वाहत होते. त्याच्या अंगावरून जात होते. तो कष्टी होता तरी अविचल होता. वारे वाहत होते. महाकवि कालिदासाच्या मेघदूतीतील यक्षासारखे त्याला जाणवत असावे कीं, गर्जन वृक्षाच्या चिकामुळे सुगंधित झालेले आणि कोमल पुष्पांच्या आणि पानांच्या झुपक्यातून घुसून मार्ग काढत अनंताकडून येणारे ते पवनाचे पाईक, त्याच्या स्वर्गस्थ सहचारिणीच्या पावन स्पर्शाने पूनीत झालेले असल्याने त्यांचा अंगाला होणारा स्पर्श, त्याचे मन विकल असले तरी, जणु त्याला आलिंगत होते. नवेजालीची बैठक तशीच होती. गंभीर होता तो...

—पण आज नवेजालीची कळा एकंदर बदलत होती. स्वारी खुलत असल्याचे दिसत होते... मंडळी टोकोई बुइया म्हणजे सामुहिक सभागृहात जमली होती. त्यात नाचूगीची विधवा वहीण होती. ती मौन होती. गंभीर होती.

**—माधव राजवाडे**

—त्यांच्यापैकी ओकेजीच्या मनात एकदम सणक उठल्यासारखे झाले व तो तडकाफडकी उठला. कांजू आणि छोटे इत्यादि वयस्क मंडळीशी ओकेजी सल्लामसलत करू लागला. 'द्या टाळी' असा भाव त्याच्या चेहऱ्यावर दिसला. कशाकरता बोलणे होते? काय झाले? नाचूगीची मान होकारार्थी हलली.

काहीतरी ठरले. निश्चित झालेले दिसले. साऱ्यानी त्या रात्री पुन्हा 'गंजन दांगे' गृहात जमायचे ठरले. अंधारल्यावर ७–३० वाजता मंडळी जमली. सगळी मंडळी आपआपल्या आसनावर विराजमान झाली. नाचूगीची वहीण मात्र अंथरुणावर एका कोपऱ्यात बसली होती. कुणीतरी नवेजालीस काहीतरी सांगितले, खुणेने व आपल्या बोलीत. धुम्रपान चालले होते. धूर पसरला होता. त्या धुरातहि माणसांचे चेहरे उजळल्यासारखे वाटले. डुकराचे मास उकडत होते. त्याचा उग्र दर्प वातावरणाला संसर्गून होता......

नवेजाली क्षणभर स्तब्ध झाला. मुग्धहि वाटला. लाजल्यासारखाहि दिसला. स्त्री-पुरुष मिस्किलपणे स्मित करून होते. कोटया करत होते व कोपरखळ्या मारत होते. वातावरण हास्याने खुलत होते. पुन्हा कुणीतरी नवेजालीच्या कानात गुणगुणले. खुणावले. नवेजाली उठला आणि नाचूगीच्या कोपऱ्यात बसलेल्या वहिणीकड गेला. वास्तविक येणुकेराके (नाचूगीची वहीण) जवळ एक वयस्क स्त्री बसली होती. परन्तु त्याची तमा न बाळगता नवेजालीने येणुकेराकेचे मनगट पकडून खेचले. येणुकेराके उठली आणि नवेजालीच्या मागोमाग त्याच्या शय्येकडे गेली. सगळे पाहत होते. खूश होते. मधल्या खांबाला विळखा देऊन उभ्या असलेल्या तिच्या लहानग्या मुलाने विचारले 'आई, तू ह्या माणसावरोबर त्याच्या राहूटीत जाऊन राहणार तेव्हा मी तुझ्या भावाकडेच राहावे काय?' येणुकेराके काहीच बोलली नाही. ती सलज्जा झाली होती. शरमेनं वाकून नवेजालीच्या शय्येजवळ उभी होती. त्याच्यावर बसली नाही. पण एका मिनिटाच्या आतच ती नवेजालीला खेटून 'सांग कसे बसलो?' दिसले! विरादरीचे उपस्थितीत हातात हात धरून नवेजालीने जणु लग्न कंकणच येणुकेराकचे हाती बांधले!

नवेजाली अंथरुणावरून उठला. दुसऱ्या अंथरुणाकडे गेला. त्यावर उभे राहून छतातून एक पात्र त्याने काढले. ते त्याने येणुकेराकेला दिले व पुन्हा तिच्या शेजारी बसला. तिच्या खांद्यावर त्याचा हात स्वामित्व स्वाभिमानाने स्थिरावला.

डुकराचे मास तयार होते. नवेजालीने त्यातील काही तुकडे आणले व येणुकेराकेच्या हातात दिले. त्या दोघानी खावयास सुरुवात केली. उपस्थित मंडळीनीहि तेच केले....

हे होते लग्न. मनगट पकडून स्त्रीला आणले. मनगटाच्या जोरावर जो बंध निर्माण झाला तो दोघापैकी कुणीतरी निखळेपर्यंत टिकणारा होता. टिकायचा होता. नवेजाली–येणुकेराके आता पतिपत्नी झाली होती.

—हे लग्न होते छोटे अंदमान बेटातील एका आदिवासीचे. या आदिवासी गणाचे नाव ओंगी....

## सुखाने हासले नारळीत

आदिवासी म्हणजे त्या त्या प्रदेशातले मूळ रहिवासी. बऱ्याच ठिकाणी मूळच्या स्वरूपात राहणारे आणि हिंडणारे लोक. काही ठिकाणी त्यांची राहणी, रिती आणि संस्कृति स्वयंभु आणि स्वतंत्र तर काही ठिकाणी सर्वस्वी निसर्गपूत व निसर्गशरण जीवन हीच त्यांची संस्कृति. महाराष्ट्रात चांदा, कुलावा इ. इ. जिह्यात जे आदिवासी आहेत त्यांच्या जीवनावर निसर्गावलंबी आयुष्यक्रमाचा ठसा स्पष्टपणे उमटलेला आहे. परन्तु त्यांच्यावर मानवी सुधारणेचे परिणामहि अपरोक्षपणे झालेले आहेत. अंदमान येथील आदिवासींची कहाणी निराळी आहे. आगळी आहे. म्हणजे मूळ मानव प्रयमतः ज्या अवस्थेत रांहत असावा तीच तर ही नव्हे ना असे अंदमानच्या आदिवासींच्याकडे पाहून वाटावे. जेव्हा केव्हा अंदमान येथील आदिवासीचे चित्रण आणि वर्णन करावयास गेलो; तेव्हा ऐकणाऱ्याच्याहि प्रतिक्रियाहि वेगळ्या दिसल्या. अंदमान येथील आदिवासीचे वर्णन ऐकून तर माझे मित्र श्री. दा. गो. देशपांडे यांना एक शीघ्रकाव्य सुचले ते तसेच येथे देतो:—

**समुद्राच्या पोटात अंदमान वसले**
**अंदमानच्या उरावर रान उठले**
**रानात मानव उपजले**
**सुखाने हासले नारळीत**
**नाव त्यांचे आदिवासी**

— हे आदिवासीचे वर्णन अगदी यथार्थ आहे.

## अस्ताकडे कललेला—

अंदमान बेटातील आदिवासींची कहाणीमात्र एक प्रकारची आणि एकसूरी नाही. इ. स. १९०१ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टात या आदिवासींच्या एकंदर बारा जाती आहेत असे म्हटले आहे. या बारा जातींची सर्वसाधारण वैशिष्टये म्हणजे: त्यांच्या झोपडीचे आकार, तीर आणि कामठा, होडी, अलंकार, स्त्रियाचे वस्त्राभरण, केशभूषा आणि बोली. या वैशिष्टयाना अनुसरून त्यांचे तीन

सहकुटुंब ओंगीचे स्वागत–सन्मान

विभाग जे पाडता येतात ते येणेप्रमाणे: उत्तर विभागाचा पाच आदिवासी जातींचा 'येरे वा' गट, दक्षिण विभागाचा पांच आदिवासी जातींचा 'वोजि गंगिजी' गट आणि वाहेरचा ओंगी-जाखा यांचा न गोंदवून घेणारा गट. या पैकी पहिले दोन गट हे आपले अस्तित्व टिकवू शकलेले नाहीत. सध्या फक्त ओंगी-जाखा हाच गट ह्यात आहे. त्यांचीहि संख्या दिवसेंदिवस कमी होत चाललेली आहे. खाली दिलेल्या आकडेवारीवरून यांच्या घटीची कल्पना करावयास हरकत नाही.

| वर्ष | आदिवासी जमातीचे नाव | संख्या | वर्ष |
|---|---|---|---|
| १९०१ | मोठ्या अंदमानातील | ६२५→२३ | १९५१ |
| | आदिवासी जारवा आणि | | |
| | सेंटि नेली ज | ५८५→५० | |
| | ओंगी | ६७२→१५० | |

सुधारलेल्या जगाशी संपर्क हे त्यांच्या वांषिक ऱ्हासाचे कारण म्हणता येईल. या जातीना जीवनकलहात निसर्गशरणतेखेरीज अन्य अंग नसल्याने वाढ नाही. सुधारलेल्या जगाशी यांचा संबंध आला कीं, ही कमी होण्याच्या मार्गाला लागलीच. बदल आणि सुधारणा यांच्याशी समवस्थापन करण्याची समर्थता व चातुर्य यांचा अभाव त्यांच्या अस्ताला पूरक ठरत गेला. एकीकडे जंगलात राहणारी, माणसाशी वैर ठेवणारी तर दुसरीकडे कोणताहि शिजलेला किंवा साखरयुक्त पदार्थ खावयास दिला तर अतिसाराने मरणाच्या पंथास





अनुक्रमणिका




## गाढवासहित ब्रह्मचर्य गेले






# आसुडाने 'राजकारण' नागवे केले



लागणारी ही माणसे टिकवणे कर्म कठीण. जगली—वांचली तेवढीच राहिली असे मानणेच आवश्यक होते. म्हणूनच सरकारी सूचना होती की, या आदिवासीना शिजवलेले खाद्यपदार्थ द्यायचे नाहीत. मध, नारळ हेच, त्यांच्या आगत-स्वागताचे, पाहुणचाराचे पदार्थ निश्चित केले होते.

जारवा हा दक्षिण अंदमान, सेंटिनल बेटे आणि मध्य अंदमानातल्या काही तुटलेल्या भागातली आदिवासी मंडळी तर ओंगी रटलॅन्ड व छोटे अन्दमान ह्या बेटातील. वास्तविक 'मंडळी' असं ओंगीनाच म्हणणे संयुक्तिक व समर्पक ठरेल. कारण जारवा ही जात माणसाळली जाऊ शकली नाही. ती अद्यापहि आक्रमक, माणूसघाणी आणि अलग राहिली. अजिंक्य आणि अस्पर्श आहे. परन्तु ओंगीना मात्र माणसाळवण्यात यश आले. याचे श्रेय पोर्ट ब्लेअरचे एकोणीसाव्या शतकातले सुपरिटेन्डेट श्री. एम्. व्ही. पोर्टमन याना दिले पाहिजे. यामुळेच ओंगीच्याबद्दल काही बोलता-लिहिता येते. कारण संपर्कातून परिचय उद्भवतो व परिचयातूनच ओळख होते व पटते. आणि ओंगी आहेतहि अनोखे आणि ओळख राहण्यासारखे.

नवेजालीचा साथी गेला--आस सोडू नको दोस्त बोलला

## ओंगी निराळा अन् त्याचा गोतावळा

ओंगी उघडे-नागडे असतात. नुसते त्यांच्या चेहऱ्याचे कुणी फोटो आणून दिल्यास त्यातला कोण पुरुष आणि कोण बाई हे ओळखता येणार नाही. परन्तु स्त्री-पुरुष भेद आहे. ओंगीत पतिपत्नी आणि आई-बाप व मित्र अशी नाती आहेत. फक्त त्यांची रीत न्यारी आहे.

मुख्यतः छोटया अंदमानातल्या दाट राईत राहणारा ओंगी ज्या पद्धतीने हजारो वर्षापूर्वी त्याचे पूर्वज राहिले तसा आजहि राहत आहे. पाऊसापासून वाचण्याकरता स्वतःच्या आसऱ्यास्तव त्याने मेहनतीने आपली झोपडी बांधलेली असली तरी प्रावान्याने तो भटक्या जीव आहे. शिकार, मध, फळे, कंदमुळीही प्राप्त करण्याकरता वनवन हिंडून तो जगला व तात्पुरत्या निवाऱ्याकरता बांधलेल्या 'कोरेल' मधे परतण्याचेच पसंत करतो. त्याचे भक्षण—अन्न म्हणजे नारळ, डुक्कर, मध, मासे, सुरण, केवडयाचे फळ, कंदमुळे.

मिलन झाले. रंगवावयास बसले--शृंगार

पण अन्नप्राप्तीच्या बाबतीत कामाची विभागणी लिंग-भेदाला अनुसरून करण्यात निसर्ग-भेदाशी संवाद साधला आहे. ओंगी ज्ञातीतल्या पुरुषाना मच्छिमारी किंवा कंदमुळे खोदून काढणे 'नोहे पुरुषाचे' काम वाटते. पुरुष कोण ? जो शिकार करतो, मध गोळा करतो तो. जो आव्हान देणाऱ्या डुकराला मारून आणतो. गगनचुंबी वृक्षावर चढून चपलाईने फळ तोडतो आणि समुद्रातल्या उग्र अवतार धारण करणाऱ्या मत्स्याना मारतो तो. ओंगींच्या अशा आयुष्यक्रमाचा अनुगम करणे जितके चित्तथरारक तेवढेच रोमांचकारी ठरणारे आहे.

हे ओंगी, माणूस म्हणून कसे जगतात आणि एकमेकाना जगवतात ? किंबहुना त्यांच्यात एकमेकाना जगवण्याचे सूत्र असेल तरच त्यांची स्वतःची अशी संस्कृति असणार. ओंगीत असे निर्लेप सूत्र आहे खरे. म्हणजे ओंगीचे जीवन सरळ आणि रांगडे, उघडे आणि नागडे असूनहि त्यात एक प्रकारची अश्रापता आहे. ही अश्रापता 'एक दैवी शक्ति' आपले जीवन बद्ध व नियंत्रित करून आहे या भावनेनी जोपासलेली आहे.

## भक्ष आणि लक्ष्य

—कोणत्याहि वृक्षावर मधाचा पोळ दिसला की ओंगी उगी नाही राहायचा. कारण मध हे त्याचे आवडते खाद्य. मधावर तो लुब्ध होणार. मध त्याला लोभवणार हे ठरलेलेच. ओंगीचा मधु संपादनाचा आणि मधु संचयाचा उद्योग पाहण्यासारखा आहे. 'टोनयोगे' नावाची पाने प्रथम तो गोळा करेल. ती पाने चावेल, चघळेल आणि पानांचा रस आपल्या शरीराला लावेल, फासेल. आणखीन् पाने तोंडात घालेल आणि त्यांचा रस तोंडात ठेवून तसाच ज्या झाडावर 'पोळ' गावले त्याच्यावर कमरेला चाकूवजा 'डाह' व पाठीवर लाकडाची बादली घेऊन चढेल. पोळाजवळ पोहोचल्यावरोबर त्यावर तो तोंडातला रस थुंकेल. रस थुंकण्याचा अवकाश की, त्या डसणाऱ्या मोठमोठ्या मधमाशा उडू लागतात. पण त्या झाडावरच्या ओंगीच्या शरीराला नाही चावत. जवळहि जात नाहीत. म्हणजे त्या पानांचा रस हे मध-

माशापासूनचे संरक्षण, त्याना पळवणारे आणि ओंगीचा मार्ग विनधोक करणारे – असं झाल्यावर ओंगी आपल्या चाकूने (डाह) पोळ कापेल आणि पाठीवर असलेल्या लाकडी वादलीत ठेवील.

मधाचा मोह कुणाला आवरत नाही? त्याला ओंगी कसा अपवाद असेल ? ओंगी मधु भक्षण केल्यावर त्याच्यातला काही भाग लाकडाच्या वादलीत ठेवून देतात, मुलाकरता अन् इतर काही नसेल तेव्हा उपयोग व्हावा म्हणून. हल्ली शासनद्वारा ओंगीना भेटीदाखल याकरता ॲल्युमिनियमच्या देकच्या आणि वादल्या दिल्या जातात.

ओंगीच्या उदरंभरणाचा दुसरा प्रकार म्हणजे डुकराचे मास. ओंगी डुकराची शिकार तीराने व कुत्र्याच्या सहाय्याने करेल. भला मोठा मारलेला डुक्कर संध्यासमयी आपल्या पाठीवर वाहून आणेल. झोपडीत परतल्यावरोबर मधल्या खांबाजवळील अग्यारी पेटवेल. शिकार करून आणलेला डुक्कर त्यावर ठेवील. चांगला शेक बसल्यावर काढेल आणि त्याचे तुकडे करेल. एक पात्रात ते तुकडे ठेवील. त्यात पाणी घालेल आणि डुकराचे ते मास पुन्हा शिजवायला अग्नीवर ठेवील. हे मास चांगले उकडल्यावर भुकेजलेली कुटुंबातली मंडळी एक एक तुकडा उचलतील व त्यावर तुटून पडतील. चरबी मात्र साठवून ठेवतील मुलाकरता आणि जेव्हा काही खायला नसेल अशा दिवसाकरता.

— असा खाण्याचा परिपाठ असला तरी ओंगीच्या बायका मासे नसले कीं, कावतात. मासे हे त्यांचे फार प्यार खाद्य. मासे पकडायचे म्हणजे मच्छिमारीकरिता वेळ साधून मोक्याच्या पाण्याच्या जागी होडीतून जावे लागते. एकदा ओकेगली नावाचा ओंगी तसाच परतला व त्याने ओढावयास विडी मागितली. त्याची बायको ओरडू लागली. त्याने दुर्लक्ष केले तरी तिचे ओरडणे थांबले नाही. तिच्या ओरडण्याने त्याचा पुरुषी अहंकार दुखावला. परिणामस्वरूप तो दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे मच्छिमारीस गेला, आणि दुपारपर्यंत पाटीभर विविध मासे घेऊन आला. ते मासे त्याच्या बायकोने भाजले आणि साऱ्यानी पाणाळलेल्या जिभानी त्यांच्यावर ताव मारला.

ओंगी स्त्रिया कंदमुळे कशा गोळा करतात हे लक्षिण्यासारखे आहे. गिगी नावाच्या वेलीची मुळे ओंगी खातात. एक काठी आणि कुदळ. या आयुधांच्या साहाय्याने त्या जमीन खोदत जातात. जेव्हा हे लाभत नाही तेव्हा चेनाडालू नावाच्या मुळी शोधतात. गोळा करतात. फळे गोळा करणेहि श्रमविभागणीच्या तत्त्वावर चाललेले असते. झाडावर चढलेला ओंगी एका काठीने फळे पाडतो आणि खाली उभ्या असलेल्या त्यांच्या बायका त्या एकत्र करतात आणि पाटीत घालतात. 'बुलूंदांगे' नावाचे एक आंबूस फळ या फळापैकीच खावयास बरे लागते. ओंगी ते चवीने खातात. जी फळे कच्ची असतात ती भाजतात व नंतर सेवतात. त्यांच्या बिया काढून ठेवतात. पावसाळयात जेव्हा बाहेर जाता येत नाही तेव्हा या बिया त्या उकळतात व खातात.

ओंगी खेकडे चवीने खातात. त्याना नारळीची शेतीहि करता येते. पण ही नारळीची शेती, त्यांच्या वयक्तिक मालकीची नसते. 'टोकोई बुईया'ची असते. टोकोई बुईया हे त्यांच्या वयक्तिक व सामाजिक जीवनाच्या सामुदायिक नियंत्रणाचं व शासनाचं माध्यम.



उस डोंगा, रस नोहे डोंगा–ओंगी वात्सल्य

**जगण्याचा रंग**

—ओंगीच्या लग्नाच्या पद्धतीचा उल्लेख या लेखाच्या सुरुवातीला केला आहेच. त्यांच्या लग्नाच्या एका रंगदार वैशिष्ठ्याचा उल्लेख केला पाहिजे. लग्नोत्तर ओंगी बायका आपल्या पतीचे शरीर रंगवतात. डुकराच्या चरबीत लाल वनस्पति मिसळून हा रंग तयार होतो. हे शरीर रंगवणे अजमासे अर्ध्यातासात पूर्ण होते. शरीर रंगवण्यात ओंगी गृहिणीचे कौशल्य प्रकट होते. तिने ज्या नावीन्यपूर्ण नमुन्याने आपल्या यजमानाना रंगवले त्यावरून तिची कलात्मकता व योग्यता सिद्ध होते.

एकदा रंगले कीं, मग नाचणे हा ओंगीच्या विवाहाच्या विधीतला महत्त्वाचा कार्यक्रम असतो. वधु आपला नृत्यवेश धारण करते आणि इतर नाचणाऱ्यांचे नेतृत्व करते. स्त्रिया वर्तुळाकार कदमखोल उभ्या राहतात. एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवून साखळी करतात आणि नृत्य करू लागतात. एक पाऊल पुढे ठेवतात, जमिनीवर दोनदा आघात करतात आणि डावीकडे वळतात आणि अशा प्रकाराने नृत्याला गति येते....

दिवसामागून दिवस जातात. ही गति चालू असते. आणि मग कुणीतरी जातो. कायमचा गेलेला असतो. हे दैवीशक्तीचे 'येणे' गंभीरतेने ओंगी मान्य करतो. ओंगी मृताला दहन करत नाहीत. दफन करतात. जिथे माणूस मृत झाला तिथेच त्याचे थडगे करतात. सर्व माणसे आपल्या मस्तकाला लाल रंग लावतात अशा प्रसंगी, पुढे श्राद्ध करावयाच्या वेळेस अंगास रंगवतात. त्यांच्या श्राद्धात दैवी शक्तीना आवाहन असते त्यांच्या अल्प समजुतीप्रमाणे. यावेळेसहि त्यांचे नृत्य असत. नृत्य झाल्यावर एकमेकाना आलिंगने देतात आणि अश्रू ढाळतात. शोक व्यक्त करतात. पंचमहाभूतात विलीन होणारा जीव 'त्या शक्तीच्या' आधीन झाला अशा समाधानांत सारं आटोपतं. क्षणकाल वळण बदललेलं जीवन पुन्हा पूर्वपदावर येतं, मृत्यूहि जणु जीवनाचा एक क्रम आहे अशा बेतानं. जे तुटलं ते सांधलं जातं. नवा सोबती नवा आधार अगदी सरळधोट मार्गानं पण औचित्य न सोडता मिळवण्यात येतो... पुन्हा कुणीतरी कुणालातरी रंगवत असतो, जीवनाला रूप देत असतो. जीवनाचा रंग टिकवत असतो. हा रंगच त्याना जन्म–मृत्यूच्या अतीत नेत असतो... ओंगीचा असा जीवनौघ चालू आहे..... संस्कृतीच्या सीमेजवळ असूनहि त्याची अस्मिता होती तशीच आहे.

• • •







अनुक्रमणिका

# केंद्रक

-विजया राजाध्यक्ष

**चक्र फिरते. त्या फिरणाऱ्या चक्राबरोबर मुखवटे फिरतात. वेग वाढू लागतो. काही वेळाने त्या मुखवट्यांचा स्वतंत्र आकार नाहीसा होतो....ते एकमेकात मिसळतात.....चक्र फिरतच असते........**



श्रीधर आठवलेचे डोके भणभणत होते; कपाळाच्या शिरा ताठल्यासारख्या झाल्या होत्या. मनात असंख्य विचारांची गिचमीड झाली होती. त्यापैकी एखादा विचार या गुंत्यातून बाहेर पडावा, त्यावर आपले मन केंद्रित करावे असे त्याला वाटत होते. पण विचार सैरावैरा, कारखान्यातील चाकांसारखा घणघण आवाज करीत धावत होते. बाहेरील झाडांची अर्थहीन सळसळ त्याच्या कानावर येत होती. खिडकीतून दिसणारा आभाळाचा तुकडा भकास, आ वासल्यासारखा वाटत होता. एक प्रचंड पोकळी. अवतीभवती कोणी नाही. एकटा श्रीधर आठवले. एकटा. भोवती पोकळीचा वेढा. . .

. . .अभिमन्यूची गोष्ट माहीत आहे ना? गर्भावस्थेत असतानाच त्याने कृष्ण व सुभद्रा यांच्यातील संभाषण ऐकले. ते मनात घोळवत तो आत्मविश्वासाने चक्रव्यूहात शिरला. शूर, पराक्रमी अभिमन्यू. पण चक्रव्यूहातून बाहेर पडता आले नाही बेट्याला. हाः हाः हाः!

—हाः हाः हाः!—मनाच्या कोलाहलात आणखी एका आवाजाची भर.

"जगावे की मरावे. . . . ."—हाच आपल्या मनातील विचारांच्या फौजेचा सेनापती असावा—श्रीधरने अंदाज बांधला. आणि पुन्हा त्याला खलनायकासारखे हसू आले. हाः हाः हाः ! जगावे की मरावे. . . .हॅम्लेटचे संथ, दमदार स्वगत. त्याला का जगायचे हे ठाऊक होते आणि का मरायचे हेही ठाऊक होते. . .

अनुक्रमणिका

श्रीधर आठवले का जगतो?

आईवडिलांसाठी. . .छे:!

बायकोसाठी. . .छे:!

मुलाबाळांसाठी. . .छे:!

समाजासाठी वगैरे. . . . .छे:!

स्वत:साठी?

—त्रिवार अशक्य !

श्रीधर आठवलेला मरावेसे का वाटते?

. . .परीक्षा लेखी नाही; तोंडी आहे. चटचट, थोडक्यात उत्तरे द्या.

"काय साले दिवस चालले आहेत...एकही दिवस असा उजाडत नाही की, ज्या दिवशी मनाला कसली काळजी नाही. . ."

"एवढा नेकीने वागणारा मी. माझ्या गुणाचं काय चीज केलं या जगानं?"

"अवतीभवती कसली माणसे ही? याच माणसांवरोवर आयुष्य घालवायचं आम्ही? आम्हाला Choice नाही कसलाच?"

"स्वत:साठी मरायचे—"

वा! हा माणूस स्वत:चा जीव वचावण्यासाठी प्राणपणाने लढला आणि लढता लढताच त्याने घारातीर्थी आपला देह ठेवला.

श्रीधर आठवले. एका भव्य प्रयोजनासाठी मेलेला हुतात्मा.

. . .जग ही एक माया आहे बरं. शंकराचार्यांनी म्हटलंच आहे—"ब्रह्म व सत्यं जगन्मिथ्या. . ." तेव्हा जेहत्ते कालाचे ठायी. . .

हुतात्मा. . .

जग ही एक माया . . .

मनातील गिचमीड वाढतच चालली होती. काही सुचत नव्हते. श्रीधरने एक सिगारेट पेटवली. धुरांची वळणे पाहता पाहता मन जरा थाऱ्यावर आले.

—दु:खे: भूतकाळातील, वर्तमान काळातील आणि भविष्य-काळातील. आजची दु:खे: एक चिंतन. . .

१ घरात अतिशय उकडते. पंखा नाही.

२ मुले एकसारखी त्रास देतात. त्यातल्या त्यात लहान मुलगी. ती झालीच नसती तर?

३ रविवारी सकाळी भाजी आणायला जावे लागते; नको ती माणसे भेटायला येतात.

४ नातेवाइकांची ये जा एकसारखी

५ तो साठे पोरींवर काय इंप्रेशन मारतो बेटा!

—केवळ स्वत:ला इंग्रजी चांगले बोलता येते या जोरावर.

६ डिसूझा हा नालायक माणूस आहे. त्याची सगळी बिंगे मला ठाऊक आहेत. असे असून साहेबाची मर्जी त्याच्यावर!

७ सुगंधा राजवाडकर बायकोची मैत्रीण. दिसायला बरी. पण खोटी आहे ती बाई! तिचे हसणे, बोलणे, चांगले वागणे—सगळे खोटे! आपल्याशी उगाचच तोऱ्यात वागते. 'उडत गेली!'

—छे! हेच तर जमत नाही आपल्याला. का?

८ तो नाटककार मुधाळकर. खरे म्हणजे आपला शाळेतला दोस्त. पण आता ओळखसुद्धा दाखवत नाही बेटा.

—असे पुष्कळ. सगळेच कसे आठवले? पाठ थोडेच करून ठेवले आहे? . . .त्रास होतो, फार त्रास होतो. धड जेवण जात नाही. रात्री झोप येत नाही. डिसूझा. . .मुधाळकर. . .साठे, सुगंधा राजवाडकर. . .या माणसांचा आणि आपला संबंध काय वास्तविक? त्रास होतो तर तोडून टाकावेत संबंध. हजारो माणसे पडली आहेत जगात. याच माणसांवाचून अडणार आहे थोडेच? . . .हे जमत नाही. धि:कार असो माझ्या या दुबळेपणाचा!

सैरभैर मन. एखाद्या निर्जन बेटासारखे ओसाड, भयाण. सहन होत नाही. परमेश्वरा का अंत पाहतो आहेस असा?—कधी सोडवणार आहेस यातून?

परमेश्वर. त्याची कृपादृष्टि असली तर सगळे काही ठीक होईल...

मी आणि परमेश्वर: परस्परातील संबंधाचे थोडक्यात वर्णन करा. काही प्रमुख बदलांचा परामर्श घ्या.

"मुलानो, संध्याकाळी हातपाय धुऊन देवाला नमस्कार करावा बरं का. देवाला म्हणावं, सद्बुद्धी दे. "शुभं करोति......"

"शिऱ्या, खोटं बोललास ना?—आता देव पाप देईल तुला..!"

"श्रीधर, आज मॅट्रिकची परीक्षा ना? मारुतीला जाऊन ये. म्हणावं, पास झालो तर स्वत: नारळ फोडीन तुझ्यापुढे!"

"श्रीधर?—देवळात गेला होतास का रे?—बावळटच आहेस लेका."

परमेश्वर वगैरे सब झूट. लहान मुलांनी आणि म्हाताऱ्या माणसांनी खेळवावी ही कल्पना.

परमेश्वर आहे कशावरून?

—नाही नाही तरी कशावरून?

—बी. ए.ची परीक्षा तोंडावर आली असतानाच टॉयफॉइड झाला. सबंध पेपर तयार करायचा राहून गेला. . .आता कसे होणार? वर्ष वाया जाणार की काय? . . .साडेसाती बरं हो. ऐन वेळी कोणते संकट उभे राहील याचा काही नेम नाही. 'शनि-माहात्म्य' वाचायला सांगा त्याला. आणि रिझल्ट लागल्यावर एक सत्यनारायण करा.

श्रीधरने सोवळे नेसून सत्यनारायणाची पूजा केली. "तुझ्याच कृपेने परीक्षा चांगल्या तऱ्हेनं पास झालो, देवा!"

—दर शनिवारी 'शनिमहात्म्या'चे वाचन. शनिवार इतर दिवसांपेक्षा चांगला जातो बरं का!

—उपास करा. . .म्हणजे आणखी पुण्य!

उपासाचा पहिला दिवस. गोष्टी कशा मनासारख्या घडून येत आहेत!

"मारुतीराया, आज सुमन साने माझ्याच बसमध्ये असू दे. नारळ देईन तुला."









# मराठी बाणा

तूं कामरूप कामिणा, विलासी मैना
सुचविसी रेशमी चैंना
कितिकांची करिसि ग दैना
झेपेल तुला ग कसा मराठी बाणा.
उमलला ज्वानिचा बाग छान छौकीचा
तटबंदि पहारा छुपा चोर चौकीचा
कटिबंध छमकवी माज नथ्या नौतीचा
लचकता नूर, झुकवीत ऊर नोकीचा
वसनांत झुरझुरे चूर चंद्रलोकीचा
तूं शुक्राची चांदणी, हृदय कोंदणीं सुरंगी गहना
मुखचंद्र तुझा बिंबवी नभाचा ग ऐना ।।
झेपेल तुला ग कसा मराठी बाणा ।।१।।

नागीण केवडा जसा जर्द घुंदीचा
उरलपेटीत हो खेळ नजरबंदीचा
सारुनी दूर चंदेरी पदर रुंदीचा
ते गेंद टपोरे घेति लाभ संधीचा
चुकवीत चोर कंचुकी टोचती पैंना
घे जीव सहज पकडीत, नजर भिडवीत
पंख उडवीत शिकारी नैंना
झेपेल तुला ग कसा मराठी बाणा ।।२।।

सौंदर्यसाज चढविते लाज माजोरी
ओठांत रंगला विडा पान गंगेरी
पापणी कडा कातरती काजल कोरी
भिवयांचा चढवी ताण दिसेना दोरी
हा मदनमस्त ग करी उमर झक झोरी
कां होतिस गोरीमोरी ग मृगछोरी
रतनार, छलक लोचनीं, पलककेसरी, झेलसी रैंना
शेजेवर झुलत्या राती चुरला दवणा
झेपेल तुला ग कसा मराठी बाणा ।।३।।

— राजा वढे



. . .आज इंटरव्हयू. नोकरी मिळाली तर रुपाया ठेवीन तुझ्यापुढे....

"हे काय दत्ताच्या देवळात कशाला शिरतो आहेस?"

"अरे, परवा छोकरीचा ताप चढला. उतरल्यावर हार घालीन म्हटलं होतं."

"हॅं:! भलताच Superstitious होत चालला आहेस तू!"

—अखेर प्रमोशन डिसूझाला मिळाले. इतक्या नेमाने शनि-माहात्म्य वाचून, उपासतापास करून काय उपयोग झाला? आजपासून सर्व बंद. जगात परमेश्वर नाही! जगात परमेश्वर नाही! परमेश्वर या कल्पनेविरुद्ध बंड!

. . .तरीहि आज शनिमाहात्म्य वाचलेच पाहिजे. —निदान शनिस्तोत्र. "माहात्म्य" फार मोठे आहे.....

—जरा तरी बरे वाटले मनाला!

—सगळेच अर्थहीन : देवावर विश्वास ठेवणेहि आणि देवाला आव्हान देणेही. मन:शांतीसाठी दुसरा एखादा मार्ग नाही का?

बालपणी घातलेली सुभाषितांची सुबक, सुवाच्य वही :

दु:खांवर विजय मिळवा.

जगात स्पर्धा ही असणारच. आपल्या प्रतिस्पर्ध्यावर मात मिळविण्यातच खरा पुरुषार्थ आहे.

यथा काष्ठंच काष्ठंच. . . .इत्यादि काही माणसे आपल्या-पासून दूर गेली तरी त्याला काय इलाज? या विश्वाचा तो न्यायच आहे. . .

If wishes were horses, beggars would ride them.

वहीच्या थडग्यात पुरलेली वाक्ये. मधून मधून त्यांच्या स्मृतीला वंदन करायचे, एवढेच.

तुमचे जीवनविषयक तत्त्वज्ञान काय?

—काही नाही!

—डिसूझा टी-क्लबचा सेक्रेटरी म्हणून उभा राहातो आहे. त्याला 'नको राहू' थोडेच म्हणणार?—शेवटी युक्ती सुचली. आपणच त्याचे नाव सुचवायचे. मग तेवढा त्रास होत नाही......

आपल्या नवऱ्याच्या प्रेयसीशी पुष्कळ बायकांची दाट मैत्री असते ती एवढ्यासाठीच का?

बायको म्हणते बहीण विश्रांतीसाठी येणार कटकट होती. पण येणारच ती.

मग पत्र लिहायचे: तू अवश्य ये. आम्हा दोघानाही फार बरे वाटेल इत्यादि......

किती चांगला माझा भाऊ राया!

—खोटे, खोटे सगळे.

एक होती बाई. ती एकदा क्रॉफर्ड मार्केटला गेली. तिने खूप खरेदी केली. रात्र पडू लागली. ती परत निघता निघता तिला एक मुलगा भेटला. त्याच्या हातात कसले तरी पुडके होते. तो म्हणाला, "बाई, इकडे या." त्याने तिला अंधारात नेले. हळूच

म्हणाला, "साड्या आहेत. किमती साड्या." त्याने हळूच हातातील प्लॅस्टिकच्या पिशवीत गुंडाळलेल्या साड्या दाखवल्या किती छान, मोहक, रेशमी, मऊ,..."चार साड्या फक्त तीस रुपयात! बाईने सौदा केला व त्या साड्या घेऊन ती घरी आली.

—दुसरा दिवस उजाडला. ऊन पडले. तिने प्लॅस्टिकच्या पिशवीतून त्या साड्या बाहेर काढल्या. आणि पाहाते तो काय!—तिला धक्काच बसला. साड्या होत्या जुन्या विटक्या, फाटक्या.....

प्लॅस्टिकच्या पिशवीचा जयजयकार असो!

प्लॅस्टिकच्या पिशवीतील सुगंधा राजवाडकर...किती चार्मिंग! कोणी तिच्या घरी गेले की त्यांच्या देखत नवऱ्यावर प्रेम करते, मुलांवर माया करते. तिला ना, सगळ्या कलांमध्ये Interest आहे...... a very sweet, nice person!

—प्लॅस्टिकच्या पिशवीतील प्रा. आडारकर अफाट वाचलेले आहे माणसाने. नेहमी ताजी पुस्तके हातात असतात. नाटकाला किंवा गाण्याच्या बैठकीला येताना सुद्धा हातात पुस्तक—अर्थात् इंग्रजी. लेखक असतो कोणीतरी माहीत नसलेल्या नावाचा. कोणी विचारले तर आश्चर्याने डोळे विस्फारून म्हणतो, "अरे, हा लेखक वाचलेला नाही तुम्ही!"

प्लॅस्टिकच्या पिशवीतील घायगुडे... वा! काय दिलखुलास हसतो! मोठा प्रसन्न, उमदा माणूस!

प्लॅस्टिकच्या पिशवीतील सुहासिनी—दर अर्ध्या तासाने गालावर पावडर आणि ओठावर लिपस्टिक फिरवणारी...

—आणि प्लॅस्टिकच्या पिशवीतील श्रीधर आठवले. परवा साहेब रस्त्यावर भेटला. मनात म्हटले, "साला हा कुठं कडमडला इथं!" पण हसलो. गोड हसलो. नमस्कार केला. अदबीने नमस्कार केला. बोललो मृदु आवाजात बोललो....आणि तो दृष्टिआड झाल्यावर म्हटले, "साला!"

जगाच्या प्रवेशद्वारावर ठळक अक्षरात लिहिलेली मोठी पाटी आहे. "या पिशव्यांना कोणी हात लावू नये. त्यांची नासधूस करू नये."

'ताजमहाल'मध्ये चव्हाणांच्या मुलाचे Wedding reception. बायको म्हणते, "अय्या, ताजमध्ये!"—आणि आपली सर्वात किंमती साडी नेसते. श्रीधर आठवले वुलन सूट चढवतो.

सजून आलेली माणसे...

या या या ...

हे मिस्टर अँड मिसेस....

एकच काजू नाजुकपणे तोंडात टाकायचा.

साठे दांपत्य. त्यांच्याशी तेच अनेकदा केलेले संभाषण.

तुमच्या मुलांना नाही आणलेत!

सुधाताई नाही आल्या?

—एकदा या ना आमच्या घरी!

बे एके बे, बे दुणे चार.....

चुकलास गाढवा! पुन्हा म्हण.

वर्षातून निदान पाचसहा लग्ने. नव्या कपड्यांना त्यानिमित्ताने इस्त्री. सुंदर रंगीबेरंगी शब्दांची उजळणी...प्लॅस्टिकची पिशवी मात्र घरी विसरता कामा नये. मग पाढा चुकण्याचा संभवच नको!

मुजुमदारांच्या घरी जेवण. आणखी कोण कोण येतील बरं?—अंदाज चुकत नाही. तीच क्रोकरी, तेच शब्द, तीच माणसे...बे एके बे—

गाण्याची बैठक....पुढच्या रांगेत माना डोलावणाऱ्या त्याच व्यक्ति, नेहमी उशीरा येणारा फडके...आपल्याला गाण्यातही Interest आहे असे भासविण्यासाठी आलेली नौ. दाते....

पुन्हा तेच संवाद. बे दुणे चार——

एखादे व्याख्यान. कोणत्याहि व्याख्यानाला नेरुरकर असणारच. आणि तो लाडही. तो भेटणार या कल्पनेनेच मनावर ताण पडायला सुरुवात होते. तो दिसणार, आपल्याकडे दुर्लक्ष करणार. आपण उगाचच त्याच्याशी बोलण्यासाठी धडपडणार...आणि घरी आल्यावर त्रास!—त्रिक सहा.

माणसांचा चक्रव्यूह.

श्रीधर आठवलेचे मस्तक पुन्हा भणभणू लागले. हा सगळा गुंता उकलायचा कसा? हे ओझे कशानेच कमी होणार नाही.












श्रीधरने दु:खाची यादी पुन्हा एकदा पाहिली.

"घरात पंखा नाही. . .अतिशय उकडते.

—एवढे एकच दु:ख अध्यात्मिक!

बाकी सगळी लौकिक! माणसांमुळे निर्माण झालेली!

—या चकव्यूहाचा परीघ केवढा मोठा आहे! आपली बेंबी हे त्या परीघाचे केंद्र.

ती पहा, चक्रव्यूहात उभे राहण्यासाठी माणसे जमू लागली...

ही माझी सोवळ्याओवळ्यापायी एकसारखी कटकटणारी आई. हा माझा म्हातारा बाप. ही माझी लठ्ठ झालेली, भांडणारी बायको. ही छळणारी पोरे. हे बंधुराज—कधीहि टपकतील आणि घरात महिनाभर ठाण मांडतील! हा पेंडसे–लहानपणापासूनचा दोस्त. पण मध्यंतरी बिनसले आमचे. तरीही भेटी होतातच. असा वैताग येतो. ही सुगंधा राजवाडकर. मुळीच आवडत नाही. तोंडही पाहू नये. साली गोड आवाजात, खोटे खोटे हसत उगाचच टोचून बोलत असते. पण बायकोची मैत्रिण पडली ना! हा साने–याला भेटावेसे वाटते. माणूस विद्वान आहे. माझ्याविषयी जिव्हाळा आहे त्याला. पण तो भेटल्यावर Depression येते. न्यूनगंड निर्माण होतो. हा सबनीस: मोठा ऑफिसर आहे. थोड्याशा ओळखीच्या जोरावर संबंध वाढवायचा प्रयत्न केला. पण जमले नाही ते! संबंध अस्वाभाविकपणे वाढत नाही हेच खरे! ही सौ. दातार. एकसारखी स्वत:विषयी बोलत असते. तरीहि आपण हिच्याशी संबंध का ठेवला आहे हेच कळत नाही! हे मोरे, चव्हाण, लाड, काळे—यांच्यात असताना मी एकदम उंचीवर चढतो. स्वत: कोणीतरी असल्यासारखे वाटते; अस्खलितपणे बोलता येते. . .कारण कुठेतरी वाटते, या माणसांची लायकी आपल्यापेक्षा कमी आहे. आणि ही मेलेली माणसे—तीही या चक्रव्यूहात अदृश्यपणे उभी आहेत. यात एक तीन महिन्यांचा गर्भ आहे—पडून गेलेला! हा माझा मुलगा असणार होता !

मी मध्यभागी आहे.
मला हा चक्रव्यूह फोडायचा आहे
कसा?
मला येथे कोणी आणले?
—बाहेर कसे पडायचे हे न सांगताच?

जखमा होत आहेत. रक्त वाहते आहे. शक्तिपात होतो आहे. चक्र फिरते. त्या फिरणाऱ्या चक्रावरोबर मुखवटे फिरतात. वेग वाढू लागतो. काही वेळाने त्या मुखवट्यांचा स्वतंत्र आकार नाहीसा होतो. . .ते एकमेकात मिसळतात. . .चक्र फिरतच असते. भोवळ येत. . .भोवळ. . .

अर्थशून्य जीवन. मोहांचे बन. स्वप्नांचे शुभ्र जाळे. महत्त्वाकांक्षांच्या असंख्य वाटा. दूर टोकाशी लुकलुकणारे धीरोदात्त दिवे. हे सगळे कोठे जाऊन भिडते?—कोठे सरते? हे सरते त्या बिंदूपाशी काय आहे? एखादी नसतेपणाची दरी? या मोहांच्या बनात माणसांची फुले फुलली आहेत. भरून गेले आहे बन. या बनात शिशिर कधी येईल? फुले कधी गळतील? हा शिशिर पहायला मी उरेन का? ही रम्य नगरी—काळाच्या अजस्र विवरात ती स्वत:ला कधी झोकून देणार आहे? . . .चक्र फिरत आणि त्या भोवंडणाऱ्या वेगात हे प्रश्न सामोरे येतात.

— आणि श्रीधर आठवले सुन्नपणे उभा असतो.

• • •











बेडेकर उत्पादनें म्हणजे
आपल्या घरांतील एक
अत्यावश्यक बाब होऊन
बसली आहे. उत्कृष्ठ दर्जा
अवीट गोडी आणि
विश्वासपात्र कृती यामुळें
तीं आपणा सर्वांचीच
आवडतीं झालीं आहेत.
बेडेकर मसालेवाले
मुगभाट, मुंबई ४. पेरुगेट, पुणें.
आपल्या घरीं
हीं हवींतच
बेडेकर
मसाला
सुपारी
बेडेकर
पापड
बेडेकर
पापड
बेडेकर
मसाला
Bedekar's
MANGO
PICKLE
B. VASANT 1566




**जुन्या परंपरेतली सरळ भाषेत सांगितलेली हृद्य अशी ही ऐतिहासिक देशी प्रेमकथा. 'पृथ्वीराज-संयोगिता,' 'बाजीराव-मस्तानी,' 'बिल्हण–शशिलेखा,' 'जगन्नाथ पंडित-लवंगिका' तशीच 'बाजबहादूर-रूपमती'. नव्या दुनियेला अद्भुत वाटावी पण त्रिवार सत्य... !**

—अरविंद ताटके



नर्मदेचं पाणी झुळझुळ वाहत होतं. दिवस थंडीचे होते पण उन्हं वरती येत असल्यामुळं हवा उबदार होती. किनाऱ्यावर राजकन्या रूपमती केस मोकळे सोडून बसली होती. तिच्या गळ्यातून निघणाऱ्या गोड सूरांमुळं दिशा उजळून निघत होत्या. तिच्या दासी स्नानाची तयारी करण्यात दंग होत्या अन् मेणा उचलणारे भोई बऱ्याच दूर अंतरावर चिलीम फुंकीत बसले होते.

रूपमती नावाप्रमाणंच रूपवान होती, लावण्यवती होती. स्त्रिया अंग धुवून आल्यावरच जास्त सुरेख दिसतात, नजरेत भरतात. पण रूपमतीचं रूप न्यारं होतं, आगळं होतं, वेगळं होतं. तिची कांति इतकी सतेज अन् टवटवीत होती की, ती केव्हाही न्हाल्यागत भासे. तिचे डोळे काळेशार अन् वर्ण गोरापान होता. अंगकाठी उफाड्याची, उंची भरपूर अन् तिचे सारे अवयव अगदी रेखल्यागत होते. पण देवानं तिला नुसतं रूपच दिलं नव्हतं. गोड गळा अन् काव्य करण्याची प्रतिभाहि तिला होती. तिचा आवाज इतका गोड पण धारदार होता की, तिच्या आलापीनं वातावरण अगदी धुंद बने. काव्य रचायचं, ते कंठगत करून मग गळ्यातून मूलायम सूर काढण्याचा तिचा रिवाज होता. पाण्या[illegible] तिच्या कल्पनाशक्तीला पंख फुटत. [illegible] आवाजाला गति मिळे, [illegible]

सकाळीच रुपमतीनं पाण्यात डुंबण्याची तयारी चालविली होती. शरीर झाकण्याइतकीच वस्त्रं तिनं पेहेरली होती. कोणी पहात नाही याची तिनं चाहूल घेतली; अन् मग तिने शरीर पाण्यात झोकून दिलं. ती पाण्यात पोहू लागली, डुंबू लागली. तिचा गोरापान देह पाण्यात लकलकत होता अन् तिच्या दासी ते विलोभनीय दृष्य कौतुकानं पहात होत्या. पहाता पहाता ती वरीच दूर गेली अन् मग एक किंकाळी ऐकू लागली... रूपमतीची दमछाक झाली होती, ती घावरीघुबरी झाली होती. दासी घाव-रल्या. काय करावं ते त्याना सुचेना अन् भोई तर फार दूर होते. तेवढ्यात एका गोटीवंद जवानानं धाडकन् पाण्यात उडी टाकली. पाणी कापीत तो सपासप पुढं गेला अन् आपल्या बळकट वाहूंचा आधार त्यानं रूपमतीला दिला. हळु हळु तो तिला किनाऱ्यावर घेऊन येऊ लागला.

रूपमती भानावर आली तेव्हा समोर उघड्या अंगाचा पिळदार अन् गोरा धूप जवान शेजारी उभा असलेला पाहून ती गोंधळली, वावरली, शरमिंदी झाली. लागलीच तिनं कपडे चढविले. तेव्हा तरुणानं म्हटलं––

"अव् तो तवियव ठीक है ना ?"

"हां !" ओढणीच्या आतून रुपमतीनं जवाव दिला.

"पोहता नाही येत तर उतरावं कशाला पाण्यात ?"

त्याच्या या प्रश्नानं रूपमती लाजेनं लालवुंद झाली.

मेंदीनं रंगलेल्या तिच्या हातापायाच्या तळव्यांकडे तो तरुण अनिमिष नेत्रानी पहात होता. तिच्या पोसलेल्या देहाची त्याच्यावर इतकी भुरळ पडली होती की, तिथून त्याचा पाय निघत नव्हता.

"आपलं नांव नाही समजलं ?"

"वाजवहादुर म्हणतात मला. मांडवगडचा नवाव मी. आपलं नाव ?"

"रूपमती"

"ठाकूर की छोकरी ?"

"हां !"

"वहोत खूप ! नावाप्रमाणंच रूपवान आहेस."

"सुंदराना सगळीच सुंदर दिसतात."

"तसं म्हण ! पुन्हा भेट ?"

"मतलव ?"

"मोहव्वत चाहतो."

"मोहव्वत ! अन् यवनाशी ?"

"प्रेमाला जातपात नसते रूपमती."

"एवढ्यात आपलं प्रेम वसलं वरं !"

"नाही रूपमती. तुझ्या लावण्याचा अन् गानमाधुर्याचा लौकिक आजवर ऐकत आलो. मलाहि गाण्याचा पौक आहे. ख्याल गायकीत मी निपुण आहे. मी शिकारीला निघालो असताना झाडाखाली विसावलो होतो. तुझ्या आवाजानं मला इथं ओढीत आणलं. तुझ्या सूरावरुन तू रूपमतीच हे मी ओळखलं. तुझ्या आलापीनं मी सारं विसरलो. झाडाआडून तुझं मधुर गाणं ऐकत होतं. नि रूप टिपत होतं. तेव्हांच ठरविलं की, वस् ! तुझ्याशीच शादी करायची. तेवढ्यात पुढचा प्रसंग गुदरला. करशील ना माझ्याशी शादी ?

ओढणीच्या झरोक्यातून रूपमती वाजवहादुरचं रूप अन् यौवन न्याहाळीत होती. त्याच्या गाननिपुणतेची कीर्ती तिनं ऐकलेलीच होती. उणा पुरा उंच असलेल्या गोऱ्या घवघवीत वाजवर ती मनातनं भाळली होती. त्याच्या छोट्याश्या दाढीनं त्याच्या चेहऱ्याला विशेष शोभा आली होती. रूपमतीच्या हृदयाला तडा गेला होता. जीव वांचविणाऱ्या वाजवर तिचा जीव गेला होता. ती त्याला चाहत होती.

तेवढ्यात भोयानी पुढे ठेवलेल्या मेण्यात रूपमती शिरत होती अन् वाजवहादुर घोड्यावर स्वार होऊन तिच्या उत्तराची वाट पहात होता.

"शादी जरूर होईल आपली पण एक शर्त आहे."

"कसलीहि शर्त पुरी करण्याचं सामर्थ्य माझ्या वाहूत आहे रूप ! ऐकू दे शर्त."

"सांगेन उद्या" एवढं वोलून रूपमतीनं मेणा उचलण्याचा हुकूम भोयाना दिला.

☆ ☆

सूर्य कलण्याच्या वेतात होता अन् नर्मदा कांठी एका वृक्षाखाली दोन प्रेमी जीव वसले होते. रूपमती एकटीच तिच्या विश्वासू दासी-बरोवर आली होती. तिचं आजचं रूप आगळं होतं. तिनं सुरवार पेहेरली होती, अंगात अंगरखा, डोक्यावर वत्ती होती. काजळानं तिचे डोळे लखलखीत दिसत होते अन् मर्दानी पोशाख अंगावर असल्यामुळं एखाद्या पोरसवद्या सरदाराप्रमाणं ती मोठी गुलजार दिसत होती. मेंदीनं भरलेली तिची लांवसडक बोटं अन् लालचुटूक ओठ तिच्या सौंदर्यात भर टाकीत होते. पोशाख वदलला तरी तिचं तारुण्य अन् सौंदर्य त्यातून लपत नव्हतं–शरीराला फिट् वसलेल्या कपड्यातून तिची ज्वानी ओसंडत होती.

वाजवहादुर तिला निरखीत होता. प्रथम ओळख पटेना. पण तिच्या डोळ्यानी ती पटविली. अन् वाज खळखळून हसला अन् म्हणाला––

"मैंने तो पहचानाहि नही."

"लेकिन आँखोनें तो पहचान लिया ना ?"

"हां रूप. तेरी सुरत मैंने तेरे आंखोमे देखी."

"शरीफ आदमी की यही आदत होती है."

"रूप, मग काय ठरवलंस ?"

"मी रजपूत आपण यवन ! तेव्हा आपली मोहब्बत परमेश्वराला मान्य नाही व्हायची."

"रूप, अल्लाच्या दरवारात जात, पात धर्म याना बिलकूल स्थान नाही. तिथं दोनच जाती स्त्री अन् पुरुष. इतर भेद त्याला मंजूर नाहीत".

"पण धर्माशी वेईमानी मी कशी करू ?"

"कोण म्हणतो कर म्हणून ? तू धर्म सोड असं कुठं मी म्हणतोय् ? तुझी माझी सगाई व्हावी, तू अन् मी शरीरानं अन् मनानं वद्ध व्हावं एवढीच माझी इच्छा आहे."







"तुमचं ठीक आहे बाज. पण मला माझ्या घरावर कायमचा निखारा ठेवावा लागेल."

"तेहि खरं रूप. तुमची रजपुताची जात फार कडवी आहे. ते तुला क्षमा नाही करणार ? माझ्यासाठी त्यांचा त्याग तू करशील ना ?"

"करीन. पण. . . . "

"पण काय ?"

"विसरलात ?"

"हो. ऐकू दे तुझी शर्त."

"या नदीचा प्रवाह तुम्हाला मांडवगडावर न्यावा लागेल. या नदीच्या पाण्यावर मी वाढले. इथं माझी काव्यशक्ती फुलली. आवाजाला मुलायमपणा आला. कंठाला सूर आला. तुमच्या गडावरच्या कुव्याच्या पाण्यानं माझी काव्यशक्ती खुंटेल अन् आवाज बेसूर होईल. हा प्रवाह गडावर न्या अन् तिथं एक कुंड बांधा. एवढं झालं की, आपली शादी जरूर होईल. नाहीतर आपली मोहवत हे एक स्वप्न समजून विसरून जा." रूपमतीचा आवाज भरून आला होता, तिच्या तोंडातून शब्द उमटत नव्हते.

"आणखीन् काही?"

"मला अंगुर फार आवडतात. कुंड झालं की, त्याच्या पाण्यातून एखादी फक्कडशी अंगुर बाग तयार करा."

"तुझी शर्त बेशक पुरी करीन रूप ! अल्लाची कसम घेतो हवी तर."

"गरज नाही त्याची. माझा विश्वास आहे तुमच्यावर. आपण शब्द दिलात आता माझं दिल् मी तुमच्या स्वाधीन केलंय्."

रूपमतीचा होकार मिळताच बाजबहादुरला राहावलं नाही. त्यानं तिच्या भोवती बाहुपाशाचा विळखा घातला. त्याची पक्कड पोलादी होती. त्यांतून त्याची शक्ती रुपमतीला जाणवत होती. या सुखाचा अनुभव तिला नवा होता. पण त्यात ती सुखावली होती अन् बाजबहादुर तिचं सौंदर्य लुटीत होता, चाखत होता. दोघंहि देहभान विसरली. तिच्या ओठातल्या शरावानं बाज धुंद झाला. अन् त्याच्या मर्दानी मिठीत रूपमती सुखावली होती. धर्माचे बंद नसलेले ते दोन प्रेमी जीव तारुण्याची मजा मनःपूतपणं भोगीत होते. सूर्य बुडाला अन् मग दोघं भानावर आली.

"रूप आज आपली शादी पक्की झाली."

"शर्त पुरी व्हायच्या आत ?"

"हो."

"मी नाही समजले ."

"निसर्गापुढं तुझी शर्त ढिली पडली रूप !"

"चला चावट कुठले. पण शर्त पुरी करणार ना? शपथ आहे माझी तुम्हाला."

"बेईमानी मला ठाऊक नाही रूप. गडावर येशील तेव्हा तुला नर्मदेचेचं पाणी मिळेल याची खात्री असूदे.

"मला तुमचा भरवसा आहे म्हणून आज तुमच्या शरीराला मो साद दिली." एवढं बोलून रुपमती लाजेनं लाल झाली. दासीला तिनं खुणावलं अन् चलण्याची इशारत दिली.

"आता कधी भेटायचं रूप ?

"शादीच्या वेळी. शर्त पुरी झाल्यावर. शादीच्या आधी देहधर्म उरकणं आमच्या धर्माला मंजूर नाही, खानदानीला ते मान्य नाही. केवळ शर्त सांगण्यासाठीच मी आपल्याला आज भेटले बाज. आणखी मोहात नका पाडू मला. गडावर कुंड झालं की, दुसऱ्या दिवशी मी आपली होईन." एवढं बोलून एखाद्या तीरासारखी घोडा फेकीत रूपमती दासीबरोबर निघून गेली अन् शर्त पुरी कशी करायची या विवंचनेत बाजबहादुरनं गडाकडे घोडा वळविला.

☆ ☆

बाजबहादुर राजधानीत, आपल्या गडावर आला तेव्हा त्याच्या डोक्यात रूपमतीशिवाय दुसरा विचार नव्हता. तिची शर्त पाळण्याचा त्याचा निर्धार होता, निश्चय होता. पण ती शर्त अमलात कशी आणायची याची त्याला फिकीर होती. लागलीच त्यानं आपला विश्वासू अन् मर्जीतला दरबारी गवय्या मानखान याला बोलावणं धाडलं. तो आल्यावर त्यानं त्याला नदीचा प्रवाह गडावर आणण्याची युक्ती विचारली. मानखान गाणारा असला तरी मोठा दुष्ट अन् हिंदुद्वेष्टा होता. प्रथम बाजबहादुरच्या कल्पनेचं त्याला आश्चर्य वाटलं, त्याची मती गुंग झाली. पण त्यानं स्वतःला सावरलं अन् मग चटकन् तो म्हणाला—

"हुजूर माफी असावी. खुदानं निर्मिलेल्या निसर्गाची वाट बदलणं फार कठीण आहे. कित्येक माणसांचा संहार होईल, अन् काम फत्ते होईलच याची शाश्वति नाही. पण आजच हा विचार आपल्या मनात कां आला ते नाही कळलं खाविंद ?"

## आली आली, निवडणूक आली (५)




अचूक नेमबाजी ! पंधरा वर्षांच्या जाळपोळीच्या अनुभवाने शत्रुपक्षास जेरीस आणू








"मोहबतीसाठी !"

"कुणाच्या ?"

"रूपमतीच्या."

"हुं: ! एका काफराच्या छोकरीच्या लहरीसाठी ही वेडी शर्त आपण पुरी करणार ?"

"खामोष ! मानखान. तुझ्याऐवजी दुसरा कुणी असता तर गर्दन छाटली असती. तुला हे काम करता नसेल येत तर राहूदे ! मी पाहीन ते कसं करायचं ते. तू फक्त लौकर राज्यज्योतिषाला धाडून दे लवकर !"

मानखान सलाम ठोकून चालता झाला.

थोड्या वेळानं राज्यज्योतिषी जसवंतसिंग महालात हजर झाला. तो फार जुना ज्योतिषी असून बाजबहादुरच्या वडीलांपासून तो दरबारची चाकरी करीत होता अन् त्याच्यावर बाजबहादुरचाहि अत्यन्त लोभ होता. त्याची वाणी नेहमी खरी ठरायची. त्याचं भाकीत कधी खोटं नसे ठरत.

"बसा जसवंतसिंग. आम्ही आपलीच वाट पहातोय् मगापासून." बाजबहादुरनं म्हटल. "खाविंद, आज एवढया तांतडीने गरीबाची याद कां केली ?"

एक फैसला करायचाय. तुमचा सल्ला हवाय."

"बोला हुजूर."

"आम्हाला गडावर नर्मदेचं पाणी आणायचंय !"

"कां ? कुव्याचा पाण्याचा कंटाळा आला ?"

"तसं नाही जसवंतसिंग. पण आता आम्ही शादी करायची ठरवलंय्."

"पण त्याचा नदीच्या पाण्याशी काय संबंध सरकार ?"

"आमच्या भावी बेगमेची शर्त आम्हाला पुरी करायचीय."

"माफ असावी हुजूर ! पण अशी विचित्र अट घालणाऱ्या स्त्रीचं नाव कळेल का ?"

"रूपमती ! आमची तिच्यावर मोहब्बत जडलीय."

"एकूण फैसला मोहबतीखातर करायचाय तर !"

"तसं म्हणा हवं तर."

"रूपमती रजपूत आहे. ती शादीस तयार आहे ?"

"शर्त पुरी झाली तर."

"शर्त कां नाही पुरी होणार सरकार ?"

"त्यासाठीच आपल्याला बोलाविलं जसवंतसिंग."

"खाविंद. स्पष्ट बोलतो याबद्दल माफी असावी. ही शादी आपल्याला फार महाग पडेल."

"स्पष्ट बोलतो असं म्हणालात ना ? मग अशी गूढ भाषा कां वापरता जसवंतसिंग ?"

"या शादीचर शेवट चांगला नाही होणार खाविंद !"

"म्हणजे काय जसवंतसिंग ? आपण रजपूत. तेव्हा रूपमतीशी आमची शादी होऊ नये असं कां आपल्याला वाटतं ?"

"नाही हुजूर ! ही शादी टाळणं आपल्या अन् माझ्या हाती नाही. आपल्या प्राक्तनातच तसं आहे."

"हुं: ! बाजबहादुरासमोर प्राक्तनाच्या गोष्टी बोलणं आपल्याला शोभत नाही जसवंतसिंग !"

"तसं म्हणा हवं तर ! शर्त जरूर पुरी करावी हुजूर. आपणास त्यात यश येईल."

"शाब्बास. हाच सल्ला आम्हाला हवा होता. पुढचं आम्ही पाहून घेऊं." जसवंतसिंग खिन्न मनानं निघून गेला अन् बाजबहादुर शर्त पुरी करण्याच्या पुढील नजविजीस लागला.

☆ ☆

रूपमतीच्या प्रेमाची वार्ता तिचे वडील ठाकूरसाहेबांच्या कानावर जाण्यास वेळ नाही लागला. तिची आई तर ही बातमी ऐकून डोळयातून आसवे गाळू लागली. ती रूपमतीला बोलली—

"पोरी, तू आमच्या तोंडाला काळोखी फासणार ग ! प्रेमच करायचं तर रजपूत वीर थोडे का आहेत आपल्याकडे. पण त्याना सोडून तू यवनाशी का लग्न करणार ?"

"आई, प्रेम धर्मओळखत नाही. शिवाय बाजबहादुर उदार वृत्तीचे आहेत. परधर्मसहिष्णुवादी आहेत. संगीतात निपुण आहेत. ख्याल गायकीत त्यांचा हात धरणारा कोण आहे ? माझं जीवन त्यांच्या संगतीत फुलेल, बहरेल. आमच्या विवाहामुळं संगीतकला वर्धिष्णु होईल. माझ्या धार्मिक स्वातंत्र्याच्या आड ते नाही यायचे. शिवाय त्यानी माझा प्राण वांचविला. आता का त्यांच्याशी प्रतारणा करू ?" रूपमती बोलली.



## संस्कृति

यांना आव्हाने लागतात हातभट्टीच्या
बोहेमियन धुंदीची; कोत्या शब्दांच्या—
खोट्या गुंतागुंतीची; अर्थशून्य कसरतींची—
तत्त्वज्ञानाची काव(काव) फासलेल्या.
यांचा नावीन्याचा शोध संपतो दैनिकाच्या
फोटोसकट रिपोर्टात नाव छापून येताच,
आणि जेव्हा हार घालतात यांच्या गळ्यात
नेहमीचेच विझलेले सराईत यशस्वी
तेव्हा खरी फुले देखील क्षणभर
शरमेने कागदाची सुशोभित होतात.

दैनिकाच्या दीड कॉलमापलीकडे ज्याची
धाव नसते असा सरडा सरावाने
गरुडांच्या उड्डाणावर थुंकू लागतो
दीड लाख खपाच्या हुकमी आवेशात,
प्रसिद्धीचा शेंदूर थापून करतो दगडांचे देव.
हा यशस्वी. तो यशस्वी. जाहिरात्या यशस्वी.
माजोरी यशस्वी. चतुर यशस्वी. लाचार यशस्वी.
धमक्या यशस्वी. खमक्या यशस्वी.
आणि मग सत्ताधिष्ठित राजकीय पुढारी
या यशस्वी माना चिमटीत धरून
बसवतात त्यांना सांस्कृतिक कमिट्यांच्या खुर्च्यांवर
भत्त्यांच्या मऊ सुशोभित गाद्या असलेल्या
आणि त्यांच्या समारंभांची उद्घाटने करतात
(पुढल्या निवडणुकीत विजय आमचाच आहे.)

देवा, माझ्या आत्म्याला क्षमा कर
माझ्यात हिंमत नाही नागडे हिंडण्याची.......

—मंगेश पाडगांवकर

इतका वेळ ठाकूरसाहेब गप्प होते. पण आता त्यांना राहवेना. कातर स्वरात ते बोलले, "मुली. तू आमची एकुलती एक लेक. देवानं तुला काव्य करण्याची प्रतिभा दिली. जोडीला रूप अन् गोड गळाहि दिला. तुझा कंठ कोकिळेलाहि लाजवण्यासारखा. तुझ्याबद्दल आम्ही केवढ्या अपेक्षा बाळगून होतो. तू मुसलमानाशी विवाह करणार म्हणून नाही मला वाईट वाटत. आपल्याकडे असे अनेक विवाह झाले. पण तू आम्हाला मुलासारखी. पुत्रसुख आमच्या नशिबी नाही. तुलाच आम्ही मुलगा मानलं. आमचं एक सोड. पण एकदा का तुझं लग्न झालं की, लौकीकदृष्ट्या तू यवन होशील. आम्हाला कायमची पारखी होशील. आम्हाला तुझ्याकडे येता नाही येणार अन् तुलाहि आमच्याकडे येता नाही यायचं पोरी. कारण आमचा धर्मच मुळी विचित्र आहे. पण होणार त्याला उपाय नाही. तू अगदी लहान होतीस ना? तेव्हाच एका फकीरानं हे भाकीत मला सांगितलं होतं. तेव्हा मी त्याला घालवून दिलं. पण दुर्दैवानं आज त्याची वाणी खरी ठरणार असं वाटू लागलंय् मला. तुझं प्राक्तनच तसं त्याला आम्ही काय करणार मुली. रूप, श्रीकृष्णाला कधी विसरू नकोस. तो तुला सुखी ठेवील बेटा."

☆ ☆

हजारो मजूर खपत होते. नर्मदेचा प्रवाह मांडवगडावर आणण्याचा चंग बाजबहादुरने बांधला होता. प्रथम पाण्याचा प्रवाह वर चढेना. प्रवाहापुढे फत्तर टिकाव धरीनात. कुणीतरी नरवळी देण्याची हिंदूंची कल्पना सुचविली. पण बाजबहादुरला ती मानवली नाही. अखेरीस बोकड बळी देण्यात आला. हजारो मजूर पुन्हा दिवसरात्र खपू लागले. देखरेख करणारे अधिकारी काम लौकर व्हावे म्हणून त्यांच्या पाठीवर सपासप चाबूक ओढू लागले. काहीच्या पाठीची धिरडी होत होती, त्यातून रक्ताच्या चिळकांड्या उडत. बाबहादुरला हा प्रकार पहावत नव्हता. पण शर्त पुरी होण्यासाठी हे अघोरी उपाय योजण्याखेरीज अधिकाऱ्यांचाहि निरुपाय आहे ही गोष्टहि तो जाणून होता. हजारो माणसांना पगार वाटताना सरकारी खजीना रिकामा होऊ लागला. प्रजेवर जबर कर बसविण्यात आले. कर देण्यास कुणी खळखळ करू लागले की, सजा मिळू लागली. हे सारं कशासाठी तर मोहबतीसाठी—रूपमतीची शर्त पुरी करण्यासाठी, ही गोष्ट प्रजेला ठाऊक झाल्यानं रूपमती अन् बाजबहादुर शापांचे मानकरी झाले.

बाजबहादुर बेचैन झाला. त्याची झोप उडाली. रूपमतीहि दुःखी झाली. पण मोहबतीपुढं त्यांचा निरुपाय झाला. एक एक दिवस जाऊ लागला तशी रूपमती झुरू लागली. इकडं बाजबहादुरहि तिच्या विरहामुळं शराबाच्या आहारी गेला. मदिरेचे पेलेच्या पेले तो संपवू लागला अन् त्याचा महाल मदिरेच्या वासानं भरून जाऊ लागला. रूपमतीनं अखेरीस श्रीकृष्णाकडं कौल मागितला. सकाळीच ती तान छेडू लागली. मध्यान्हाची वेळ झाली अन् टपकन् एक फूल कृष्णाच्या मुकुटातून खाली पडलं. कौल मिळाला तेव्हा तिनं गाणं थांबवलं तोच गडावर एका कुंडात नदीचं पाणी झुळझुळं लागल्याचं वर्तमान बाजबहादुरच्या कानी आलं. धावतच तो कुंडाजवळ गेला अन् कुंडातल्या पाण्याच्या धारेला त्यानं तोंड लावलं. वाऱ्यासारखी ही बातमी रूपमतीपर्यंत येण्यास वेळ नाही लागला. बाजबहादुरच्या आनंदाला पारावार नव्हता तर तिकडे रूपमतीच्या घरात एकच आकांत उडाला. तिच्या आईनं हंबरडा फोडला. नातेवाईक स्फुंदून स्फुंदून रडत होते. ठाकूरसाहेब शांत होते. शर्त पुरी झाली म्हणून रूपमती आनंदी असली तर आई-बापांना आता अंतरावे लागणार या कल्पनेमुळं ती मनातून कष्टी होती. "प्राक्तनापुढं मानवी उपाय फोल आहेत पोरी" एवढंच ठाकूरसाहेब बोलले. रूपमतीचं मन दुःखी होतं पण निसर्ग तिला बाजबहादुरच्या बाहुपाशात विसावण्यासाठी हाक मारीत होता.

(उत्तरार्ध पुढील अंकी)











मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# झणाणते

—य. दि. फडके

इतका वेळ संथ लयीत झिमझिम चालणारा पाऊस आता चौखूर उधळला आहे. त्याची संगत करणाऱ्या सोसाटयाच्या वाऱ्याच्या विकट हास्यानं झाडांचा थरकाप होतो आहे. एखाद्या चवताळलेल्या जंगली जनावरा-प्रमाणं ढग गुरकावत आहेत. मधूनच एखादी वीज वेभान होऊन ढगाला कडकडून मिठी मारते आहे. समोरचा ऐटबाज रस्ता पावसानं झोडपून काढल्यामुळे निपचित पडला आहे. एखादी मोटार बेगुमानपणे त्याच्या अंगावरून जाते आहे तेव्हा तो चित्कारतो आहे. आसपासची घरं काळो-खाच्या कुशीत केव्हाच तोंड लपवून बसली आहेत. माझ्या खोलीत मात्र बेगम अख्त-रच्या लडिवाळ, जीवघेण्या स्वरातल्या लकेरी हवेत तरंगत आहेत. आणि दाद-ऱ्याचा सुगंध सुनीतानं माळलेल्या मोतियाच्या सुवासात बेमालूम मिसळला गेला आहे. 'हमारी कही मानो, राजाजी ! सौतन के लंबे लंबे बाल. उलझ मत जाना..... राजाजी....''



आज एकाएकी मला सुनंदाची आठवण येते आहे. या भलत्या वेळी ! तिला आठ





वत असेल का ती रात्र ? ती काय करीत असेल यावेळी ? कदाचित् नवऱ्याकडे पाठ करून झोपली असेल. माझ्याकडे पाठ करून सुनीता झोपली आहे आता तशी ! दमून. थकून. कदाचित् नवऱ्याच्या घोरण्यामुळे जागीही असेल. केव्हा डोळा लागेल याची वाट पाहात. तियं असा पाऊसही पडत नसेल. नुसता ऊष्मा होत असेल. दिवसभराच्या उन्हामुळं होणारी धग अजून रेंगाळत असेल. गार वाऱ्याची झुळूक यावी म्हणून उगाचच ती खिडकीपाशी उभी असेल कदाचित्. आकाशातले तारे पाहात. पण तिला माझी आठवण तरी होत असेल का ? ती प्रत्येक क्षणापुरतं जगते. तिला सवय आहे तशी. तिनं सवय लावून घेतली आहे तशी. आहे तो क्षण भोगायचा. मागं वळून पाहायचं नाही. पुढची फिकीर करायची नाही. कुठे गुंतायचं नाही. ते ते क्षण बेहोशीत जगायचे पण तेवढयापुरतेच. तितकेच. त्या क्षणांचं ओझं बाळगायचं नाही आयुष्यभर. अशी तिची रीत आहे. मला तसं जमत नाही. मी खूप प्रयत्न करून पाहतो पण कधी तरी असे वाहून गेलेले क्षण आठवतात. आता तसं होतं आहे. अंगाला झोंबणाऱ्या गारठ्यावरोबरच ती आठवणही झोंबते आहे. सलते आहे तशी सुखावतेही आहे मनाला.

पावसाची झड लागली होती त्या रात्री. अशीच. मी एकटाच कसलंसं मासिक चाळीत पलंगावर लोळत होतो. रविशंकर छेडीत असलेल्या अभोगीचे आलाप ऐकत. कुणीतरी दार ठोठावीत असल्यासारखं वाटलं म्हणून काहीसं चिडून उठलो. वाटलं, "आता या मुसळधार पावसात कोण आलं आहे या भलत्या वेळी ?" दार उघडून पाहिलं तर सुनंदा उभी. ओलीचिंब. मी क्षणभर दरवाजातच उभा राहिलो. काही न बोलता.

**तिच्यासारखच जगायचं मी फार फार ठरवलं. त्या त्या क्षणापुरतं. तितकंच. तेवढ्यापुरतंच. पण मला अजून तिच्यासारखं जमत नाही. मी खूप प्रयत्न करून पाहातो पण कधीतरी असे वाहून गेलेले क्षण मानगुटीवर बसतात.... त्रस्त समंधासारखे.... !**

"काय ? घरात येऊ देणार की नाही मला ?"

"अरेच्चा. खरंच की ! तू एवढी अचानक आलीस. माझा विश्वास बसेना. मी उभाच आहे आपला दरवाजात तुझी वाट अडवून."

पावसाच्या सरीनं मला तेवढ्यात कुरवाळलं. मला बरं वाटलं मी दरवाजा लावून घेतला. ओलीचिंब सुनंदा माझ्याकडं पाहात राहिली. तिच्या निथळणाऱ्या अंगाकडं मी पाहात होतो. तिच्या अंगाला बिलगून बसलेल्या ओल्या वस्त्रामधून तिच्या तरण्याताठ्या सावळ्या बांधेसूद देहाचं वैभव डोकावत होतं. खुणावत होतं. मी म्हणालो, "आज अशी कशी वाट चुकलीस ? आणि पावसात कुठं भटकत होतीस एवढा वेळ. छत्री रेनकोट काही आणलं नव्हतं का ? आणि घरी गेली नाहीस आज ऑफीस सुटल्यावर ? आज शनिवार होता ना ?"

"अरे, अरे. किती प्रश्न विचारतोस मला एकदम. सगळं सांगते तुला. पण त्या आधी मला अंग पुसायला टॉवेल तरी देशील की नाहीस ? आणि बदलायला कपडे? मला थंडी वाजते आहे बघ."

"सॉरी. हा घे टॉवेल. पण तुला बदलायला कपडे कुठले देणार ग मी ? ही ब्रह्मचाऱ्याची मठी."

टॉवेलनं तोंड पुसता पुसता सुनंदा म्हणाली, "म्हणून तर सांगितलं तुला. एकटा राहू नकोस. एखादी चांगली मुलगी बघ आणि जमवून टाक. असं केलं असतंस तर आज अशी तुझी पंचाईत झाली असती का ?"

'कबूल. पण लग्न करू म्हणून कुठं होतात काय ? आपल्या वाट्याला दिलेली पोरगी भेटायला पाहिजे ना?"

"शोधून काढायचीस कुठं असेल तियं."

"एक शोधली होती. वाटलं हीच ती ! पण गेली निसटून."

"गेली तर गेली. तुझ्यासारख्याला मुली काय रे एक सोडून छप्पन मिळतील."

"छप्पन नकोत. तूनं एक मिळाली तरी पुरे. तेवढीही झेपली म्हणजे झालं."

"चल. चावटपणा नको करूस. मी काकडते आहे. हे बघ. तुझा नाईटसूट असेल ना एखादा. तो दे. मला सैल होईल थोडासा पण चालेल."

"नाईटसूट ?"

"होय नाईटसूट ! मग आता काय रात्रभर हे ओले कपडे अंगात घालून बसू की काय ? सर्दी झाली म्हणजे ?"

"रात्रभर ?"

"होय रात्रभर. आज इथंच राहणार आहे मी. बघतोस काय असा ? पावसानं गाड्या बंद पडल्या आहेत. केव्हा सुरू होणार कोण जाणे ! असल्या या पावसात मी रात्रीच्या वेळेला स्टेशनवर किती वेळ बसून राहू ? आणि डोंबिवलीला कशी जाऊ ?"

"पण एवढा वेळ कुठं भटकत होतीस? घरादाराची काही शुद्ध आहे की नाही तुला ?"

"अरे वा ! तू तर अगदी माझा नवरा असल्यासारखा विचारतो आहेस दरडावून! मी सगळं सांगते रे तुला पण आधी तुझा नाईटसूट तरी देशील की नाही ?" माझ्या हातातला नाईटसूट घेत सुनंदा म्हणाली, "आणि काय खोली रे ही ? कुठं आडोसा नाही. बंद बाथरूमही नाही. बायकामाणसानं कसं राहावं रे तिथं ? तू एक चांगला फ्लॅट घेऊन टाक लवकर ओनरशिपचा. आणि हे बघ. तू थोडा वेळ खिडकीतून बाहेर पाहात उभा रहा. मी कपडे बदलते. मागं वळून पाहू नकोस मधेच. बाहेर पाऊस कोसळतो आहे त्याच्याकडं पहा. मी हाक मारल्यानंतर खिडकीजवळून हलायचं तोपर्यंत नाही.

"अरे वा ! तू तर अगदी माझी बायको असल्यासारखी दटावते आहेस की. म्हटलं, कुमारी सुनंदा, खोली माझी आहे."

"असं काय करतोस रे ? प्लीज, ऐक ना माझं. माझी शपथ आहे तुला. मागं वळून पाहशील तर. मोडलीस तर अश्शी निघून जाईन भर पावसात."

मी खिडकीबाहेर पाहात पावसानं घरलेला ताल ऐकू लागलो. जलद लयीतल्या रविशंकरच्या सतारीच्या सुरांची साथ करणाऱ्या तबल्याची दमछाक होत होती. मला वाटलं, "आज या सुनंदाच्या मनात काय आहे ? तिनं आपला विचार वदलला की काय ? मागे मनधरणी केली तर निष्ठूरपणानं तिनं सारे पाश तोडून टाकले. पण पाश खरोखरच होते का ? खरेच असते तर तोडता आले असते का ? असे सहजासहजी ? त्या दिवशी विचारलं लग्नावद्दल तर सरळ नकार दिलान्. पुन्हा भेट घेण्याचा प्रयत्न केला तर हिनं टाळलंन आपल्याला काहीतरी सबबी सांगून. अचानक गाठलं तर तुटकपणानं वोलली. उपऱ्या माणसासारखं थंड औपचारिक. पिच्छा पुरवला तर साळसूदपणानं मलाच दोनतीनदा सांगितलंन, "तू आता लग्न कर आणि संसार थाट. माझ्यावर माझ्या आजारी वडलांची, थकलेल्या आईची, लग्न व्हायची असलेल्या वहिणींची, शाळेत शिकणाऱ्या भावंडांची जवाबदारी आहे. ती पार पडल्यावर केलं तर करीन मी लग्न. तेही नक्की नाही. तू उगीच थांवू नकोस. ही सोन्यासारखी वर्षं झुरण्यात आणि वाट पाहण्यात घालवू नकोस. म्हतारपण आल्यावर काय उपयोग आहे लग्न करून ? पूर आलेल्या नदीत उडी टाकली तर पोहोण्याची मजा. माझी एक मैत्रीण आहे. अगदी हातघाईला आली आहे वघ. छान आहे. एकदा वघ तरी तिला." असं वोलणं किती वेळा ऐकायचं ? आपोआपच भेटीगाठी कमी झाल्या. मी दुसरी नोकरी धरली तशा त्या आणखीच दुर्मिळ झाल्या. अलीकडे अलीकडे तर क्वचित सुनंदा दिसे. म्युझियमसमोरच्या वस स्टॉपवर उभी असलेली. कधी वोरीवंदरच्या प्लॅटफॉर्मवरच्या गर्दीत मैत्रिणींच्या घोळक्यात उभी असायची. ओझरती दिसायची. कधी पाहून न पाहिल्यासारखं करायची. कधी नुसतंच हसायची. व पुन्हा वरोवरच्या माणसावरोवर वोलण्यात गुंग व्हायची. तिच्यावरोबरचे पुरुषही तेच असायचे नाहीत. मला कधी कधी तिचा राग यायचा. पण वाटायचं, तिनं काही आपल्याला फसवलं नाही. खोटी वचनं दिली नाहीत. आपल्यावरोवर नाटकसिनेमाला आली. समुद्रकिनाऱ्यावर भटकली. वागातला हिरवळीवर वसून वोलली. सलगी करू दिली पण वाढवू दिली नाही. हात हातात घेऊ दिले. थोडा वेळ तसेच राहू दिले. पण नंतर सोडवून घेतलेन. नेहमी तिची वोटं आपण होऊन गुंफली नाहीन् आपल्या वोटात. जवळ येऊनही नेहमी दूर राहिली. मग आजच अशी कशी आली एकाएकी ?

"अरे, थँक्स हं. दिलेला शव्द पाळल्यावद्दल तुझ्याकडे काही खायला आहे का रे ? मला फार भूक लागली आहे रे."

"खायला ? माझ्याकडं ? अग, खानावळीत जेवणारा माणूस मी ? माझ्याकडं काय असणार ? मलाच खाऊन टाक वाटल्यास."

"ए, सिरीयसली सांगतेय् रे मी. मला भूक लागलीय रे. मला झोप नाही यायची उपाशीपोटी."

"उपाशी आहेस ? एवढ्या वेळपर्यंत काही खायला वेळ झाला नाही का तुला?"

"नाही. गळ्याशपथ आज शनिवार होता ना तरी 'ओव्हरटाईम' करायचं ठरवलं होतं मी. आणि माझी ती मैत्रीण माहीत आहे ना तुला लॉरा डिसूजा ती न् मी सिनेमाला जाणार होतो साडे सहाला रीगलला. मी तिकीटं काढून ठेवली होती. वेड्यासारखी वाट पाहात उभी आपली मी थेटराबाहेर सात वाजेपर्यंत. कुठं आहे या वयेचा पत्ता ? गेली असेल कुठल्यातरी 'फ्रेंड' बरोबर 'ट्विस्ट' करायला. सिनेमा संपवून बाहेर पडते तो पाऊस पडतो आहे मुसळधार. सकाळी निघाले तेव्हा चांगलं

स्वच्छ होतं आकाश. तुला तरी वाटलं होतं का रात्री पाऊस पडणार आहे म्हणून ? म्हणून छत्री रेनकोट काही घेतलं नाही. कशीवशी टॅक्सी मिळवली. गेले व्ही. टी.ला तर गाड्या बंद पडलेल्या. चर्चगेटला आले. गाडी पकडली आणि तुझ्याकडं आले. म्हटलं हा ब्रह्मचारी जागा असणार. बसला असेल वाचीत."

"असं होय ? पण आता तुला काय खायला द्यायचं ? माझी खोली ही अशी एका बंगल्यातल्या औटहाऊसमधली. जवळ-पास समुद्राखेरीज काही नाही. शिवाजी-पार्कच्या नाक्यावर जायचं म्हटलं तरी आता हॉटेल उघडं असायचं नाही."

"अगबाई, आता काय करायचं रे ? मी सकाळी जेवले तेवढीच. नंतर थेटरात फक्त वेफर्स खाल्ले अन् बोरीबंदरला आइस्क्रीम."

"तुला ब्रेड चालेल ? थोडी बिस्किटे आहेत खारी. एखाद दुसरं सफरचंद असेल आणि. . . .

"चालेल, चालेल आणि मस्तपैकी आपण चहा बनवू या. गरम गरम. बघ तरी कसा करते मी."

भराभरा तिनं स्टोव्ह पेटवला. चहा-साखरेचे डबे धुंडाळले. ब्रेडचे तुकडे तोंडात कोंबता कोंबता ! दूध गरम करायला ठेवून ती हळू गुणगुणायला लागली इंग्रजी चित्रपटातलं गीत. "Whatever will be, will be......" गरम चहाचा कप माझ्या हाती देत ती म्हणाली, "अरे तो रेडिओ बंद केला नाहीस की." मी गरम गरम चहाचा घोट घेता घेता रेडिओ बंद केला. व तिच्याकडे पाहात राहिलो. ती बिस्किटं खाता खाता सफर-चंदाच्या फोडी करीत होती. लालबुंद. रसरशीत सफरचंद.

मधेच तिने वर पाहिले आणि विचारले, "काय पाहतोस रे !"

"सफरचंद !"

"छान आहे. ताजं दिसतं. फळ जरा जून झालं की चव जाते."

मी काहीच बोललो नाही. मला वाटलं, "काय विचार आहे हिचा ?" सफरचंदाच्या फोडी खाऊन झाल्यावर म्हणाली, "हे असलं काही खाल्लं की तोंड खवळतं बघ. तृप्तीच होत नाही. कितीही खाल्लं तरी." सुनंदा माझ्यासमोरचा रिकामा कप घेण्यासाठी वाकली तेव्हा मला तिचे केस अजून ओलेच असल्याचे जाणवले. "सुनंदा, डोकं नीट पूस. केस ओलेच राहिलेले दिसतायत्."

"होय रे बाबा. जरा पंखा सुरू कर. वाळवते बघ. "लांबसडक ओले केस मोकळे होऊन पाठीवरून रुळू लागले. त्या दाट लांबसडक, ओल्या, मोकळ्या केसांनी माझी नजर चळली. मी तिला जवळ ओढून केसा-वरून हात फिरवू लागलो. तिच्या पुष्ट वक्षभागाच्या स्पर्शानं पेटलो. हातांची मिठी घट्ट होत गेली. ओल्या अंगाच्या स्पर्शानं ऊब आली. मग बाहेरच्या कोसळणाऱ्या पावसाचा आवाज घुमत राहिला काही काळ. वीज ढगावर तुटून पडली मधेच आणि पुन्हा पावसानं थैमान घालायला सुरुवात केली. पावसाचा जोर कमी झाला काही वेळानं आणिमग खिडकी बाहेर ठिब-कणाऱ्या पागोळ्यांचा आवाज ऐकत कितीतरी वेळ सुनंदाच्या उरोजावर हात ठेवून मी स्तब्ध होतो. सुनंदाला केव्हा झोप लागली होती ते कळलंही नाही आणि मला केव्हा झोप लागली तेही समजलं नाही.

सकाळी जाग आली तेव्हा सूर्यकिरण अंथरुणावर पडले होते. सुनंदा नव्हती तिथं. फक्त नाईटसुटाची घडी करून ठेवलेली होती. मला काही कळेना. मी उगाचच नाईट-सुटाची घडी उचलली. खाली एक चिठी होती.

"काल रात्री झालं ते विसरून जा. ते तेवढंच होतं. तेवढ्यापुरतंच. त्याहून अधिक त्याचा अर्थ घेऊ नकोस. होतं असं कधी कधी. सिनेमा पाहून मी स्टेशनवर गेले काल आणि गाड्या बंद असलेल्या ऐकल्या तेव्हा वाटलं कुठं जावं आता ? फार एकटं एकटं वाटलं. तुझी आठवण झाली. आले तुझ्याकडे तुझीच आठवण कां झाली सांगता येत नाही. झाली खरी. पण नेहमी तुझीच होईल असे नाही. देशमुखची होईल. गोख-ल्यांची होईल. खन्नाची होईल. वेंकटाचलम-चीही कदाचित् होईल. माझ्या नादी लागू नकोस. मला लग्न करायचं नाही. मग्या तरी माझ्यासाठी वाट पाहाण्यानही अर्थ नाही. आपल्या वाटा वेगळ्या आहेत. तू तुझ्या वाटेनं जा. मी माझ्या वाटेनं जाते"—सुनंदा.

चिट्ठी मी पुन्हा पुन्हा वाचली आणि रागारागानं तुकडे तुकडे करून फेकून दिली. तिच्यासारखंच जगायचं ठरवलं. त्या त्या क्षणापुरतं तितकंच तेवढ्यापुरतंच. पण मला अजून तिच्यासारखं जमत नाही. मी खूप प्रयत्न करून पाहतो पण कधीतरी असे वाहून गेलेले क्षण मानगुटीवर बसतात. त्रस्त समंधासारखे. आता तसं होतं आहे. बाहेर पाऊस चौखूर उधळला आहे.

मी बेचैन होऊन सुनीताच्या अंगावरून हात फिरवू लागतो. तिची झोप चाळवते. डाव्या कुशीवरून उजव्या कुशीवर वळता-वळता अर्धवट झोपेतच ती म्हणते, "हे काय जागेच का तुम्ही अजून ? रेडिओही सुरूच आहे. उद्या रविवार असला तरी लवकर उठायचं माहीत आहे ना ? चारुची ट्रिप जायची आहे ना शाळेची. सकाळी उठून शाळेत पोचवणार आहात न् त्याला ?"

मी काहीच बोलत नाही. नुसती तिची चुंबनं घेऊ लागतो. माझा हात हातात घेत सुनीता म्हणते, "अहो, असं काय करताय् ? चारुला जाग येईल ना. आता मोठा झाला आहे तो." मी काहीच बोलत नाही. माझी बोटे सुनीताच्या उरोजावरून फिरू लाग-तात.

सुनीता माझा हात हातात घेत कुज-बुजते, "आता नको. मी फार दमलेय्. तुम्हाला बरं नाही वाटायचं. उद्या सकाळी नक्की. चारु गेल्यानंतर. मला नाहायचंही आहे उद्या. मी नाहून येईन."

मी भिंतीकडे तोंड फिरवतो. पाऊस कोसळतो आहेच सारखा. ढग गडगडताहेत पण वीज मात्र चमकत नाही आता. बेगम अख्तरच्या लडिवाळ जीवघेण्या स्वरात भिजलेले शब्द खोलीभर दरवळत आहेत. "तुम चले गये तो बहारे चली गयी.... तुम चले गये तो..."

मला वाटतंय्. कुणीतरी दार ठोठावतं आहे. कुणीतरी दार ठोठावतंय्. ●●●

अनुक्रमणिका

बापू एकाएकी खंगल्यासारखा दिसू लागला त्याची छाती गर्दन पार उतरली. गाल आत गेले. तोंड निरतेज दिसू लागले... एकच मुका....पण बापूला तो असा भोवला.... !

—पद्‌माकर गोवईकर

ए कोणतीस-तीस वर्षाचा बापू मास्तर रंगानं गोरा आणि अंगानं भरलेला होता. उंच आणि तरतरीत नाक, तालमीतल्या थपडा खाऊन बुजलेले कान, अंगावर लांबूनहि पांढरे घोप दिसतील असे कपडे. ते स्वतःच्या हातधुलाईचे असत. पांढरा लेंगा, पांढरा नेहरू शर्ट आणि डोक्यावर पांढरी टोपी यानी तो अगदी छबकडा दिसत होता सकाळी दोन आण्याच्या साबणाच्या वडीने कपडे स्वच्छ धुवायचे. त्याला नीळ द्यायची आणि संध्याकाळी शाळेतून आले की, त्यांच्या घड्या घालून ते निजत्या अंथरुणाखाली ठेऊन द्यायचे. सकाळी इस्त्री तयार. लेंग्याची रेघ बरोबर गुढग्यावर यायची. टोपी बरोबर कपाळावर ताठ रेघेत उभी राहायची.

जेवणखाण, झोप, शाळा आणि तालीम या चार गोष्टी खेरीज पाचवी गोष्ट बापू मास्तराला माहीत नव्हती. ज्यावेळी तो झोपलेला नसे तेव्हा तो शाळेत गुंतलेला आहे, असे नक्की समजावे. आणि ज्यावेळी तालमीत नाही त्यावेळी बापू जेवण्यात गुंगलेला असावा हे अगदी प्राथमिक दर्जाचे तर्कशास्त्र होते. आणि यापैकी काहीहि तो करीत नसे त्यावेळी पारावर किंवा एखाद्या लावलेल्या दुकानच्या मोकळ्या फळीवर बसून तो येणाजाणाराला तालमीचे आणि शरीरसंपत्तीचे श्रेष्ठत्व पटवून देण्यात धन्यता मानत असे.

जरा कुणी किडमिड्या शरीराचा आणि आळसात बसलेला दिसला की, बापूच्या भुजा फुरफुरत. डोळे मोठे होत. तो आवाज वाढवून त्या गृहस्थाला दम देई.

'का लेका, असं खुडुकहून कवा पत्तुर बसनार ? चा परीस तालमीत जरा उठाबशा काढीत जा की वाइच. का आईबाचं बुडल कां ?—'

असे तो सहज म्हणत असे. मग एखादा कमी जास्त बोलणारा गडी भेटला तर मग विचारायलाच नको. माकडाच्या हातात कोलीत द्यावे, त्याप्रमाणे बापू लगेच डान्स घालायलाच सुरुवात करी.

'हात औट करून टाकीन लेका, हां ऽऽ—' असे खडसावीत असे. क्वचित सात्विक संतापाने तो चार-सहा धपाटेहि घाले. बोलणारा त्यातून वाचला तर तालमीत येत असे. दोन दिवस उगाच अंगावरली कापडे काढून नदीकाठी वाळूत बसावे तशा तालमीतल्या तांबड्या मातीत येऊन बसत असे. उगाच वेड्यावाकड्या उड्या घेऊन

वापू मास्तरला आपण व्यायाम घेतल्याचे दिसेल असे काहीतरी करून निघून जात असे, ते पुन्हा वापूनें रिकामपणी वघून दम देऊन तालमीत यायला सांगेपर्यंत परत तिकडे फिरकत नसे. पण वापूला तेवढेच समाधान वाटत असे. गावातील वयस्कर माणसानाहि त्याच्यावद्दल आदर वाटत असे. म्हणजे वापूवद्दल. त्याने कुणालाहि दमदाटी दिली, चार टोलं दिलं तरी तो काही वाईट मार्गाला लावणारा माणूस नव्हता. घरच्या दुधाखेरीज ज्याला दुसरे पेय माहीत नव्हते, स्वतःच्या हाताने धुतलेल्या कपड्याखेरीज दुसरे कपडे ज्यानी कधी अंगाला लावले नाहीत, क्वचित् मुलाना गणित घालून शाळेत झोपण्याखेरीज ज्याने दुसरे पाप केले नाही अशा सात्विक आणि निर्मळ माणसाविषयी कुणाचे मत वाईट असणार!

अशा देवाघरच्या पांखरावाणी निर्मळ आयुष्यक्रम असलेल्या वापूच्या या वारीकसारीक दमदाटीवद्दल काहीनी हेड-मास्तरांकडे तक्रारी नेल्या. हेडमास्तरानी त्यांची समजूत घातली. सांगितले,

'त्ये जरा वांडच हायेत; त्यास्नी आता गुतवून टाकलं पाहिजे. लगीन झालं की त्येंच डोस्क आसं चालायचं न्हाई...'

बापू मास्तराला घरचं कुणी नसल्यामुळे हेड-मास्तरच त्याचे आई-वा होते. हे विधान फार ताणू नये. तक्रारीपुरतेच ते आई-बा होते. त्यानीच बापूच्या लग्नाचा विचार बोलून दाखवला. आणि ते संधीची वाट पहात राहिले. ☆☆

दरम्यान हेड-गुरुजी, पाटील, इतर मास्तर— यात बापू मास्तरहि होता— व गावातील चार इतर सभ्य लोक— यातुहि बापू मास्तर होता—यांची एक मिटिंग झाली. शाळेच्या सुधारणेबद्दल त्यात चर्चा झाली. हेडगुरुजीनी आणि पाटलानी दारोदार हिंडून शाळेत न येता घरी बसणाऱ्या आणि गुरं–राखणीला रानात जाणाऱ्या मुलांची खानेसुमारी करून, पटावर त्यांची संख्या वाढवून दाखवली होती. त्यांच्या या कौशल्यामुळे शाळेला बापू मास्तराखेरीज आणखी दोन शिक्षकांची देणगी शाळा खात्याने दिली होती. आता हेडगुरुजींची काहीहि तक्रार असणार नाही अशा खुषीत पाटलानी त्याना विचारले,

'काय गुर्जी, आता काय अडचण न्हाई न्हवं...'

वरवर पाहता काही अडचण दिसत नव्हती; पण हेडगुरुजीना ती जाणवत होती. ते म्हणाले,

'अडचण न्हाई कशी ? एक हाये की वो!'

'आता कशाची अडचण वो? परवा शाळा शाकारून दिली, रंग दिला; दोन तिथं तीन मास्तर झालं. आता आनी हायच कां?'

'शाळा भरभराटीला आनायची तर एक शिक्षिका मिळायला पाहिजे वघा'...'

'मजी वाई?'

'हां वाई...!'

'अहो, दमानं घेतलं तर वाईवी मिळल.'

'न्हवं, एक उणीव सांगितली.' हेड-गुरुजी इतकं वोलले आणि गप वसले.

पाटील विचारात पडले. शाळेत बाई नसणे ही उणीव कशी असावी याचा त्याना प्रश्न पडला. शिकवायला वाईच कशाला पाहिजे हे त्याना कळेना. त्यानी विचारले,

'बाई न्हाई ही उणीव कशी काय बरं?'

त्यांच्या या प्रश्नानं इतका वेळ अस्वस्थ असलेल्या बापू मास्तरला बरे वाटले. बाईचा विषय निघाल्यापासून तो एकाएक यडबाडल्यासारखा झाला होता. बाई-विषयी त्याचे फार म्हणजे अगदीच वाईट मत होते. 'बाई ही पहिलवान जातीला विष आहे' हे वाक्य 'मानाचं पान' या सिनेमात ऐकल्यापासून तो जे सर्वांना ऐकवत असे. त्याचं वाईबद्दलचे ते मत ठाम झालं होतं. आणि एकूणच बाई जात ही कशी विष असते हे दाखविण्यासाठी त्यानं वरच्या वर्गाची सहल मुद्दाम शहर गावाला नेऊन पोराना त्याने 'मानाचं पान' सिनेमा दाखवला होता. त्यातल्या दोन चुकार मुलानी त्याना चुकवून 'अनारकली' सिनेमा वघितला होता. आणि पुन्हा संध्याकाळी 'मानाच्या पान'च्या गर्दीत येऊन ते उभे राहिले. पण बापू मास्तरनी दोघाना बरोबर शोधून काढून प्रत्येकी एकाचा हात व दुसऱ्याचा खुबा आऊट केला होता. आणि तशा दुखऱ्या अवस्थेत दोघाना पुन्हा 'मानाचं पान' बघून चालत यायची शिक्षा त्याने दिली होती.

अशा या सद्वर्तनी मास्तरला बाईचा विषय कसा सोसावा बरे? त्यामुळे पाटलानी घेतलेल्या हरकतीच्या मुद्यावर त्याचा चेहरा उजळून आला. आवाज चढवून तो म्हणाला,

'शाळेत आनि बाई मानूस कशाला वो?'

'त्याचं असं हाय,' बापू मास्तरकडे संपूर्ण दुर्लक्ष करण्याचे प्रसंग खूप वेळा आले असल्यामुळे हेडगुरुजी थेट पाटलांशीच बोलू लागले, 'शिक्षक वाढले, पोरं वाढली, पण पोरींचं काय?'

'पोरींचं काय म्हंजे?' बापूने बोलण्याचा प्रयत्न केला.

'अहो शाळेत बाईमाणूस नाही तर मुलीना कोण पाठवनार शाळेत? त्यांची संख्या कशी वाढनार म्हंतो मी?'

'हां, खरं हाय! खरं हाय!' नवीन भरती केलेल्या दोन मास्तरानी हेडगुरुजींचे म्हणणे उचलून धरले. त्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे ते दोघेहि वयात आले होते व शिवाय तरुण होते. बापू मास्तरने त्यांची ही चलाखी ओळखली. त्याने त्या दोघांकडे मोठे डोळे करून बघितले. पण त्याच वेळी त्यापैकी एकाचे त्याच्याकडे लक्ष नव्हते व दुसरा टरका असल्यामुळे त्याचे बापूकडेच लक्ष होते की नाही हे बापूला कळले नाही.

परंतु तोपर्यंत पाटलानाहि हेड गुरुजींचा मुद्दा पटल्याचे दिसत होते. शाळेची आणि पर्यायाने गावची सुधारणा करायची तर मुलींच्या शिक्षणात लक्ष दिले पाहिजे होते. आणि तसे करायचे म्हणजे बाई शाळेत असणे फारच महत्त्वाचे होते. याचा सर्वांगीण विचार करून पाटील म्हणाले,

'खरं हाय, हेडगुर्जी! बाईची एक उणीवच हाय म्हनायची.'

'अहो मोठी उणीव आहे,' आपला मुद्दा पाटलाना पटल्यामुळे हेडसराना जास्तच चेव आला, 'त्याशिवाय पोरीस्नी चालना मिळायची न्हाई'...

'हां...'

'म्हणून म्हणतो बाईसाठी खटपट करा.'

'एकाच बाईचा प्रश्न हाय न्हवं! बाई दिली म्हणून समजा. आणि काय अडचन?' पाटलानी धीर देत विचारलं.

'मग काय न्हाई मागणं!'

'न्हाई न्हवं, मग पंधरा दिसात बाई आणून हजर करतो...

पाटलांच्या या आश्वासनाने हेडमास्तर अतिशयच खूष होऊन गेले. म्हणाले, 'शाळेचं नशीब उजाडलं म्हणायचं...'

बापू मास्तरला मात्र या निर्णयाचा अतिशय त्रास झाला. न राहवून त्याने विरोध करायला तोंड उघडले,

'अहो, पन बाई कशाला पाहिजे म्हंतो मी! आमी एवढे एकाला तीन शिकवायला हाय की... मुलीस्नी शिकायला काय कोन न्हाई म्हंतय व्हय... शिका की म्हनावं. चांगल्या एकेका वर्षात दोन दोन यत्ता शिका...'

बापू मनापासून एवढे बोलला आणि सर्वजण त्यावर टिंगलपूर्वक हसले. पाटील म्हणाले,

'बापसाव, उगा भुटाक् बोलू नंगा, तुमास्नी यातलं काई कळत न्हाई... माज्या-मते तर दोन बाया पायजेत...' यावेळी मात्र त्या तरुण दोन शिक्षकांचं लक्ष बापू मास्तरकडेच होते. एकाने लक्षपूर्वक तर पाहिलेच, पण दुसऱ्या टरक्याचे डोळेसुद्धा यावेळी, कसे कोण जाणे, एकत्र आले आणि त्यानेही बापूकडे पूर्णपणे पाहून घेतले. ☆☆

ग्रामविकासाच्या कार्याने पाटलाना कोणतीहि गोष्ट अवघड अशी वाटत नव्हती. त्याना आता दांडगा आत्मविश्वास आला होता. त्यांच्या अधिकाऱ्यांशी ओळखी झाल्या होत्या. आणि शिवाय एकाच बाईचा प्रश्न असल्यामुळे त्याना काम सहज होईल असे वाटत होते.

आली आली, निवडणूक आली (७)



निवडणूक जवळ आल्यामुळं जरा भाव वाढलेला दिसतोय.

दुसरे दिवशी उठून ते ए. ओ. ला भेटायला गेले. आणि काही करून आम्हाला बाई द्या, म्हणून हट्टच धरून बसले. इतक्या तडकाफडकी बाई कुठनं द्यायची अशी अडचण ए. ओ. नी पुढे केली, पण त्यांचे काहीहि न ऐकता पाटील म्हणाले,

'आमास्नी बाई द्या, एवढं पक्कं.'

'अहो कुठून देणार? बाई म्हणजे काय खडूची काडी आहे का, फळा पुसायचं फडकं आहे, उचलून द्याला!' ए. ओ.नी आपल्यामते विनोद करून शेजारी उभ्या असलेल्या पट्टेवाल्याला आज्ञाधारकपणे हसायला लावले.

'काय करायचं ते करा, पन बाई द्या.' पाटलानी आपला रामठेका सोडला नाही.

'अहो, आता हलवा–हलवी करावी लागणार...'

'हलवाहलवी करा न्हाई तर पाडापाडी करा. बाई द्या.'

पाटलांच्या असल्या बोलण्याने ए. ओ. चकितच झाले. आणि ही ब्याद पुन्हा येऊ नये म्हणून बाई देण्याचे त्यानी कबूल केले, आणि वर असेहि सांगितले की, काय मागण्या असतील त्या पत्राने करा. देईन, पण कृपया इथं येऊन असले बोलू नका.

पाटील ही बातमी घेऊन गावाकडे आले. बाई येणार असं कळून सगळ्या गावाला आनंद झाला. शाळेचे भाग्य उदयास आले असे सगळ्याना वाटले. पाटलानी शाबासकी मिळवली. ते दोन तरुण मास्तर तर फारच आनंदून गेले. ती बाई केव्हाहि येईल आपण आपले तयारीत असलेले बरे, म्हणून ते दोघेहि रोज दाढ्या करून, खळणीची कापडे घालून शाळेत येऊ लागले. त्यातला टरका तर आपण डोळ्यात कमी पडणार म्हणून तोंडात सुवासिक वेलदोडा ठेऊन येऊ लागला.

बापू मास्तर मात्र कष्टी झाला होता. 'ह्या बाईमुळं शाळेचं शाप वांगं वाजनार' असे तो ज्याला त्याला बोल-

वून दाखवीत होता. आणि एक दिवस बाई आली.

सकाळी नऊ–साडेनऊचा सुमार झाला होता. ऊन चढू लागले होते. रात्रभर निवलेले रस्ते तापू लागले होते. शहर-गावला, तालुक्याला जाणाऱ्या लोकांची गर्दी स्टॅंडवर झाली होती. पत्र्याच्या शेडमधे माणसे दाटीवाटीने बसली होती.

तेवढ्यात धुरळा उडवत, आवाज करीत एक मोटार स्टॅंडवर येऊन पोचली. दोन–पाच मिनिटे माशा उठाव्यात तशी माणसे उठली. नुसता गोंधळ झाला.

या गोंधळातून सुटका करून घेत बाई, बरोबर असलेला चार–पाच वर्षांचा मुलगा आणि एक म्हातारी बाई असे तिघे खाली उतरले. स्टॅंडवरून बाहेरच्या रस्त्याला लागले.

पदरानं कपाळावरचा घाम पुसत, वारा घेत आणि तोंडाने 'हुश्श' करीत त्या चौकशी करीत पाटलाच्या घरासमोर आल्या. . . पाटील गडबडीने उठून हेड मास्तराकडे गेले. आणि ते दोघे गडबडीने उठून बाईच्या व्यवस्थेला लागले. सुमारे तासाभरात त्या दोघानी बाईच्या घराची व्यवस्था लावली. सामान नेऊन लावले. काही 'हवं नको' असेल तेव्हा 'मध्यान्-रात्री'ला सुद्धा हाॅंका द्या असे दोघानीहि फिरून फिरून सांगितले. आणि तिथून जड पावलाने बाहेर पडले. बाहेर पडताना आपली पावले कां घुटमळली हे त्या सभ्य माणसाना मुळीच उमगले नाही.

बाई दिसायला तशी फार श्रेष्ठ दर्जाची नव्हती. काळी सावळीच होती पण तरतरीत आणि मुख्य म्हणजे रस-रशीत होती. बापू मास्तरसारखाच तिलाहि पांढ्या कपड्याचा सोस होता. खूप लोकाना असते आवड, त्यात काय झालं? सरळ नाक, उभा चेहेरा आणि कवडी-सारखे दोन्हीकडे निमुळते होत गेलेले डोळे, हे सारे डोक्यावरून पदर घेतला म्हणजे फारच मोहक आणि त्रासदायक देखील वाटत होते. बाई चापून चोपून लुगडं नेसायची. मागे चालताना मुद्दा कासोटयाची पट्टी ताठ असायची. त्याच्या बाजूला दोन रसरशीत पुठ्ठे डुलत असा-यचे. छाती भरदार होती. असतं एखा-द्याचं शरीर भरदार! बापू मास्तरचे नव्हते का? त्यात काय झालं?

ती म्हातारी बाई तिची मावशी होती. आणि तो मुलगा तिचाच मुलगा होता. म्हणजे तिचं लग्न झालं होतं. परंतु जगात येऊन पुन्हा मरण्याची पद्धत असल्यामुळे तिचा नवरा मेला होता. बाई बिचारी विधवा होती. पण तरी कपाळी कुंकवाचा टिळा लावत होती आणि पिढ्याना लुगड्याच्या आतून चिलपा लावत होती. असतात एकेक बायका सुधारक. त्यात काय झाले. आता तर बायकांचं राज्य आहे. एका पंतप्रधान असलेल्या बाईच्या राज्यात एवढी सुधा-रणा झाली तर त्यात एवढे बोंब मारण्या-सारखे काय आहे? त्यामुळे बाई नम्र आणि थोर कुळातील नाही, असे तर नाही होत? छे: छे: जसे बिलकुल होत नाही. तसे असायचे काय कारण? शिवाय तिची म्हातारी मावशी होती आणि चार वर्षांचा मुलगाहि होता.

गावकऱ्यांचेहि अगदी असेच मत पडले. बाई थोर कुळातील आणि शीलवान आहे असाच त्यानी निर्वाळा दिला. . .

कुणाच्या तरी सुदैवाने आणि कुणाच्या तरी दुर्दैवाने बापू मास्तरच्याच लगतच्या वर्गावर बाईची नेमणूक झाली. दोन वर्गाच्या मधली दाराची चौकट पहिल्यापासूनच सताड उघडी ठेवण्याची प्रथा होती. मुलाना गणितं घालून कधी कंटाळा आला तर दोन्ही वर्गाचे मास्तर चौकटीशी उभे राहून गप्पा मारीत असत. कंटाळा घालवत असत.

बापू मास्तरला बसल्या जागेवरून बाईची हालचाल दिसत असे. मुलाना गणितं घालून टाकाच्या उलट्या बाजूने कान टोकरत त्याची नजर सहज समोर जात असे, तो बाई आपला त्रासदायक भाग हलवत वर्गात येरझारा घालत असायची. बापू मास्तर गपकन् डोळं मिटून घेत होता. असे करायला त्याला थोडे कष्ट पडत होते. पण संयमाने तो हे करीत होता. एकदोन वेळा मधले दार लावून घ्यायचाहि विचार त्याच्या मनात आला. पण नंतर वाटले, तसे करणे म्हणजे आपल्याच मनात काही आले म्हणून दार लावले, असे दाख-वण्यासारखेच होते. दुसऱ्याला तसा विचार करण्याची कशाला संधी द्या. त्यापेक्षा दार उघडे राहिलेलेच बरे.

कधी न बोलणारा टरका मास्तर दोनचार वेळा बापू मास्तरशी बोलायला आला. पण आपण बापू मास्तरशी बोलायला आलो आहोत हे विसरून, तो टेबलाशी उभं राहून, दोन्ही डोळे एकत्र आणण्याचा आटोकाट प्रयत्न करून पलिकडच्या बाईची हालचाल बघत राही, हे वेगळे. बापूच्या पहिलवानी डोक्यात हा प्रकार शिरायला जरा वेळ लागला. पण थोड्या उशिरा का होईना त्याला जेव्हा हे कळले, तेव्हा त्याने हेडमास्तरना सांगून त्याचे येणे बंद केले.

शिवाय कायमचा आंधळा करण्याचा त्याला दमहि दिला.

असे काही दिवस गेले.

वापू मास्तर मुलाना गणितं घालत होता. आणि कान टोकरत खुर्चीत वसून राहात होता. कान टोकरता टोकरता एक लय येऊन कधी तो बाईकडे थेट नजर देऊन वघत राही तर कधी डोळे मिटून एखादी झोपहि काढीत असे. परंतु शाळेत झोपणे वरे नव्हे हे लक्षात आल्यामुळं, डोळे उघडे ठेऊन तो समोर वघत राहणेच जास्त पसंत करीत असे. त्याची आणि बाईची अजून ओळख झाली नव्हती. पहिल्या दिवशी हेड-गुरुजीनी सर्वांशी ओळख करुन दिली होती, पण त्या दिवशी बाई घेतल्याचा निषेध म्हणून वापू मास्तर शाळेत आला नव्हता. रजेवर होता. त्यामुळे ओळख राहिली होती. येता जाता कधीतरी ती त्याच्याकडे वघून हसली होती. एकदा त्याला वाटले होते, काय झाले हसले म्हणून. एकत्र काम करणाऱ्यानी असे हसत खेळतच काम केले पाहिजे. पण नंतर त्याला असेहि वाटले होते की, ती हसली हे ठीक. आपण तसे हसणे वरं नव्हं. म्हणून त्याने आपला चेहरा कपाळावरच्या टोपीच्या रेघेसारखा ताठ ठेवला होता.

आणि आज तिने वापू मास्तरला चक्क हाक मारली,

'गुरुजीऽऽ !'

दुपारी वाराचा टाईम होता. पहिला तास संपून दुसरा चालू झाला होता. वापू मास्तरनं मुलाना तीन मोठी काळ-काम-वेगाची गणितं घातली होती. आणि खुर्चीत वसून कान टोकरत त्याने तंद्री लावली होती. तिने हाक मारलेलीसुद्धा त्याला ऐकू आली नाही. एका कानात टाक होता म्हणून, व दुसरा कान टोकरल्या जाणाऱ्या कानाचे सुख चोरुन घेत होता म्हणूनहि.

वाईने दुसरी हाक मारली,

'अहो गुर्जी—!'

ती हाक ऐकून तो प्रथम चांगलाच हडवडला. पण नंतर त्याने स्वतःला सावरले. काय झाले हाक मारली तर ? एखाद्या तरुण आणि पुष्ट वाईने हाक मारली तर त्यात एवढे कशाला घावरायला हवं ? मारली असेल तिने हाक—असेल काही काम— एखादे गणित अडण्याचीहि शक्यता होती. तिने एवढे अगत्याने हाक मारायची आणि आपण जागचे उठायचेसुद्धा नाही, याला काय माणुसकी म्हणतात ? ही काय रीत झाली ? चार गोड शब्द वोलायला काही खर्च येतो का? आणि आपल्याशी तरी यापूर्वी असे साळुंखीच्या आवाजात कोण वोलले होते ? असा चौफेर विचार करून वापू मास्तर त्या नम्रपणे हाका मारणाऱ्या वाईच्या हाकेला 'ओ' देण्याच्या तयारीने उठला. टाक तसाच हातात घेऊन पोराच्या दोन रांगेतून चालत तो दाराच्या चौकटीशी गेला. मुले गणितं सोडवण्यात अपरंपार गुंग झाली होती. मास्तर शेजारून जाताना सगळयांच्या माना खाली होत्या. मास्तर चौकटीशी जाऊन उभं राहिलं, त्यांची वर्गाकडे पाठ झाली, आणि चाळीसच्या चाळीस तोंडं त्याच्या पाठीकडं झाली.

'वापू मास्तर——'

'पवार वाई...'

अशा परस्परांच्या ओळखी दाराच्या चौकटीत झाल्या. हवा-पाण्याच्या गोष्टी झाल्या..... घरच्या माणसांच्या चौकशी झाल्या... नोकरी किती वर्ष झाली, हे सुद्धा विचारून झाले. ओळख करून घेण्यासाठी गाढवासारखं जे वोलायला लागते ते सगळं वोलून झालं. पहिली मिटिंग संपली.

☆☆

मग निकराची कामे वाढली आणि मिटिंगाहि वाढल्या. मुलाना एकदम सात-सात गणितं घालून सभासद दाराच्या चौकटीत तास तास उभं राहू लागलं. खांद्यावरचा पदर डोकीवर आणि डोकीवरचा खांद्यावर असे करीत पवार वाई कळवळून वोलत असे. वापू मास्तर हातातला टाक दुसऱ्या हाताच्या जुळवलेल्या वोटांच्या नखावर आपटत ते तळमळीने ऐकत असे. अशातच शाळा सुटल्याच्या घंटा ऐकू येऊ लागल्या. एकदा तर नादात शाळा सुटली असे वाटून वापू मास्तर मधल्या सुट्टीतच घरी जाऊन झोपले. शाळेच्या गड्याकडून त्याला खरा प्रकार कळला होता, व पुन्हा पाच वाजेपर्यंत शाळेत येऊन शिकवावे लागले होते. हेडगुरुजीनी 'आज असं कां झालं ?' हे विचारल्यावर 'वाईच डोस्क चढल्यागत झालं. घरला जाऊन पडलो.' असं त्यानं सांगितलं होतं.

त्या दिवशी एक डोकं चढलं असल, पण नंतर मात्र वापू मास्तराचं डोकंच फिरलं. एक खूळ लागलेलं माणूस करतं तसं वापू करायला लागला. तो पार धारलाच लागला. पवार वाईनी त्याला आपल्या आरसाट्यातच घेतला.

उद्योगधंदा, तालीम सोडून फावल्या-वेळात तो पवारवाईच्या घरावरून साय-



## शिंपले

पागोळी पागोळी
ठीकली पाणोळी
थेंबात थेंबात
धार ओठंगली—

अटाकी तटाकी
पाण्याची झालर
झालरीची कोर
वाळूत रोपली—

फेनोल फेनोल
पाणीयाचे कण
वाळूत गोठून
शिंपली गुंतले—

अंवती भवती
शिंपले शिंपले
लाटांच्या कुशीत
हिंदोळून थांबले—

थांबता थांबता
कलंडून वेंधले
आरास वेल्हाळ
रांगोळून गेले.

—भास्कर उत्तरवार






कलवर वसून फेऱ्या घालू लागला. दौतीच्या वुचागत मान फी–फिरवून तो तिच्या घरात येताजाता वघू लागला. तीहि त्याच्या टायमावर दारातच काही काम घेऊन वसू लागली. डोईवरचा पदर खांद्यावर आणि पुष्कळ वेळा उकडण्याचे निमित्त करून खांद्यावरचा पदर हातावर सुद्धा ती घेऊ लागली. त्याचवेळी वापू चेन पड-ल्याचं निमित्त करून, रस्त्यावर खाली बसून सायकलच्या चाकातून तिला तशा अवस्थेत पाहून घेऊ लागला. पवारवाई पदराने वारा घेत सायकलाचा शोध लावणाऱ्याला मनातून दुवा देत राही. आणि इकडे न पडलेली चेन हातात धरून वापू 'रानात सांग कानात' हे गाणे आपल्या गांवढळ आवाजात मोठमोठ्याने म्हणत राही....

पवारवाईच्या धुण्याच्या वेळी वापू-चीहि कपडे धुण्याची वेळ ठरून गेली. पुष्कळवेळा नदीकाठी हे दोघंच धुणं चुवकत राहात. अशावेळी स्वच्छतेच्या शुद्ध हेतूने वापू लंगोट लाऊन उघडयाने आंघोळसुद्धा करीत असे. अशी आंघोळ करीत असताना वरच्या वाजूने वाहात येऊन एखादी वस्तू त्याच्या पायाशी शेवाळ्यागत लगटून तरंगत राही. ती हातात धरून तो सहज ओरडल्या-सारखे ओरडे,

'होऽ होऽऽ हैंऽऽऽ धुनं धुनार...!'

एवढी हाक मारल्यावर ओ द्यायला नको का, म्हणून पवारवाई सुद्धा विचारीत असे,

'का हो ऽ आंघुळी करनार—!'

'अहो, ह्ये काय सोडलंय् आमच्या पायात. . . '

'अग वया, चोळी, अवो, धरा धरा... चोळी जाईल माजी...'

'तुमची चोळी न् आमी कोन वो धर-नार !'

'अवं धरा म्हंते ना मी...'

'धरतो पन आमच्याच पायात कां वरं यावी ही !'

'आवडलं असतील पाय तिला...'

'आरं तिच्या मायला ह्या चोळीच्या...'

असे मोजकेच वोलणे होत असे. पण त्याचवेळी वापूनं वुडी मारून नोडून दिलेला लंगोट तिच्या पायात तरंगत राहिलेला असे...

दुधाखेरीज दुसरे काही न घेणारा वापू मास्तर आता तिच्या हातचा गुळाचा चहा फुर्र फुर्र करून घेऊ लागला. एवढेच नव्हे तर आत्तापर्यंत आपण ह्या पेयाला कां तोंड दिले नाही याचे त्याला दुःख वाटू लागले. कित्येकवेळा रात्री तर तो त्या विधवा आणि आपद्ग्रस्त पवारवाईला गावावाहेर चांदण्यात सायकल शिकवू लागला. . .पवारवाई वर वसलेली असा-यची आणि एवढा मोठा गडी मडगार्डाला धरून मागून पळत असे. तोही तालीम सुटली आहे तर एवढा व्यायाम नको का, म्हणून प्रामाणिकपणे पळत राही. अशावेळी पुष्कळवेळा वाई सायकलवरून पडत असे. पडणारच की वाई माणूस ! मग संकटात पडलेल्याना जवळ घेतात तसे तिला त्याला जवळ घेण्यावांचून गत्यंतर राहात नसे.

या सगळ्या वांदलीत वापू मास्तरचा एकादच तोल गेला...एकदा वर्गात तीन मोठी गणितं घालून वापू समोरच्या दाराच्या चौकटीपाशी गेला. तो जात असताना मधेच एक पोरगं उठून म्हणालं,

'गुर्जी, ही गणितं पर्वा झाल्याली हायेत.'

वापूने हा तरी अपशकून समजायचा की नाही. पण तो त्याच्यावर ओरडला, 'वव्या लेका, आगावपना करू नको. अभ्यास कराय नको... सोडीव ती गणितं...हात औट करीन लेका...'

असे म्हणून तो चौकटीशी आला. पवार वाई आधीच रिझर्वेशन करून आल्या-सारखी येऊन उभी होती. दोघं वाहूळ वोलत उभी राहिली. मायंदाळ वोलली. आणि केव्हातरी भान न राहून वापू मास्तरनं लाडात येऊन सहज पवार वाईचा गालगुच्चा घेतला. काय करतो आहोत हे दोघानाहि कळले नाही. कळले तेव्हा त्याना असे दिसले की, झालेली गणिते सोडवण्यात काय मजा आहे असे वाटून वर्गातील चाळीसच्या चाळीस पोरे उलटी फिरून चौकटीकडेच तोंड करून वसली होती. आणि गाल-गुच्चा घेताक्षणीच 'हुर्योऽऽ – हाऽऽऽ' असे ओरडली होती.

एवढे मोडले तर वापू मास्तर संयमाने वागला होता. पण गावात मात्र वापूमास्त-रने पवार वाईच भर वर्गात मुका घेतला असं उठलं... टरका मास्तर ज्याला त्याला सांगू लागला,

'अवो, म्या डोळ्यानं वघितलं...'

'काय वघटलंस रं, हे कन्या ?'

'अवो, ही अशी दारात दोघं उभी. भुज्याला भुजा लाऊन. आन् हा असा त्यानं मुका घेतला वगा...' आणि टरका शेजार-च्याचा मुका घेऊन दाखवत असे. गावात ठिकठिकाणी त्याला ही वातमी द्यावी लागत असल्यामुळे त्या दिवशी त्याला पन्नाससाठ तरी मुके घ्यावेच लागले. तशातहि पुष्कळाना ती गोष्ट न आवडून त्यानी त्याला चार टोले मारले होते. तेहि खाऊन तो पुन्हा मुके घेतच होता...

नाही म्हटले तरी त्याच्या या चर्चेनं आणि प्रात्यक्षिकानं वातमी चौफेर झाली.

गावातील मोजक्याच प्रतिष्ठित अस-लेल्या माणसास्नी त्याचा अपरंपार राग




अग प, सांभाळ तो लूप आहे.

आला. त्यानी येऊन हेडमास्तरांचा काष्टाच धरला.

'काय हो हेडगुर्जी, तुमी काय डोळं झाकूनच बसला व्हय ?'

'आमच्या पोरास्नी मुकं घ्यायला शिकवायला ठेवलं काय हो– तुम्हास्नी...?'

'दोन थटाल्या लावून द्याच्या न्हाईत का त्या बाप्याच्या..'

'थोत् त्याच्या मायला ह्यो बाप्याच्या हो !'

'च्या की वो पीत न्हवता हा बाप्या.'

'अहो, खाल मुंड्या न् पाताळ धुंड्या ठरला की वो !'

'पाताळच धुंडलं बगा त्येनं...'

'बोला की हो, हेडगुर्जी ।'

हेडगुरुजी चुकी कबूल करायच्या आवाजात, पण नरमाईने म्हणाले,

'त्ये जरा वांडच हायेत..'

काय बोलता हो हेडगुरूर्जी, तीस तीस वयापर्यंत वांडपना राहतो व्हय ?—'

'त्वांड सडकलं की वांड भायर येतंय् बगा...'

'घोळसा की रं सगळयानी मिळून त्याला...आंग ठणकणस्तवर मारा...'

'तुमची कायतरी चुकीची म्हाइती हाय..' हेडसरानी बोलण्याचा प्रयत्न केला.

'त्यो तिकडं पटापट मुकं घ्याय् लागलाय् आन् आमचीच चुकी काढता व्हय?'

'आन् त्या हुबालीला काय लाज हुती का न्हाई...'

'अवो चांगली सवत्स घेनू हाय की...!'

'एका लेकराची आई अशी गावाला मुकं देती आन् तुमी गप न्हाता व्हय...काय हो !'

हेडगुरुजीना सगळयानी नुसते उलथेपालथे केले. त्यानी सर्वांचे पाय धरले. आणि बाप्याला या गोष्टीची शिक्षा देण्याचे वचन दिले. मंडळींची समजूत काढली. आणि आता जास्त चर्चा करून गावची अब्रू न घालवण्याची विनंति केली. माणसे निघून गेली.

दुसरे दिवशी हेडगुरुजीनी बापूला चांगला तासला. रागारागाने ते त्याला 'अरे तुरे' सुद्धा म्हणाले,

'बाप्या, तुझ्यापायी मी शिव्या खाल्या. गाढव, ह्यो पालथा धंदा कुणी सांगितला मला...? तुझी नेमणूक कॅन्शलच करतो. बस बोंबलत... न्हाइतर बदली करतो..."

बापू गडबडला. मान खाली घालून तो म्हणाला, 'आता मी काय केलं ?'

हेडगुरुजी तांबडेलाल होऊन ओरडले,

'गप. थोबाड फोडीन बघ. बाईचं मुकं घेतोस आनि ह्येवर बोलतोस ?'

'मी कवा मुका घेतला ?'

'मग लोक काय म्हनत्यात ?'

'आता मला का ठाऊक ?'

'खरं सांग...'

मग बापू लाजला आणि म्हणाला,

'मी निस्ता तिचा गालगुच्चा घेतला..'

'मग लाज वाटली न्हाई, भडव्या ? पोरांच्या देखत बाईचा गालगुच्चा घेतोस ते ?' हेडगुरुजीनी रागानी पुढे होऊन बापूचा दातओठ खाऊन गालगुच्चा घेतला. बाप्या कळवळला,

'अगयायाया–अवं गाल गाल माजा..'

'जा, गावातल्या समद्याना भेट. म्हणावं चुकलं–संभाळून घ्या. पुन्ना असं होणार न्हाई... काय ?'

'व्हय जातो...'

बापू मास्तराने गावाची क्षमा मागितली. तो गरिबीनं बोलला, तेव्हा गावानंहि त्याला क्षमा केली. त्याच्या शब्दावर लोकानी विश्वास ठेवला. बापू काही असा हलकट माणूस नव्हता. जन्मापासून त्याने काही कुणाचे मुके घेतले नाहीत. उलट तो लहानपणी सगळयाना मुके देत असे. त्याच्या हातून हे चुकीने झाले. तो सुधारेल म्हणून लोकानी त्याला क्षमा केली...

हेडगुरुजीनी पवार बाईला दुसऱ्या वर्गावर लावली. आणि तिच्या जागेवर त्या टरक्या मास्तरला नेमले. आता बापूला कान टोकरताना तो हेकणा मास्तर हसताना दिसतो. आणि त्याच्या पोटात उचमाळून येतं...

बरेच महिने असे गेले.

बापू एकाएकी खंगल्यासारखा दिसू लागला. त्याची छाती, गर्दन पार उतरली. गाल आत गेले. तोंड निस्तेज दिसू लागले. बापू मास्तर चांगलाच वाळला. पण नोकरीच्या भीतीने तो पवार बाईला काही भेटला नाही.

हेडगुरुजींची त्याच्यावर नजर होतीच. त्यांच्या लक्षात हा फरक आला. एक चांगला गडी असा चोपल्यासारखा दिसू लागला म्हणून त्याना वाईटहि वाटले. कदाचित् तो तिला चोरूनहि भेटत असंल. खरे कळावे म्हणून त्यानी एक दिवस बापूला विचारले,

'बापू मास्तर, काय आजारी हात् काय?'

'न्हाई बा.' बापूनं मान हलवली.

'मग एवढं खराब कशानं झाला ?'

या प्रश्नाला त्याने उत्तर दिलं नाही. बापूचा खांदा घुसळून हेडमास्तरानी कर्कश आवाजात त्याला विचारलं,

'बाईला चोरून भेटतोस काय ?'

बापू शरमेने लालबुंद झाला. मान हलवून तो म्हणाला,

'छया: छया: !'

मग हेडसर विचारात पडले.

'कुणी भूतबाधा केली काय ?'

'न्हाई–'

'मग गडचा, तुला झालं काय ?'

'सांगू ?'

सांग.'

'सांग.'

'डोस्कं तापिवणार न्हाई !'

'न्हाई...'

मग बापू गंभीर झाला आणि हळू आवाजात म्हणाला, 'पवारबाईसाठी मी झुरनीला लागलोय्...माजा तिच्यावर लई जीव हाय...मला काय आन्–झोप सुचत न्हाई बगा...'

'बर मग ?'

'तुमी तर तिला भेटायची बंदी केलीया...'

'व्हय.'

'त्येनंच मी खंगलो बगा मी. करमत न्हाई. सारकं रगात तापतं तिला बघटलं की...'

'म्हणून खराब झाला. व्हय ?'

'व्हय...!' बापूच्या डोळ्यात आता अगदी पाणी आले. तो रडकुंडीला येऊन म्हणाला, 'मास्तर, मी गाव सोडू का ? मला आता हितं न्हावत न्हाई...'

बापूचे बोलणे ऐकून हेडगुरुजीना फार वाईट वाटले. ते काही वेळ बोलले नाहीत. त्यानी बापूकडं बघत थोडावेळ विचार केला. मग एकाएकी त्याच्या पाठीवर थाप मारून ते म्हणाले,

'शाबास ! खरा जीव दिलास बाईला ! हे बग, बेशक तिला भेटत जा. मुकं घे, काय वाटूल ते कर. हान गाडी. हूं जाऊ दे च्या मायला. मी बगतो काय होतंय त्ये..'

'खरं,?'

'अगदी खरं, हान गाडी..'

हेडगुरुजींच्या या बोलण्याने बापूला अपरंपार आनंद झाला. त्याची कळी खुलली. आणि आनंदाच्या भरात पुढे होऊन त्यानी हेडगुरुजींचा गालगुच्चाच घेतला ! ● ●

अनुक्रमणिका






# आपल्या कुटुंबियाच्या आरोग्यास व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें अत्यावश्यक आहेत.

*तीं त्यांना भरपूर प्रमाणांत मिळतात काय ?*




## नवीन ! व्हिमग्रॅन्®

### मल्टिपल व्हिटॅमिन्स-मिनरल्स टॅब्लेट्स

व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांच्या अभावामुळे आपल्या कुटुंबियांचे स्वास्थ्य बिघडण्याची शक्यता असते आवश्यक ती व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांच्या अभावामुळे थकल्यासारखें वाटणे. सर्दी होणे. भूक न लागणे. अशक्तपणा, त्वचेचे आणि दांताचे विकार उद्भवणे यांसारख्या तक्रारी सुरू होतात.

अतिशय दक्षतेनें तयार केलेल्या भोजनांत देखील व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यांच्या बाबतींत दुर्लक्ष होण्याचा संभव असतो. अगदीं सत्वयुक्त समजला जाणारा आहार देखील समतोल असतोच असें नाहीं. आपल्या नेहमींच्या आहारांत व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें यांची कमतरता असण्याची शक्यता असते. अशा स्थितीत आपल्या कुटुंबियांच्या स्वास्थ्यास अत्यावश्यक असलेली सर्व व्हिटॅमिन्स आणि खनिजद्रव्यें योग्य प्रमाणांत मिळतात कीं नाहीं याची खात्री कशी करायची ?

आपल्या कुटुंबांतील प्रत्येकास त्याच्या आरोग्यास उपयुक्त अशी पौष्टिक सत्वें योग्य त्या प्रमाणांत मिळावी असे आपणास वाटत असेल तर व्हिमग्रॅन्-स्क्विब मल्टिपल व्हिटॅमिन्स मिनरल्स टॅब्लेटस रोज एक ह्या प्रमाणात देण्यास सुरुवात करा. अशा निरोगी सवयीचा शुभारंभ आजपासूनच कां करीत नाहीं ?

व्हिमग्रॅन्मध्यें महत्वपूर्ण अशी अकरा व्हिटॅमिन्स आणि आठ खनिजद्रव्यें यांचा सुयोग्य प्रमाणात अंतर्भाव करण्यात आला आहे. लाल रक्तपेशींची वाढ आणि खर्च झालेली शक्ति भरून येण्यास आवश्यक असलेले लोह, हाडें नि दांत ह्यांच्या मजबुतीसाठीं कॅल्शियम्, सर्दीला प्रतिरोध करण्यासाठीं व्हिटॅमिन् सी. भूक उत्तेजित करण्यासाठीं आणि उत्साहवर्धनासाठी व्हिटॅमिन् बी१२, यांसेरोज आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यास उपयुक्त असलेली अनेक महत्वपूर्ण पौष्टिक द्रव्ये व्हिमग्रॅन्मध्यें आहेत.

व्हिमग्रॅन्च्या एका टॅब्लेटला फक्त तेरा पैसे पडतात. आपल्या कुटुंबियांच्या आरोग्यरक्षणाच्या दृष्टीने ही किंमत अत्यल्पच आहे. आजच व्हिमग्रॅन् खरेदी करा—रोज व्हिमग्रॅन् घेत चला.

# व्हिमग्रॅन्®

**रोज व्हिमग्रॅन्ची एक टॅब्लेट म्हणजेच निरोगी स्वास्थ्य**

® SQUIBB® SARABHAI CHEMICALS

® हा ई. आर. स्क्विब ॲण्ड सन्स इन्कॉर्पोरेटेड यांचा रजिस्टर्ड ट्रेडमार्क आहे व तो साराभाई केमिकल्स प्रायव्हेट लि. यांना वापरण्याचे लायसन्स आहे.

Shilpi-SC-256-Mar









अनुक्रमणिका

# ब्लॉक नावाचं घोडं

*....आणि काय रघ्याचं नशीव ! खरं म्हणजे भयंकर ! पण शुद्धीवर असेल तर कळणार ना ? तो शुद्धीवर नव्हता म्हणूनच चक्क यानं हॅंड रमी मारली. दो क्लीयर सिक्वेन्स, दोन ट्रिओ ! विशेष म्हणजे जोकराशिवाय. असं भाग्य लाखात एखाद्यालाच असतं....!*

–श्रीराम कामत



वारकऱ्याना जे महत्त्व पंढरीचं, तेच सचिवालयातील कारकुनाना वान्द्र्याच्या गव्हर्नमेन्ट कॉलिनीचं ! त्यांच्या जीवनाला काही अर्थ असलाच, तर तिकडे कॉलिनीच्या ब्लॉकात जाऊन पडल्यावर लक्सच्या फेसासारखा एकदम फसाफसा येऊ लागतो. वान्द्र्याच्या ह्या वारकऱ्यांच्या आयुष्यात सोन्याचा दिवस तो की, ज्या दिवशी एक दिवसाची किरकोळ रजा मंजूर करून घेऊन, ट्रकवर किंवा हातगाडीवरही, आपला तुटपुंजा संसार उघड्यावर टाकून सीझरच्या विजयी चेहऱ्यानं सहकुटुंब, सहपरिवार (बहुधा हा नसतोच) ते कॉलिनीत प्रवेश करतात. (येथेसुद्धा 'फॅमिली' या शब्दाची व्याख्या करून कारकुनाचा लवाजमा गव्हर्नरसाहेबांच्या परिवाराहून अधिक रहाणार नाही याची सरकारनं खबरदारी घेतलेली आहे.)

उभ्या हयातीत असा प्रसंग एकदाच किंवा एखादाच येतो ! आणि तोसुद्धा सगळयाच कारकुनांच्या ललाटात असेलच असं नाही !

तसं म्हटलं तर कारकुनाच्या तपश्चर्येचं हे फळ. त्यानिमित्त तशीच साधना अभिप्रेत असते. सुरुवातीची काही वर्षं तर स्वतःचा कारकुनी पेशाही विसरून [illegible]सारखं फायलीत मान आणि मन मोडून टायमा बाहेर काम करावं लागतं. ही गोष्ट अधिकाऱ्यांच्या अधू नजरेत ठासून भरण्यासाठी नाना खटपटी अन् लटपटी कराव्या







अनुक्रमणिका

लागतात. एकाच आशेनं की, कधीकाळी जाहीर होणाऱ्या तात्पुरत्या कायम नोकरांच्या यादीत कदाचित् आपला नंबर वगैरे, लागून जाईल ! एकदा हा नंबर लागला की, पुढं मग लाईन बिल्कुल सरळ ! गाडी बेशक हाणावी. लग्न झालेलं नसल्यास डोळे झाकून जमेल त्या कार्टीला पदरात घ्यावं– नाही, तिच्याच पदरात पडावं. म्हणजे पदरासाठी पातळ नेसण्याची नामुष्की तरी कारकुनावर यायला नको !

पण लग्नाच्या ह्या भानगडीत निदान एक वरचं टाळकं मात्र ठिकाणावर ठेवावं लागतं. नाही, म्हणजे होतं काय नेमकं तेच सालं दगा देतं. पार डाल्डा– म्हणजे तसं वितळतं. आणि मग बोंब– गोंधळ! वांन्द्र्याच्या सरकारी कॉलिनीत, हॉल, बेडरूम, किचन वगैरे सर्व सुखसोईंनी युक्त अशा ब्लॉकात मधुचंद्र साजरा करण्याचे मनसुबे कोळचाच्या चाळीत एका काळोख्या खोलीत वऱ्हाडी मंडळीच्या गारदी गर्दीत घामाघूम होऊन धुळीला मिळतात. विवाहाची पहिली रात्र नवरदेवाच्या संगमोत्सुक देहाला लग्नवरातील त्या गलबलाटात 'अजून ब्लॉक तो मिळेना हन्त !' म्हणून उसासे टाकीत काढावी लागते. मनस्तापाच्या गर्तेत तसं वळवळताना कारकुनाला राहून राहून वाटत असतं – उठावं. कुठं पडला असेल तिथं जाऊन ह्या सासऱ्याला गाठावं. आणि सांगावं, "चाहिये तो हे हुंड्याचे दोन हजार वापस घ्या ! पण आधी—

**अशी मशिनगन द्या मज आणुनि**
**वायबार जो नुसता काढुनि**
**अधिकाऱ्यांचं पळविल पाणी**
**टाकिल शासन पार सुधारुनि**
**मिळेल मज मग ब्लॉक कॉलिनी....**"

तर सचिवालयातील कारकुनाचासुद्धा बुद्धिभेद होण्यासारखा हा एकच प्रसंग ! लग्न. येथे त्याची खरी परीक्षा होते. कॅरट ठरतं. चुकीचं प्रायश्चित्त म्हणून सजीवपणी सासऱ्याच्या घरी मरणभोग प्राप्त होतात. लग्न हे कारकुनाच्या आयुष्यात फक्त साधन असू शकतं. साध्य अर्थात वांद्रा, गव्हर्नमेंट हौसिंग कॉलिनी, ब्लॉक नंबर सो अॅन्ड सो... आणि हे वचन काळीज गोठवून ज्यानं कोरून ठेवलं आहे त्याला स्वर्गातून प्रत्यक्ष मेनका खाली उतरली तरी भ्रष्ट करू शकणार नाही. थंडपणं पनामाचा धूर तिच्या तोंडावर सोडीत हा म्हणेल, "मॅडम, आपण सुंदर आहात. पण माफ करा, वांन्द्र्याचा ब्लॉक अधिक सुंदर आहे."

अशा विशिष्टवर्ग वाबूगटात पहिला होऊन राहिलेला (कारण यासम अन्य आमच्या पहाण्यात कोणी नाही) एक महापुरुष अर्थ-खात्याच्या अनेक उपविभागापैकी एकात कनिष्ठ सहाय्यक म्हणून तूर्तास मौजूद असून 'आर. आर.' नामे उभ्या सचिवालयात मशहूर ~~सध्ये~~ संपूर्ण नाव रघू रावजी (हे तीर्थरूप. आदरार्थी उपाधी नव्हे) राजाध्यक्ष. सावन्तवाडीकडल्या शेणव्याचं रक्त अन् पाणी–असं हे मिश्रण. म्हणून हा काटकोळा, काळगेला. उंचीला वेतासबात. आव ~~खूब~~ ताडमाड असल्याचा. बोलणंसुद्धा तसंच, अव्वाच्या सव्वा. रघूला विडीकाडीचंसुद्धा व्यसन नव्हतं. तरी ओठ काळेकुट्ट, दात पिवळेजर्द. त्याला ठाऊक होती एक औषधाची बाटली. दुधाची सुद्धा नाही. तरीही डोळे झिंगलेले, लाल. कोणा च लन चलन भावाकडे, खोलीत बाकी कुठं जागा नव्हती म्हणून त्यांच्या पलंगाखाली हा झोपत होता. बाहेर उडप्याकडे राइसप्लेटमध्ये पडेल तो पदार्थ पचवून दिवस काढीत होता.

तर असा हा रघू राजाध्यक्ष बिल्कुल चालू. म्हणाल ते चालवून घेणारा. शंभरदा मुलाखत होऊनही ह्याला कधी पाहिल्याचं कोणाच्या लक्षात रहात नसे.

सहा महिन्यापूर्वी तात्पुरत्या कायम झालेल्या 'क. कां.'च्या यादीत रघ्याचा नंबर लागला आणि या 'तात्पुरत्या कायमी'चा ह्याच्या डोक्यावर असा काही विलक्षण परिणाम झाला म्हणता, खात्यानच नव्हे अख्ख्या सचिवालयात लोकं त्याचं नाव घेऊ लागले. म्हणजे माणूस असा उलट्या खोपडीचा असेल असं कोणाला वाटलंसुद्धा नव्हतं. शंभरातील नव्याण्णव कारकुनांना सर्रास गाढव ठरवून लग्नाऐवजी हा दीडशहाणा वांन्द्र्याच्या ब्लॉकच्या मागं लागला होता.

आता गरजू वधूपित्यांना रघू राजाध्यक्ष कन्फर्म झाल्याचा वास लागला हे स्वाभाविक होतं. हे कुठूनकुठून सचिवालयाचे चार जिने चढून (लिफ्टची वाट बघण्याइतकाही याना धीर नसे) धापा टाकीत खूप आशेनं त्याच्या टेबलावर येऊन आदळत. फोटो, पत्रिका, ओळखदेख, शिफारशी वगैरे तयारी जय्यत. उरावरच्या धोंडीवर अक्षता टाकून एकदा पावन व्हायची म्हाताऱ्यांना कोण घाई ! दुसऱ्या मजल्यावरील 'सेल्फ सर्व्हिस' कॅन्टीनमध्ये ह्यांना कपभर कळकट चहा पाजून रघू वाटाण्याच्या अक्षता लावी.

त्याचा जाब ठरलेला होता, "फर्स्ट जागा, वांन्द्र्याचा ब्लॉक. पिछे शादी —"

तर हे म्हातारेसुद्धा त्याची समजूत काढण्याचा प्रयत्न करीत, "अहो, लग्न केलत की ब्लॉक मिळतोच आहे. आधी कसा मिळेल ? कारण ते विवाहितांसाठी आहेत."

"गॅरन्टी काय ? आमची निकड हापिसला पटेपर्यंत पेन्शनीत यायचो आम्ही. तोवर तपश्चर्या करायचो इकडे आम्ही नंबरासाठी. माहेरी तुमच्या मुलीनं 'जवळी न पति माझा नाही' म्हणून. हः हाः.."

"मग पेन्शनीत आल्यावर लग्न करणार ? आं !" एखादा खवचट म्हातारा विचारायचा.

त्याच स्वरात रघू जाब द्यायचा, "तोवर थांबत असाल तर करू विचार. ओन्ली थर्टी यिअर्स मोअर! हः हाः..."

पण बहुतेक म्हातारे त्याला लोटांगण घालीत म्हणत, "छे : ! राजाध्यक्ष असं कसं होईल ?"

अशासाठी त्याच्याकडे रामबाण इलाज होता. तो चक्क हमरी-तुमरीवर यायचा, "गव्हर्नमेन्टचे रूल्स अॅन्ड रेग्युलेशन्स आमच्या बापानं तयार केलेले नाहीत. म्हणून हे असं होतं. हः हा : ! तुम्हा म्हाताऱ्याला जावई फक्त सचिवालयातलाच हवाय् ! पण त्याचे हे

टिकलिश प्राब्लेम्स (या शब्दांवर जादा जोर) समजण्याची अक्कल तुम्हाला नसते. आणि गरजसुद्धा हाः हाः हीः ....”

रघ्याचं संपूर्ण वक्तव्य ऐकायलाही मग कोणी थांवत नसत. अर्ध्यावरच त्याची रजा घेत, “बराय् राजाध्यक्ष !”

एखादा मात्र चांगलाच खट भेटे. रघ्याचा पुरा दम निघेपर्यंत हा दवा धरून रहायचा. त्याची रेकॉर्ड थांवली की, मग तोंड उघडायचा. आवाज खणखणीत, बिल्कुल टिपेत. “राजाध्यक्ष, ऐकलं. तुमच्या डिफिकल्टीज कळल्या. सगळ्याना ह्याच असतात. काय ? तर हा आमच्या मुलीचा फोटो. बघणार ?”

“कशाला उगाच ?”

“आग्रह नाही. पत्रिका — ठीक ! निदान पत्ता ? समजा तुमचा लग्नाचा कधी विचार ठरला. तर गरजेला येईल. अर्थात् आमची कन्या तोवर लग्नाची राहिली असल्यास — याचा उपयोग. म्हणजे तीसुद्धा पॉसिबिलिटी आहे हां...काय ?”

असं हे तोंड आणि डायरीतील चिटोऱ्यावर पत्ता लिहिण्याचा उपयोग दोन्ही एकाच वेळी संपत. पत्त्याचं चिटोरं रघू राजाध्यक्षाच्या तोंडावर फेकून हा इरसाल थेरडा तडक निघून जायचा.

मागं रघ्याचा पारा हळूहळू चढू लागायचा. त्या भरात चिटोऱ्याचे पार कपटे होत.

माणसाच्या मस्तकात गॅस शिरला की ह्या कैफात तो वरवर कुठं भरकटत जाईल नेम नाही ! अशात हा रघ्या कोंकण्या. म्हणजे मुळातच जरा जादा टाइट.

त्याच टाइटपणात खात्यातील एका ‘काकू रन’ची (कारकून या शब्दाचा प्रचलित स्त्रीलिंगी पर्याय) सुद्धा ह्यानं अशीच वेछुट बोळवण केली. पोरटीला सरळ वाटेला लावलं.

वेडी म्हणून तर रघ्याच्या प्रेमांत पडली. त्याच्या हे कधी ध्यानात येतंय् याची वाट पहात फुकट दिवस काढीत होती, तर हिला एकानं मागणी घातली. तसं तिच्या वडिलानी निर्वाणीचं अस्त्र उपसलं. तिचा नाइलाज होता. आता किंवा कधीच नाही अशा पेचात आल्यामुळे अखेर रघूला तिला सगळं सांगावंच लागलं.

रघ्या उत्साहानं नुसता उसळला. ओरडला, “कॉन्ग्रॅट्स, काकू रन ! गो अहेड! ...”

“पण......पण.....” तिचा जड, थबथबीत पण.

“विचारच करू नका! अहो मागणी तिथं पुरवठा. अर्थशास्त्राचा सिद्धान्त. चुकून चालणार नाही. पळा, रन ! विश् यू हॅपी मॅरीड लाइफ !”

ती बिल्कुल संपली. थिजलीच. पुतळा नुसता. पुटपुटणारा, “पण माझं तुमच्यावर.....”

“प्रेमच ना ? असू द्या ! म्हणजे ते राहिलं तरी बांधा नाही. पण हा लग्नाचा चान्स सोडू नका. पस्तवाल मग.....”

“कळतं आम्हाला ! तुम्ही नका सांग ! दगड... राक्षस...” तिनं देवाला खेटरं सुरू केली... ☆☆

एकीकडे लग्नाच्या वायदेबाजारात नन्नाचा पाढा वाचीत हा मंदीचा सट्टा खेळत होता. दुसरीकडे ‘अ‍ॅकॉमोडेशन’ खात्यावर अर्ज, फेरअर्ज, विनंत्या, स्मरणपत्रकं—वगैरेंचा पाऊस पाडून राहिला होता.

सहा महिने झाले. विनंत्या, स्मरणपत्रकं वगैरेंचा भडीमार चालू असूनही ‘अ‍ॅकॉमोडेशन’ खात्याकडून रघ्याच्या फेरअर्जाला उत्तर नव्हतं. खात्यात चकरा मारून तो थकला. संबंधित कारकूनाच्या ‘विचाराधीन’ ह्या जबाबाला कंटाळला. सुपरवायझर तर ह्यालाच टाळू लागला.

कोणी दुसरा होता तर हताश होऊन थंड पडला असता.

रघू राजाध्यक्षानं नेमकं उलट केलं.

“एस्क्यूज मी प्लीज्,” असं म्हणत ‘अ‍ॅकॉमोडेशन’ खात्याच्या साहेबासन्मुख हा सरळ उभा ठेकला. “मी रघू रावजी राजाध्यक्ष. वान्द्र्याच्या ब्लॉकसाठी अर्ज केलाय्.”

टेबलावरच्या फायलीच्या ढीगांकडे बघत साहेब पेन्सिलीनं कान कोरण्यात दंग होता. हा मूडमध्ये असावा. म्हणूनच त्यानं विनोद केला, “राजांचे अध्यक्ष, तुम्ही अर्ज नाही, हुकूम करायचा.”

“तसं समजा. पुढच्या शनिवारपर्यंत म्हणजे आठ दिवसात अर्जाचं उत्तर मिळालं नाही, तर सोमवारला आमचा अन्नसत्याग्रह मंत्र्यांच्या खोलीसमोर बसणार...” रघ्यानं धमकी दिली.

“धमकी, तंबी देता ? ऑफिसरला ? हाफ् मॅड—” साहेब कडाडला.

“झालोच आहे. आता पूर्ण व्हायचं ठरवलंय्, साहेब.”








अनुक्रमणिका

"गेट आउट ! नाहीतर शिपाई धक्के देऊन बाहेर काढील."

रघ्या बोलला, "डोन्ट वरी ! गेटींग आउट ! ह्याच पुरुषार्थ पुढील सोमवारी मंत्र्यांसमोर दाखवा ही विनंती."

तो बाहेर पडला. मागं साहेबाची घंटी गर्जून राहिली होती.

सरकार धमक्याना भीक घालत नाही हे जगजाहीर आहे. तेव्हा दडपणामुळं म्हणता येत नाही. ह्या साहेबालाच बहुधा पूर्ण मॅड व्हायचं नव्हतं. कारण काहीही असू शकेल! पण आठ दिवसात रघू राजाध्यक्षाला 'अॅकॉमोडेशन' खात्याकडून वांच्याला ब्लॉकचा रीतसर ताबा घेण्यासंबंधी हुकूम आला.

खात्यात हाःहाः कार !

अशक्य, केवळ अशक्य गोष्ट घडली होती. आकाशातला चंद्र–आणि सूर्य का नको ?·म्हणाल तो, फुग्यासारखा जमिनीवर अलगद टपकला असता; किंवा चीनच्या त्या माउत्सेतुंगचा जीवंतपणी अथवा मरणोत्तर हृदयपालट झाला असता तरीसुद्धा कारकूनवर्गाला इतकं आश्चर्य झालं नसतं ! खुद्द रघ्या तर हुकूमाचं चिटोरं डोक्यावर घेऊन 'गडचानो, मिळाला रे मिळाला' अशी आरोळी ठोकून भांगडा, ट्वीस्ट, कथ्थक इत्यादि सर्व नृत्यप्रकार नाचून राहिला होता. बाकी कारकून त्याच्या टेबलाभोवती फेर धरून 'होशियार! आगे पिछे हमारा सरकार–" हे समूहगीत म्हणत होते.

अशात कोणी एक अनुभवी, पेन्शनीत येऊ घातलेला (व म्हणून) खड्डूस बुवा पुढं झाला. तपकिरीचा बार मारून बोलला, "पोरानो, आम्हाला वाचू द्या.... आं... आक्शीऽऽ"

झालं ! हा बुवा शिकला. अपशकुन !

तर बुवानंच पत्रातील साहेबी मेख सांगितली, "एक तारखेच्या आत पझेशन. आज बावीस. म्हणजे उरले आठ दिवस..."

**आली आली, निवडणूक आली (७)**




**मतपरिवर्तनाची १०० टक्के खात्री !**

"ताबा काय एका दिवसात घेता येईल, बुवा !" कोणीतरी बोललं.

"कबूल, येतो. पण कोणाला ? आं–" पेन्शनीतला कारकून बोलला, "रीतसर पझेशन म्हणजे लग्नाची कंडीशन मुख्य. ह्या आर. आर्. चं अजून वाजलेलं नाही. म्हणजे ह्याच्या ब्लॉकचं वाजल्यापैकीच ! साहेबानं ह्या माकडाला बरी पाचर ठोकलीन्.....आठ दिवसात याचं लग्न होणार ? थोबाड बघा...हाः हाः..."

"मेलास तू–" हा रघू राजाध्यक्ष. चेहरा एव्हाना सपाट. आवाज टांगलेला.

"आम्ही मेलोतच, तुम्ही जीवंत आहात. दाखवा करून ?"

"काय ?"

"तेव्हढं लग्नच. आठ दिवसात पझेशन घ्या ब्लॉकचं. साल्याची इतकी कीर्ति झालीय्, जातीत पोरगी मिळवून दाखवावी ह्यानं ! आपलं चॅलेंज–" म्हातारबुवा आव्हानाची भाषा बोलू लागला.

"ओल्ड मॅन, आपण चॅलेंज घेतला." रघ्या बोंबलला.

"जिंकलास तर जीव देईन....म्हणजे ही बाटली तपकिरीची."

कपाळावर हात मारून रघ्या टेबलावर कोसळला.

☆ ☆

मग हापिस सुटेपर्यंत तिकडे कोंकणात वेंगुर्ल्याला का कुठं वास करून राहिलेल्या मामाला एक्स्प्रेस पत्र लिहिण्याच्या उपद्व्यापात तो गर्क होता.

त्याच्या ह्या गल्लामामापाशी फक्त दोन मुलींचाच गल्ला होता. आपल्याप्रमाणंच त्यासुद्धा वयानं वाढल्या असल्यास एव्हाना लग्नाच्या व्हायला हरकत नाही असा रघ्याचा सरळ हिशेब होता. तर हे पत्रास कारण. त्यानिमित्त मामाच्या घरी चार दिवसांचा मुक्काम. चौथ्या दिवशी बॅक् टू बॉम्बे– अर्थात् सहकुटुंब !

सोमवारला 'कोंकणसेवक'नं तो वेंगुर्ला बंदरात उतरला.

हातात एक सुटकेस. धक्क्याच्या पायऱ्या चढून फाटकापाशी येतो तर लांब, गळाबंद ऊनी कोट, पगडी अशा राणीच्या बंडातल्या पोशाखातील एका म्हाताऱ्यानं त्याला हटकलं, "रघूनाथपंत—"

त्या सोंगात गल्लामामाला रघ्यानं ओळखलंच नाही. "मामा हे काय सोंग ?"

"सोंग ? तीर्थरूपांचा म्हणजे तुमच्या आजोबांचा ड्रेस हा, रघुनाथपंत. तुम्ही येणारम्हणून वासनातून काढला. काय ? आयुष्यात आज प्रथमच चढवला अंगावर. . ." म्हातारा सांगू लागला.

भाच्यानं त्याला रोखला. म्हटलं, "चला."

"बॅग इकडे द्या आधी—" गल्लामामाचा हुकूम.

"नको—नको." रघ्याचा विरोध.

म्हातारा थोडाच ऐकतो. त्यानं बॅग हिसकून घेतली. हसून म्हटलं, "रघुनाथपंत—"

"मला बावीच म्हणा मामा." रघूनं सुचवलं.

"छाः ! असं कसं होईल ? शिरगावकरचा जावई रघुनाथपंतच. बावी असू शकत नाही. गाव आमच्या तोंडात शेण घालील' गल्लामामा म्हणाला.




आणि अवसानानं तो चालू लागला.

रस्त्याच्या कडेला उभ्या असलेल्या सार्वट गाडीत वॅग टाकून म्हाताऱ्यानं साद घातली, "शांतारामा ऽ"

"सार्वट कशाला हवीय् मामा? जवळच तर घर आहे?" रघ्या आश्चर्य करू लागला.

"रघुनाथपंत, गावात आम्हाला रहायचंय्! अहो तुम्हाला चालत आलेलं पाहिलं की उद्या गावात बोंब उठेल—भय्या शिरगावकरानं जावयाला बंदरावरून तंगडतोड करायला लावली!" गल्लामामानं खुलासा केला.

जावयाला घेऊन गल्लामामा इतका अपूर्वाईनं घरी परतला पण पुढलं दार बंदच होतं. भरदुपारला घरात सामसूम.

ह्या बेपर्वाईचा म्हाताऱ्याला संताप आला. धोरण नाही. निदान साधी माणुसकी तरी? तीसुद्धा कोणाला नव्हती.

त्यानं दारावर लाथा हाणल्या. पोरींच्या नावानं शंख केला.

खूप वेळानं दार उघडलं.

"अय्या, भय्या तुम्ही?"

केबीनमध्ये साहेबाची घंटी वाजली की बाहेर काळजात काचा फुटाव्यात तसं रघूला झालं.

मामाच्या मागं टाचावर उभा राहून त्यानं मान उंचावली. आणि गारद, साफ ठार! काळोखात वीज चमकावी तशी बत्तीशी चकाकली. चष्म्याच्या भिंगात झगझगीत दोन बल्ब! बाकी काळोख—काळा पडदा!

"मामा, ही...ही..." रघ्याला फेफरं भरलं. साईनाथाचा जप करूनही धीर येईना.

"तोंडउघड्यानो, अगो कानसुद्धा फुटलेत तुमचे?" त्याच्या मामानं सगळ्यांवरच तोंड मोडलं, "रघुनाथपंतांना काय वाटेल?"

घरच्या मंडळीला बहुतेक सवय असावी. कारण त्याची मामी त्याच सुरात ओरडली, "कळलं हो, पुरे! तुमचाच भाचा तो. काय का वाटेना त्याला? मला नाही मुळी डर.."

म्हातारा उसळला नसता तरच नवल! हा फक्त त्याच्या भाच्याचाच नव्हे तर खुद्द त्याचासुद्धा अपमान होता. खुद्द त्याच्या घरात, यकश्चित् बायकोकडून. डोळे वटारून आणि हात उगारून गल्लामामा बायकोच्या अंगावर धावला.

मग आत नुसता थयथयाट!

टाळकं गच्च हातात धरून रघू खालीच बसला. बॅगेवर.

समोर काळोखाचा पडदा. तसाच जागच्याजागी. सरकतच नव्हता. चकाकणारे दात आणि डोळे—

एकूण परिस्थिती कठीण! म्हणजे ही प्रथमा असली तर! नो, नो! साईबाबा तूच वांचव!

आणि साहेबाच्या घंटीचा आवाज घेऊन गरजला, "रघू, काय बुद्धी झाली ही तुला? मुंबईला लग्न जमत नव्हतं तर जीव द्यायचा होतास गाडीखाली! पत्र आल्या दिसापासून घरात युद्ध सुरू आहे!"

कार्टी स्वतःवर एकंदरीत खुश होती. दोन वेण्या, कानात









अनुक्रमणिका

डूल, तोंडाला खूपच पावडर, ओठाना लिपस्टिकसुद्धा––तसा थाट कमी नव्हता. हिच्या वावतीत तोच नडत होता. हिची व्यंगंच नजरेत भरत.

इतक्यात गल्लामामा स्वयंपाकघरातील आघाडी फत्ते करून जिद्दीनं बाहेर आले.

मामाला वघितलं आणि रघ्यानं बॅग माथ्यावर घेऊन दरवाजा गाठला, "नो, नो मामा ! आय् ॲम गोईंग—"

"रघुनाथपंत—" भाच्याला एकाएकी काय झालं मामाला कळेना.

"नो अंकल ! बाकी वाटेल ते सांगा. पण..पण हे.." रमीकडे नजर टाकली आणि वकऱ्यासारखी ह्याची मान पडली.

तेव्हा म्हाताऱ्याच्या डोक्यात प्रकाश पडला. घोटाळा ध्यानात आला. आणि गल्लामामाला हसू आवरेनाच. तो मोठमोठ्यानं पोट धरधरून हसत सुटला.

इतका मोठ्यानं की, मामी माजघरातून बाहेर धावली. वर जिन्यावरून कोणीतरी धडपडत खाली उतरलं.

तर जिन्याकडे बोट दाखवून गल्लामामा ओरडला, "रघुनाथपंत, तुमची नेमस्त वधू ही नमी. ती पिशी रमी नाही. हा: हा: !"

अहाहा ! ते पेनिसिलिनचे शद्व. रघूच्या जीवात जीव आला. त्यानं डोळे उघडले. डोळ्यांच्या खिडक्या सताड उघड्या पडल्या. असला अस्सल लज्जतदार हूपूस—



रघ्या मामांच्या पायावर पडला, "मामा, यू आर् ग्रेट !"

सगळेच हसले. नमीसुद्धा. पाण्यात चांदणं विरघळावं तशी. निदान रघूला तरी तसं वाटलं.

दुसऱ्या दिवशी सकाळला चहा अन् फराळाचं घेऊन नमीच वर माडीवर त्याच्या तैनातीला आली.

अंदाज होताच. आणि तरीही रघू बावरला, गोंधळला.

"अहो—"

"ईश्श ! अरे वहीण मी तुझी. अग म्हणायचं," नमीनं शिकवलं.

"खरंच वाटत नाही. म्हणजे हे..हे.." आणि रघूला शद्व अपुरे पडले.

"मग खरंही नसेल !" आणि हसतच नमी जिन्याकडे वळली.

संध्याकाळी कापडदुकानात लग्नाचं कापडचोपड खरेदी करून सार्वट गाडीतून घरापाशी आल्यावर नमीनंच रघूला विचारलं, "टेकडीवर भटकून यायचं का ?"

रघ्याचा कशाला विरोध असेल ?

रमी मात्र ओरडली, "काय मेलीनं नखरा केलान् पण ! अरे रघू, तुझं पत्र आल्यापासून चार दिवस रडतेय् ही बापाच्या नावानं. कोणावर तरी प्रेम जडलय् म्हणे हिचं. आणि एका दिवसात ते उडालं. हुडुत् ! समजलं का ? तुझ्यावरोवर नाचायला मिळणार मुंबईला म्हणून..."

"मामाला म्हणावं चक्कर मारून येताहेत—" रघूनं ह्या वेडीकडे निरोप दिला.

"जपून रे बाबा ! नाहीतर कुठं खड्डयात पडाल." आणि रमी खदखदून हसली. नको तेव्हा, नको तशी. वेडी कशी !

घरामागंच आडरान होतं. आधी लहानसा तलाव, जरा पुढं कोणा पिराचा दर्गा आणि वर टेकडी.

तलावाच्या काठावर बसत नमीनं रघूला म्हटलं, "सॉरी रघू, तुला सांगायलाच हवं.."

"नको सांगूस ! झालं, गेलं, संपलं ! ते कशाला कळून घेऊ."

समोर तळ्यातील पाण्याकडे तिनं टक लावली होती. शेवाळ दाटलेला हिरवा तळ, वर नितळ जळ—

मान आवेगानं वर उचलून ती वोलली, "मला जीव द्यावासा वाटतो वघ."

तिचा तो स्वर, ती नजर, तो चेहरा—रघू खूप चरकला. तिचा हात धरून म्हणाला, "घरी चल वघू—"

"छी: ! अरे हट् !" तिनं हात झिडकारला. "वाट पहा–सात जन्म !"

आणि रघू उघड्या डोळ्यानी बघतोय् तर त्या बेफाम पोरटीनं धाडकन् पाण्यात उडी टाकलीसुद्धा.

पाठोपाठ तोसुद्धा उडी टाकण्याच्या बेतात होता.

पण तितक्यात रघ्याला आठवलं, आपल्याला पोहता येत नाही. शिवाय कपडे वगैरे भिजतील [illegible] तारे व्हायचे.

तो ओरडणार होता तर लक्षात आलं. च्यायला, उभा गाव जमायचा आणि मग फुकट चौकश्या, बोभाटा... छेः छेः! म्हणजे त्यात शहाणपणा नव्हता. अल्प परिस्थितीत एकच गोष्ट त्याला करता येण्यासारखी होती. तीच त्यानं केली. गल्लामामाला वर्दी देणे. धूम तो घराकडे धावला.

दारातच ह्री पिशी आडवी आली, "रघूराजा—"

"मामा कुठंयत्? नमी—नमीनं जीव दिला—"

"कुठं?"

"तळचात."

इतका भयंकर प्रसंग. वहिणीनं जीव दिलेला. पण रमी खुशाल हसत सुटली. डोक्यातच नाही, ह्या कार्टीच्या काळजात सुद्धा ढिलाईचा भाग खूप असावा!

"प्रसंग कोण? हसतेस काय?" रघू वैतागला.

"हसते तुला. नमी बुडणार नाही. पोहता येतय् तिला."

"आं!"

"परीक्षा केली तिनं तुझी! तू गचकलास."

"आता?" रघू पुरता गोंधळला.

रमीनंच मार्ग दाखवला, "जा बाबा परत! पातळ-पोलकं घेऊन. नाहीतर सिकविक व्हायची. मग तुझं लग्नं तहकूब..."

☆☆

आलिया भोगासी सादर होऊन रघू त्या ओसाड तळयावर पोचला.

नमीचा कुठं मागमूस नव्हता. पण तिची चप्पल काठावर पडली होती. ती त्यानं उचलली.

आणि रघ्याचं तिकडे लक्ष गेलं. म्हणजे आधीच जायला हवं होतं. पण ह्याचं मडकंच जरा कच्चं. बेहोषीचं ते मुक्त हसणं-खिदळणं, एकान्तातील ती धुंद कुजबुज, शिणगाराची ती बेबंद हितगुजं—दर्ग्याच्या पिछाडी गजबजत होती.

लक्ष गेलं आणि मिस्प्लेस झालेली एखाद्या परिपत्रकाची ओ. सी. (मूळ प्रत) कचऱ्याच्या टोपलीत सांपडावी तसा रघूला हर्ष झाला.

त्या भरात रघू राजाध्यक्ष क. स., सचिवालय तसाच खालमानेनं पुढं घुसला. दोघांच्या एकान्तात. डोळे असून आंधळा, कान असून बहिरा. तोंड मात्र वर्कींग ऑर्डरमध्ये– "एस्क्यूज मी सर—"

त्यानं जीभ चावली. त्याचं चुकलं होतं. चक्क मिस्टेक! नमी एरव्ही कशीही असली तरी स्त्री होती. त्यानं चूक सुधारण्याचा प्रयत्न केला, "आय् मीन मॅडम्—"

"रघू... तू" पोरटी एव्हाना ठिकाणावर आली होती.

आणि तिचा तो कोण तो चिमणा भुर्कन् कुठच्याकुठं उडाला होता.

"होय, मीच—रघू!" तो म्हणाला, "ही तुझी चप्पल. मला मिळाली. बाकी बरी मारलीस! आणि हे कपडे. घेऊन आलो घरून. उद्या लग्न... म्हणून काळजी..."

"गळा दावून माझा प्राण कां घेत नाहीस रे?" नमीनं हसत विचारलं.

"वेडा नाही! तू मला जीवन्त हवी आहेस." त्यानं थंड जाव दिला.

"अरे वावा, तुझ्याच डोळ्यानी पाहिलंस ना? तरीही तुझा हट्ट—"

"कायम."

"तुझ्या मामाना काय सांगणार आहेस?" तिनं प्रश्न केला.

"घडलं ते."

"वरं होईल! भय्या नक्कीच माझा जीव घेतील!"

"फक्त तुझा तो अमुकतमुक त्याच्या जागी मी. वस्स! इतकीच दुरुस्ती. म्हणजे तुझाही जीव जायला नको. मलाही समाधान खोटं—प्रेम जमल्याचं..."

आणि रघ्याला काय लहर आली कोण जाणे! पिश्या रमीची नक्कल करीत तो मोठ्यानं खिकाळला, "हः हः हाः हीः.."

☆☆

घरी आल्यावर नमीनं त्याला आणिकच चॅट केला. म्हणजे तिनं साफ कात टाकली. इतक्या सफाईतपणं की रघूलाही भ्रम पडावा. सारखं आपलं—"रघू... रघू ऽ" अन् "रघू असा न् तसा" वगैरे. जसं हिला दुसरं काही किंवा कोणीच दिसत नव्हता, सुचत नव्हता. एक हा रघू हिचं आराध्यदैवत—

पिशी रमी ऐकूनच वैतागली, "वंद कर ना! सारखन् काय रघू ऽ रघू ऽऽ! छी! असलं प्रेम तर वैस मिठी मारून."

गल्लामामा मात्र भलताच खुशीत होता. नमीच्या लग्नाकरिता रहातं घर गहाण टाकून स्वारी आली होती. वहुदा तीच ऊब असावी! किंवा देवकीकृष्णानं ह्याच्या पोरीला आयत्या वेळी वरी वुद्धी दिली याचाही आनंद असेल! म्हातारा एकूण आज तृप्त होता. कृतकृत्य झाला होता.

जेवणं आटोपली आणि गल्लामामानं मामीला फर्मान सोडलं "म्हटलं लवकर आटप! आज रमी बसायचीय्!"

रघूचा प्रश्नार्थक चेहरा रमीकडे वळलेला दिसताच नमीनं खुलासा केला, "ही नाही रे रमी! पत्त्यांचा खेळ आहे हा.."

मामीचा विरोध झालाच, "म्हटलं दिवाळी नाही आज."

"झक् मारली तुझी दिवाळी! अग आजच्यासारखा दिवस जन्मात एखादाच येतो. आणि त्यालासुद्धा पुण्य असावं लागतं."

वर माडीवर अड्डा पडला. नमी, रमी, रघू व मामा न् मामी पांचीजणं. नाही म्हणायची सोय नव्हती. गल्लामामानं ऐकून घेतलं नसतं. म्हाताऱ्यानं रुपयारुपयाच्या दहा नोटा खिशातून काढल्या. प्रत्येकी दोन ह्या हिशेवानं.

रघू घेईना. म्हणाला, "आहेत माझ्यापाशी."

मामा वोलला, "रघुनाथपंत, तुम्ही जावई उद्यापासनं. आज गल्लामामाचा भाचा—काय?"

नमीनं रघूला खेळाचे नियम सांगितले. पैसा पॉईन्ट, एक क्लिअर सिक्वेन्स... वगैरे. त्याला ठाऊक होतेच. आणि गल्लामामानं मुख्य अट सांगितली— "दोन रुपये संपले की माणूस वाद. त्यानं सरळ उठायचं. अखेरपर्यंत टिकेल तो जिंकला—काय? नमे वघूया तुझं नशीव—"

पण नमीच प्रथम उडाली. खेळात तिचं लक्ष नव्हतं. सारख्या चुका, गोंधळ, धांदरटपणा. दोनतीनदा तर खोट्या रम्या दाखवून फुकट सगळ्याना पॉईन्ट मोजलेन्. तासाभरात तिचा निकाल लागला.

भारी वाईट वाटलं पोरटीला. वापानं 'हुडुत्! काय कामाची नाहीस तू नमे'—असं चिडवलं तेव्हा ती अगदीच रडकुंडीला आली. सरळ उठलीच. डोळ्याना पदर लावला. धड्धड जिना उतरून खाली धावली.

म्हातारा अन् रघू सराईत. मामीही वऱ्यापैकी खेळायची. रमीला धोः धोः पान—अकराला मंडळी कॉफी प्यायला उठली तोपर्यंत चौघंही तग धरून होती. मग दुसऱ्या वैठकीत मात्र म्हाताऱ्यांवर निद्रेचा अंमल चढू लागला. मामा न् मामीची नजर आस्तेआस्ते चकू लागली. त्यांची भूल होऊ लागली. पत्तेच आठवेनात. तसा दोघांचाही डाव झपाट्यानं घसरू लागला. प्रयत्न करूनही गल्लामामाला सावरता आला नाही. मामीला तर इच्छाच उरली नव्हती. आधी मामा आणि मग मामी वाद झाली. म्हणजे तिला चिडवायला नवऱ्याला तोंड उरलं नव्हतं!













अनुक्रमणिका

आता उरले दोघेच—पिशी रमी आणि हा रघू. रमी आघाडी-वर, साडे सहा रुपये. रघू होता साडे तीन वर.

काही वेळानं मामी झोपायला खाली गेली. मामा होता बसून, दोघांचा खेळ बघत. मधनंमधनं उत्तेजन देत. कधी रमीला, "पिशे, जिंक याला. गोरा नवरा शोधून काढीन बघ!" आणि कधी रघ्याला, "रघुनाथपंत मर्द तुम्ही. जिंकणारच, जिंकायलाच हवं" . . . वगैरे.

रमी जिंकत नव्हती. रघ्याही तिला हरवत नव्हता. आल-टून पालटून रम्या लागत होत्या.

"अय्या, भय्या झोपलेसुद्धा—" बापाच्या घोरण्यानं रमीचं तिकडे लक्ष गेलं.

"कबूल कर हरलीस म्हणून, खेळ बंद करतो." रघू बोलला.

"हूं: ! हरव की आधी. मग करीन कबूल."

"मग बैस रात्रभर! आपली आहे तयारी."

"माझीसुद्धा!" रमी थोडीच माघार घेणार!

गल्लामामा तालात स्वस्थ घोरत होता.

घड्याळात एकचा टोला झाला. परिस्थितीत फार फरक नव्हता. रघ्या फक्त पन्नास पॉईन्ट वर सरकला होता. म्हणजे चार रुपयां-वर होता.

पिश्या रमीनं अखेर पर्याय काढला. हिच्या डोळ्यात एव्हाना जुगाराची जिद्द चढली. खोटं नाही! रघूला तिनं म्हटलं, "आता असं नकोच. ह्या पॉईन्टात अर्थ नाही. सरळ पैजाच बोलू. ही रमी तीन रुपये . . ."

रघू कबूल झाला. आणि जिंकला. चार वरून एकदम सात रुपयावर पोचला. पण पुढची दोन रुपयाची रमी मारून पिशीनं त्याला खाली खेचला. दोघंही पाच रुपयावर आली.

"हा अखेरचा डाव रमे—" रघ्या ओरडला.

"पाच रुपये—" त्याच आवाजात रमीनं साद दिली.

आणि मग हा आखरी डाव जिंकली तशी रमी नुसती वेडीपिशी झाली. टाळ्या वाजवीत नाचत सुटली, "रघू, मी जिंकले, मी जिंकले!"

नक्की सांगणं कठीण! बहुधा तिला तशी वेडीपिशी बघूनच रघू राजाध्यक्षाच्या डोक्यात एकाएकी बिघाड झाला. स्प्रिंग गेली असेल! किंवा स्क्रूही निसटला असेल!

हाताला धरून रमीला त्यानं खाली खेचलं, "बैस ग! अजून डाव संपला नाही. मी हरलो नाही."

"अरे, हे काय दहाच्या दहा रुपये जिंकलेत मी!" रमीनं नोटा मोजून दाखविल्या.

"रुपयापैशांच्या वार्ता बस्स! झाल्या, संपल्या त्या! आहे हिंमत तर जिंक मला. ह्या रमीला मी मलाच लावलेय्!"

"यडा आहेस—" रमी खदखदली.

"आहे—आहे रमे मी यडाच आहे. वेडा आहे, पिसा आहे, मॅड आहे, गाढव आहे . . ." पानं वाटत तो बरळत होता.

आणि काय रघ्याचं नशीब! खरं म्हणजे भयंकर! पण शुद्धीवर असेल तर कळणार ना? तो शुद्धीवर नव्हता. म्हणूनच चक्क ह्यानं हॅन्ड रमी मारली. दोन क्लिअर सिक्वेन्स, दोन ट्रिओ! विशेष म्हणजे जोकरशिवाय! असं भाग्य लाखात एखाद्यालाच असतं.

पत्त्यांच्या पानाचं त्यानं चुंबन घेतलं. दोन्ही पायावर तो ताड्ताड् उड्या मारू लागला. तोंडानं बडबड, "हिपहिप् हुर्रे! रघ्या, यू लकी डॉग! रमी लागली—हॅन्ड रमी, रमे हॅन्ड—"

त्याच कैफात रमीच्या गळ्याला त्यानं मिठी मारली. तिनं ह्याला दूर लोटलं तसा हा आणिकच चेकाळला, पेटला. "हॅन्डी रमी! डिअर डिअर रमी—" असं बरळत तिला रघ्यानं जवळ ओढलं. अधिकच जवळ . . .

रमीनं बराच प्रतिकार केला. त्याच्या थोबाडीत मारल्या . . . ओरबाडलं . . . चावली. शक्ती होती तोपर्यंत आणि विवेक होता तोवर—

पहाटे मामी आली आकान्त करीत माडीवर, "अहो नमी पळाली . . . आणि रमी . . . माझी रमी . . ."

म्हातारीचं लक्ष कोपऱ्यात गेलं. वरचं छप्पर कोसळून डोक्या-वर पडतं तरी मामी अशी किंचाळली नसती. "मेल्यानो . . . अहो, आता तरी उठा. शेण घाला ह्या दोघांच्या तोंडात . . ."

☆ ☆

रघू राजाध्यक्षानं वांद्र्याच्या ब्लॉकचा सोमवारी रीतसर ताबा घेतला. पण गंमत अशी बट्याला ह्या अपूर्वाईच्या ब्लॉकचं कौतुकच नव्हतं. नशिबानं मारलेली ती हॅन्ड रमी आणि ही हॅन्डी रमी या दोघींच्या दरम्यान स्वारी कुठंतरी तरंगत होती—आणि खाली म्हणजे ब्लॉकवर उतरायलासुद्धा तयार नव्हती. ●●●



## असे-तसे

असे–तसे किती दिवस
कंटाळपुरी एकच लय
सांखळलेल्या पाण्यावरती
कुठे कुठे एक वलय
गिळून टाकला सारा मान
सारा उपहास दैन्य सारे
शल्ये आजची कुरवाळतांना
गुलाबाचे स्वप्न रेखले
विश्वास होता, एक सकाळीं
काहीतरी अघटित होईल
सारे अश्रू, सारे दैन्य
एका क्षणात निपटून घेईल.
व्यापार करील मला
हळूवार एक हात
बेसूर, सपाट जगण्यावरहि
केव्हांतरी होईल मात
उद्या उद्या रेषा रेखित
'आज' गिळला कांही बाही
डोळाभर ज्याचे मोहन
असा उद्या आलाच नाही!

—पद्मा लोकूर



अनुक्रमणिका




सत्ताभिलाषेचे फळ आणि एकीचे बळ




अनुक्रमणिका


साहित्यातील
'नसो' बापुडे
ग्रंथप्रेमी नाका
कविता
कोंबडी क्लब
शैलजा ? किं शामराव !!
कविता
'अस्सल' नीरक्षीर नाका

अनुक्रमणिका



त्याला याची सवय नसायची. वेळ येई माथं भडकायची. एकसूरानं नांदणाऱ्या इंद्रियात भिंती उभ्या होत. परानुभूति आणि सहानुभूति यांच्या जोड्या सामोऱ्या येत.



## ---सिनिक्

—**वास्तविक** जग तेच होते, मोठे होते,
—अतर्क्य होते, अगाध होते,
—अश्मयुगापासून ते विज्ञानयुगापर्यंत कुतूहल वाढविणारे, गुंतवणारे, खपवणारे, सतत गिळणारे आणि अविरत उगीळणारे.
—पण तो त्याच्या जगात जन्मला. तेही तेच राहिले नव्हते. देवधर्मांनी मंतरलेल्या निसर्गाच्या अंकावर वाढला आणि आता सुख—पूत वळी—संस्कृतीच्या अश्वावर स्वार झाला होता—

जगणे तसे अतूट राहिले होते. अनिरुद्धपणे वहात होते–
—वृत्ति वेछूट होती, धैर्य अचाट होते आणि सामर्थ्य अफाट होते—कुठे अडसर नव्हता, आक्षप नव्हता. आणि विपत्ती-आपत्ती केव्हाच दवली होती, लपली होती, डोके वर काढत नव्हती—

सारे ठीक होते, ठसक्यात होते आणि ठसक्यात होते म्हणून ठिसूळ नव्हते—

प्रकाश अंधाराचा फरक लोपला होता आणि प्रवृत्तीप्रकृतीची लय जमली होती–

आयुष्याचे आसन एक हिमनग झाले होते. खालच्या प्रवाहाची वरच्याला आणि उपरच्या गतिमतिची आतल्याला वार्ता नव्हती—

तरीही वासना—विकार आणि विचार-विवेक सहजीवनात बद्ध होती—

मनुष्य--
—सरपटतो
—पळतो
—उडतो
—पडतो

—वहातो
—वहावतो
—तापतो
—जळतो
—गारठतो
—वितळतो
आणि विरतो आणि उद्‌भवतो—
—'संभवतोहि'—
—मायेचा खेळ
—निसर्गाचा क्रम
——विश्वनाटक,

—असे इतिहासाच्या, उत्क्रांतीच्या आणि विकासाच्या टप्प्याटप्प्यावर आर्ष, आर्द्र, आणि आधुनिक दृष्टीच्या जीवाणूंनी म्हटले, म्हणत आहेत आणि पुढे म्हणणार नाहीत याची खात्री नाही—

त्याला हे सर्व आवश्यकही वाटले नाही आणि अनावश्यकही जाणवले नाही—

—खुराक भरपूर होता, तुष्ट करणारा आणि पुष्ट करणारा,
—वारसा शंभरी गाठणाऱ्यांचा आणि ओलांडणाऱ्यांचा होता.
—असा योग आला होता की, प्रमाण साधले आणि तोल राखला गेला—,
—जीवशास्त्राचा 'फॉर्म्युला' सम जमवून होता.

—आरोग्याचा वारसा लाभला—
—सावध राहावे लागते
—राखावे वाटते
—जपून ठेवले पाहिजे
——मर्यादा असतात
—त्या पाळाव्या लागतात

अशी जाण जागली नाही. त्या खेरीज गति होती. अति धातूत अडखळली नव्हती.

—जगण्याचे प्रयत्न
-प्रयत्नांचे जगणे
—स्वप्नांचे जग
—जगण्याचे स्वप्न
—सुखांचा स्वर्ग
—स्वर्गाचे सुख
—जिवाचे सोने
—सोन्याचा जीव

अशी अस्तित्वाची कल्पना आणि कल्पनेचे अस्तित्व—

वेळ कुठे होता त्याला ?
नाळ तुटला आणि जगला—
जगला आणि ओरडला—
ओरडल्याची हाक झाली—
दैवाची साद झंकारली—
सातत्याची सोवत आली—
नव्हाळीची झाली जिव्हाळी—
जिव्हाळी वनली ममता—

—पण कोण विचारतो समता ?
—कशाला आमंत्रा व्यग्रता ?

—तसे त्याला हृदय होते. समज उमज होती. औचित्य होते. सौजन्य होते. कंपा होती आणि होती अनुकंपाहि—. . . .

—परानुभूतिहि होती. कुठे नग्नता, केव्हा भग्नता, कुठे विद्रुपता, केव्हा विरुपता, कुठे दैन्य, केव्हा. असहाय्यता, कुठे भेग, केव्हा भेद,—
—प्रेम आहे तिथे भक्ति नाही
—भक्ति आहे तिथे प्रेम नाही

—आणि दोन्ही आहे तिथे सांधा नाही.
—सांधा आहे तिथे वर्तमान नाही.
—असं काही तरी त्याला स्पर्शून जावयाचं तेव्हा त्याला सहानुभूति वाटे. वाटे की, माणसं किड्या-मुंगीसारखी झाली आहेत. एखाद्या मारवाड्यासारखी मग तो उदारतेची, दिलदारपणाची, आणि दानशूरत्वाची साखर पेरी. भोगाच्या ओझ्याखाली दडलेला अहंकार हळूच डोके वर काढी—
—त्याला याची सवय नसायची. वेळ येई माथं भडकायची. एकसूरानं नांदणाऱ्या इंद्रियात भिंती उभ्या होत. कर्तृत्व आणि दातृत्व यांच्या सीमारेषा खड्या होत. परानुभूति आणि सहानुभूति यांच्या जोड्या सामोऱ्या येत. अस्मिता ताड ताड तुटत आहे असा त्याला हादरा बसे, मनाचे जलपात्र खळकन् फुटले आणि सारे वाहून जात असल्याचे दुःख सले....

—नुसते रक्ताचे पाट, आणि लाल रंगाचा स्राव दिसे....



## वाट वाहाती सोडून

—वाट वाहाती सोडून
दूर, जख्ख निवापाशीं
पाल असावें ठेंगणें,
शेळी-कोकरूं खुंटाशीं

दिस दगडी हातांचा
जावा कष्टाशीं झुंजत
चिलमीच्या धुरासंगें
सांज यावी विसांवत

उगा बसावें मीं दारीं
दाटणाऱ्या काळोखांत
तीन धोंड्यावर आंत
तुवां रांधावें ओशट

पाठ टेकावी भुईला
रात चढतां आभाळीं
तुझ्या शिणल्या देहाचा
रास खेळावा जवळीं

अर्घ्या-उण्या संसाराच्या
गोष्टी चावळाव्या चार
शब्द ओठचा तुटावा

पेंग होतां अनावर—
चाकोरीचें मन कधीं
अशी भिर्कावते वाट
आणि नागर कल्लोळ
जरा भासतो चविष्ट!

—कृ. व. निकुम्ब

—उजेड नको वाटे
—वारा नकोसा होई
—गति मारेकरी भासे

तो अंधारात गडप होई. न मिटणारे डोळे मिटून घेई. गात्रे बधीर होत. तोल राहत








नसे. डोके रक्त ओढी. ग्लासामागून ग्लास रिकामे होत...

—त्या अंधारात मग परानुभूति आणि सहानुभूति यांची संगति लावण्याचा आणि संवाद साधण्याचा सवाल भेडसावत असल्याचे जाणवत नसे...

—काही ऐकू येत नसे. बायकापोरे, मित्र-गोत्र, समाज, राष्ट्र आणि हो, सगळेच –यांचे जमेल तसे व तेवढे बरे करायचे ? म्हणजे, पैसाच ना ? घ्या—

देणगी म्हणा, मदत म्हणा, दया म्हणा, समाजकार्य म्हणा, धर्म म्हणा किंवा सर्व-कल्याण म्हणा—

काय वाटेल ते म्हणा—

वाटेस लागा,—

आता तरी सोडा,

—होईन मोकळा, स्वत:च्या विप-विळख्यातून सुटण्याकरता....



दर दुसऱ्या दिवशी थकलेले मन आणि निवलेले शरीर पाहतो—वाढलेली आणि वाढवलेली प्रजा पाहतो–

—अशाहि स्थितीत समवस्थापन दिसते

—काही विघडलेले कुणाला कळत नसते.

—पुन्हा द्वंद्व मनात. आणि मनात म्हणून शरीरात. कुठूनहि गेले तरी परतो तिथेच.

—वंश वाढत असतो

—पिढी घडत असते

—जाणारा दिवस नेत असतो बरोबर

—प्रकाश

—वारा

—आशा

—निराशा

आणि उडवत असतो उत्साह, उल्हास आणि उर्जन–

आणि

—एके दिवशी येते त्याच्या छातीत कळ

—अगदी डोळ्यासमोर हसरी मुले–

हसरे यौवन

हसरा सुगंध–

तळपत असतो. पसरत असतो. . .

—त्याक्षणी त्याला वाटते की काहीतरी हातातून निसटून चालले आहे—

मग जाणवते की ते—

—पकडून ठेवावे

—जपून ठेवावे

—प्राणपणाने संरक्षावे

—प्राण देऊन संवर्धावे

—आणि त्याच्या तोंडावर चादर ओढून परत चाललेल्या डॉक्टरच्या पाठमोऱ्या आकृतिकडे त्याची वैभवात वाढलेली, सुखात लोळलेली, प्रतिष्ठेत हरपलेली आणि संसारात रमलेली बायको पाहत असते. पाहता पाहता डॉक्टर पेशंटच्या नव्यानेच खरेदी केलेल्या मोटारीत विराजमान झाल्याचे—

डॉक्टर बसताच मोटारीच्या स्टार्टींगचा आवाज होतो—

तिला भासते की, त्या आवाजाने तिच्या बांगड्या फुटल्या. . .

● ● ●






अनुक्रमणिका



--वसंत सबनीस

**दहा हजारात उठून दिसणारी गाय त्याने केवळ चाळीस रुपयाना आणली ही गोष्ट गावकऱ्याना समजली तेव्हा त्यानी आश्चर्याने तोंडात वोटे घातली. रखमा तर थकच झाली. गाईचं कौतुक करावं का नवऱ्याला डोक्यावर घेऊन नाचावं हेच तिला कळेना....**



मारुती सगर हा गावात अत्यंत व्यवहारदक्ष माणूस म्हणून ओळखला जात असे. फायद्याचा सौदा करण्यात त्याचा हात धरणारा दुसरा कोणीही नव्हता. सावधगिरीने बोलणे, शब्दाचे फासे विनचूक टाकणे, शब्दाशब्दात गुंतवून दूर नेणे आणि सौदेकऱ्याला पटकन् शब्दात पकडणे असल्या कामात तो अतिशय तरवेज होता. म्हणूनच घरापासून गुरापर्यंत आणि नांगरापासून डोंगरापर्यंत कुणाला काहीही खरेदी करावयाची असेल तेव्हा गावात एक सल्लागार असे आणि तो म्हणजे मारुती सगर.

मारुतीने आजवर असंख्य सौदे केले पण एकही सौदा कधी तोटयाचा झाला नाही. याचे सर्व श्रेय त्याच्या व्यवहारदक्षतेला होते. आपल्या अंगातील ह्या कर्तवगारीची खुद्द मारुतीलाही पूर्णपणे जाणीव होती. त्याच्या सल्ल्याशिवाय झालेल्या एखाद्या सौद्यात एखादा माणूस फसला की, मारुतीचा अहंकारी आनंद उसळून येत असे. चार चौघाना जमवून तो सौदा कसा करायला पाहिजे होता म्हणजे कसा फायदा झाला असता हे तो जाहीरपणे सांगत असे. इतरानाही ते पटत असे आणि सौद्यात फसलेला गावकरी हा गावातील एक नंबरचा गाढव मनुष्य आहे अशी सवंध गावाची खात्री होत असे. मारुतीचा भाव वाढत असे.

कोणतीही वस्तू खरेदी करण्याची मारुतीची एक खास पद्धत होती. आपल्यापेक्षा वस्तू विकणाऱ्याला ती विकण्याची गरज किती तांतडीची आहे याचा अंदाज घेतल्याशिवाय तो सौदा करायला जात नसे. यातच त्याचे सारे कसब आहे असे लोक म्हणतात. निकड हेरण्याची हातोटी हेच त्याच्या व्यवहारदक्षतेचे यश होते. अशा व्यवहारदक्षतेमुळेच मारुती सुस्थितीला पोचला होता. चार पैसे गाठी वांधून होता. जमीनजुमला, घरदार यावावतीत निश्चिंत होता. फक्त उणीव होती एका गाईची. आपण एक गाय घेतली पाहिजे. असे त्याला तर वाटतच होते पण रखमाची–त्याच्या वायकोची–ती फार मोठी हौस होती. पण आजपर्यंत गाईचा सौदा जमला नव्हता. कधी किंमत योग्य असली तरी गाय पाहिजे तशी नसायची तर कधी गाय चांगली वाटली तरी किंमत भरमसाठ असायची. मारुतीच्या व्यवहारदक्षतेला आव्हान ठरेल असा प्रसंग आलाच नाही. रखमाची गाईबद्दल सारखी पराणी चालू असली तरी मारुती तिला धीर धरण्याचा आणि संधीची वाट पहाण्याचा उपदेश करीत असे.

"धा वसं उलटली तुमास्नी गाय घावत न्हाइ अजून. मी म्हातारी



अनुक्रमणिका

झाल्यावर गाय आनुन काय उपेग ? माजं हातपाय थकलं तर कोन करल गाईचं ?" रखमा म्हणायची.

"गाय म्हंजी काय चिचंचा पाला हाय कुटल्या बी झाडावर चडुन वरबाडुन आनायला ? का ते कुत्र्याचं पिलु हाय कुटं बी धावलं की काखुटीला धरून आणावं ?"

"पर किती दीस वाट पाह्यची मानसानं त्येला काइ हिसाव ?"

"वाट पाह्यचा हिसाव करत्यात कुणी ? मांजरं उंदराच्या बिळापाशी वाट बघीत बसतं तवा ते हिसाव करतं का वाट पाह्यचा ? चांगला उंदीर पायजेल आसल तर वाट बघायलाच पायजेल. उगा आपली मरतुकडी गाय दारात आणुन बांधनं खरं हाय काय ? मी वासावर हाय. पर उगा डोकं खात जाऊ नगस माजं..."

असं बरेच दिवस चालले होते. मारुती वासावर होता ही गोष्ट खरी होती. आजुबाजूच्या प्रत्येक बाजाराला तो जात असे. गुरांचा बाजार हेरून परत येत असे. पण पाहिजे तशी गाय काही मिळत नव्हती. त्याला त्याची मुळीच घाई नव्हती. तो शांतपणे बाजार धुंडीत होता. गुरे नजरेखालून घालीत होता. गावोगाव फिरत होता. त्याला पाहिजे होती तशी गाय त्यानं आपल्या मनात केव्हाच घट्ट बांधून टाकली होती. फक्त ती प्रत्यक्षात भेटत नव्हती.

भोगावच्या बाजारात मात्र मारुतीची तपश्चर्या फळाला आली. एक चांगली गाय बाजारात विकायला आल्याचे त्याच्या कानी आले. मारुती तांतडीने भोगावला गेला. त्याच्या नेहमीच्या पद्धतीने त्याने बाजारात चक्कर मारून ठिकठिकाणी चाललेल्या सौद्यातील बोलणी ऐकली. एका बाजूला एका झाडाखाली एक अत्यंत रेखीव, देखणी, पाणीदार डोळ्याची, उमद्या बांध्याची, मोराच्या ऐटीची डौलदार गाय एखाद्या रूपगर्वितेप्रमाणे तुच्छतेने जगाकडे पहात उभी होती. मारुती बघतच राहिला. वेडावल्यागत बघत राहिला. अशी खिलारी देखणी गाय उभ्या जन्मात पाहिली नव्हती. पटकन् सौदा करावा अशी उर्मीसुद्धा त्याला आली. परंतु लगेच त्याच्यातील व्यवहारदक्षपणा जागा झाला. ह्या गाईत विशेष असे काही नाही असा भाव त्याने चेहेऱ्यावर आणला आणि गायीच्या मालकाचे इतर काही गिऱ्हाइकांशी चाललेले बोलणे लक्षपूर्वक ऐकू लागला. त्या बोलण्यातून त्याला हवा असलेला अंदाज मिळू शकला नाही. पुन्हा एक चक्कर टाकून मारुती गाईपाशी आला. गाय घ्यायची तर अशीच हा त्याचा निर्धार कायम झाला होता. त्यानं मनात बांधून ठेवलेली देखणी गाय बरोबर अशीच होती.

तो पुन्हा गाईपाशी आला त्यावेळी तेथे दुसरे गिऱ्हाइक नव्हते. फक्त म्हातारा मालक आणि त्याचा पुतण्या दोघेचजण झाडाला टेकून पान तंबाखू खात होते. मारुती विसाव्याला आलेल्या वाटसरूचा भाव चेहेऱ्यावर आणून त्यांच्याजवळच पण त्यांच्या शब्दांच्या टप्प्यात हाशहुश करीत बसला. त्यांच्याकडे व गाईकडे संपूर्ण दुर्लक्ष करून.

"लई चिंतागती झाल्याला दिसतोस तू काका ?"

"तसा लइ न्हाइ...पर..." म्हातारा अडखळला.

"अजुन मोप दीस हाय. गिऱ्हाइक याची येळ बी टळून गेल्याली न्हाइ...."

"त्ये खरं रं... पर मनात येनं... आज न्हाइच सौदा पटला तर उद्या कसं हुईल ? मान्याचा सख्या तर आता काइयेक आयकून घ्याला तयार न्हाई... उद्याचा शेवटचा वायदा हाय...काइ ना काइ तरी त्येच्या हातावर ठिवायलाच पायजेल." म्हातारा काळजीच्या स्वरात बोलला.

मारुती उठला. त्याचे अंदाज घेण्याचे काम झाले होते. हा सौदा आता पटवलाच पाहिजे असा निश्चयही झाला होता. तो तेथून दूर गेला. उरलेल्या अर्धा दिवसाचे काम त्याने ठरवून टाकले. बाजारात तो अशारीतीने फिरत राहिला की, गाईकडे जाणारे गिऱ्हाइक त्याच्या नजरेच्या टप्प्याबाहेर जाणार नाही. दोन चार गिऱ्हाइकानां तर त्याने गाईपर्यंत जाऊच दिले नाही. आपणच त्याना हवी असलेली माहिती अशी खुबीने सांगितली की ह्या सौद्यात काही अर्थ नाही अशी त्यांची खात्री पटली. मारुतीसारख्या व्यवहारदक्ष माणसाचे मत म्हणजे दगडावरची रेघ. त्याचा सल्ला धुडकावून गाईचा सौदा करण्याचे धाडस एकालाही झाले नाही. गाईच्या मानाने गाईची किंमत फार आहे हे मारुतीचे मत सर्वानाच पटले. प्रत्यक्ष गाईच्या मालकाशी बोलणे करून आलेल्या काही मंडळीनीही याच मताला दुजोरा दिला.

दुपार टळली तरी गाईचा सौदा पटला नाही. म्हातारा हवालदील झाला होता. पुतण्याही आता बेचैन झाला होता. गाय आज जात नाही. ती तशीच परत न्यावी लागणार या विचाराने दोघेही निराश होऊन झाडाला टेकून बसले होते. घरासाठी मीठ मिरची घेण्याचेही भान त्याना राहिले नव्हते. म्हातारा तर कातावला होता. दूर उभा राहून मारुती हे सर्व बारकाईने न्याहाळीत होता. समाधान पावत होता. त्याला हवे होते तसेच वातावरण तयार होत होते. पण अजून थोडा वेळ जायला हवा होता.

आणि तो थोडावेळही गेला. सूर्य मावळतीकडे झपाट्याने सरकू लागला. बाजार हळुहळू मंदावू लागला. एकेकजण उठून जाऊ लागला. थोड्याच वेळात बाजार संपणार अशी वेळ येऊन ठेपली आणि त्याच वेळी मारुती गाईचा सौदा करण्यासाठी म्हाताऱ्यापुढे येऊन उभा राहिला. प्राथमिक विचारपूस झाल्यावर ह्या गाईत विशेष असे काही नाही पण अंगणाला शोभा देण्यासाठी एखादी गाय असावी एवढ्याच माफक उद्देशाने आपल्याला गाय हवी आहे; आणि ती आजच पाहिजे असे मुळीच नाही, अजून वर्षभर थांबायची आपली तयारी आहे इत्यादि गोष्टी मारुतीने म्हाताऱ्याला घोळून घोळून पटवल्या आणि अत्यंत बेफिकीराने गायीची किंमत विचारली. म्हातारा धायकुतीला आलेला होता. घरी परत जायला उशीर होत होता. दिवस फुकट गेला होता. त्याने सौद्यात फारसा बांधा यायला नको म्हणून दिवसभर लावलेली किंमत आवीच कमी करून मारुतीला सांगितली.

"सांजची येळ हाय... जादा सांगत न्हाइ.. सव्वासं रुपय द्या." म्हातारा म्हणाला.

"सव्वासं रुपयं ? म्हाताऱ्या टक्कुरं फिरलं का काय तुजं ? ही





अनुक्रमणिका

काय दुभती गाय हाय का तिला खोंड हाय ? उगा आपलं काइतरी बोलायचं म्हंजी काय ?" मारुती तोऱ्यात म्हणाला.

"ते खरं हाय...पर गाय तर बगा...अशी देखणी गाय बघिटलीत का कुठं ? तीन चार म्हइन्यात माजाला यील..."

"तवर पोसायचा खर्च करावा लागनारच न्हवं मला ?...तुजी गाय तूच न घरला परत..." असं म्हणुन मारुती निघाला.

"अरे पावनं....लगीच रुसुन चालल्यावाणी कुटं निगाला ?" म्हाताऱ्याच्या आवाजात काकुळती होती.

"मग काय हतं उभा ऱ्हाउन तुजं त्वांड बघित वसू ?"

"पर गाय घ्याची न्हवं तुमास्नी ?"

"घ्याची हाय हे खरं पर सव्वासं रुपयाची गाय घेन्याची शागीरदारी आपल्याकडं न्हाइ...जातो बाबा मी..." पुन्हा मारुती वळला.

"आमचं ऱ्हाउ द्या...तुमी तरी बोला....काय मनातलं तरी कळूद्या आमास्नी..." म्हाताऱ्याच्या आवाजात आता निश्चितच लाचारी आली होती. ती मारुतीनं नेमकी हेरली. तरी पण पंधरा मिनिटे त्याने म्हाताऱ्याला स्वतःची विनवणी करायला लावली--केवळ बोलण्यासाठी. मग वरेच आढेवेढे घेऊन, शब्दांची आतषबाजी करून, फालतू गोष्टी बोलण्यात वेळ काढून मारुतीने आपले कसब पणाला लावले. पुन्हा एकदोनदा रागानें परतण्याचे नाटक केले. म्हाताऱ्याला आपल्यामागून धावायला लावले. स्वतःची मनधरणी करायला लावली. म्हाताऱ्याच्या वयाची, बुद्धीची, अनुभवाची त्याने येथेच्छ अवहेलना केली. म्हाताऱ्याला जेरीस आणला आणि हे सर्व करीत असताना गाईची किंमत उतरवीत आणली. म्हातारा सव्वाशे रुपयावरून उतरत उतरत पन्नास रुपयांपर्यंत आला आणि मारुती पंचवीस रुपयावरून चढत चढत पस्तीस रुपयांपर्यंत पोचला आणि तिथे डोंगरासारखा घट्ट बसून राहिला. पन्नास आणि पस्तीसवर शेवटची रणधुमाळी माजली. निकराची लढत सुरू झाली. सगळा बाजार जवळ जवळ उठून गेला होता. अंधार उतरू लागला होता. म्हाताऱ्याला उद्याची सख्या मान्याची निकड भागविण्याइतकी रक्कम डोळ्यापुढे दिसत होती. हा क्षण गेला, ही वेळ फिस्कटली की उद्या आपली धडगत नाही. तेव्हा काय करायचं असेल, जे व्हायचं असेल ते आताच झालं पाहिजे, या जाणीवेनं म्हातारा टेकीला आला होता. मारुतीलाहि याची पुरेपूर कल्पना होती. डोके चिमटचात पकडलेला साप जसे आपल्या शरीराला झटके देऊन आपली जिद्द दाखवीत असतो तसा हा म्हातारा पन्नास रुपयावर जिद्द दाखवीत आहे. आता ह्या सौद्यातून आपली सुटका नाही याची त्याला पुरेपूर खात्री आहे. हे सर्व मारुतीने हेरले होते. आता एकदोन हिसके दिले की, साप थंडावणार आहे हेही तो जाणून होता. त्याला धीर होता, वेळ होता. मारुतीनं पाच पाच मिनिटांच्या अंतरानं एक एक रुपाया चढवला आणि शेवटी चाळीस रुपयावर सौदा तुटला. म्हाताऱ्याची नड भागली. मारुतीला अत्यानंद झाला.

दुसरे दिवशी जेव्हा मारुती ती देखणी खिलारी गाय घेऊन गावी परत आला आणि असली दहा हजारात उठून दिसणारी गाय त्याने केवळ चाळीस रुपयाना आणली ही गोष्ट जेव्हा गावकऱ्याना समजली तेव्हा गावकऱ्यानी आश्चर्याने तोंडात बोटे घातली आणि मारुतीच्या व्यवहार कौशल्यावर शब्दांची फुले उधळली. रखमा तर थक्कच झाली. गाईचं कौतुक करावं का नवऱ्याला डोक्यावर घेऊन नाचावं हेच तिला कळेना. हळद कुंकू लावून तिनं गाईला पंचारती ओवाळली तेव्हा पंचारतीचा एक फेरा तिनं हळूच मारुतीच्या दिशेनं फिरवला. घरात गाईच्या रूपानं आनंद अवतरला. पोरं गाईभोवती घुटमळू लागली. शेजाऱ्या पाजाऱ्यानी रखमाच्या भाग्याचा हेवा केला. मारुतीनं गाय आणली होती पण वाघ मारून आणल्याची मस्ती त्याच्या चेहेऱ्यावर दिसत होती. जो येईल त्याला उत्साहानं गाय दाखवीत होता. येणारा प्रत्येकजण किंमत ऐकून आ वासत होता.

"तुमची कमाल हाय वाकी सौदा करन्याची. कसं जमतं हो ह्ये तुमास्नी ?"

"त्येला डोकं लागतं. वाटल त्याचं काम न्हाइ ह्ये ? लइजण सौदा करत्यात... पर ह्या मारुतीसारखा सौदा पटिवणारा दुसरा माणूस अजुन जल्माला याचा हाय" अशा अहंकारी भाषेत मारुती आपले कसब प्रत्येकाला सांगत होता. मारुतीचा एक शब्दही खोटा नव्हता. अशी गाय पाहिली नाही. असा सौदा झाला असेल सर्वांचे मत झाले.

गाईच्या देखणेपणानं भारावलेलं घर थोडेसे पूर्वपदावर आल्यावर रात्री रखमाने गाईच्या संबंधातील इतर प्रश्न उपस्थित केले. गाय माजाला आली आहे का ? आली नसल्यास केव्हा येईल ? ती गाभण केव्हा राहील ? मारुती हसत म्हणाला, "तुम्हा बायकाना समदं झटपट व्हायला पायजेल. आपल्याला किती दीस दम धरावा लागला त्येचा जरा इचार कर......दोन चार म्हइन्यात माजाला यील की ती मग त्यो सरकारी केंद्राला जातिवंत वळू दावुन आणू तिला...एक वर्सभरात झकास खोंड अंगणात नाचल...अन् तू इचार कर ह्या गाइचा खोंड किती देखणा आसल ?...हजार बारासं रुपयाला मराण न्हाइ... ह्यो समदा म्होरचा इच्चार करून गाय घेतलिया मी....."

**अदृश्य व्यंगचित्रे !**




ही अदृश्य व्यंगचित्रे आणली आहेत. छापा नाहीतर तुम्हालाहि अदृश्य करीन... !





अनुक्रमणिका

नवऱ्याच्या दूरदृष्टीचं रखमाला भारी कौतुक वाटलं. वासरानं लाडानं गाईला ढुशी मारावी तसं तिनं मारुतीच्या कुशीत डोकं घुसळलं. रात्री दोन चार वेळा उठून ती गाईकडं बघून आली.

मारुतीनं सोलापुरात असलेल्या आपल्या धाकट्या भावालाही गाय पाहायला बोलावलं. भावाच्या व्यवहारकुशलतेने तोही भारावून गेला. अशी रूपवान गाय मारुतीला मिळाली याबद्दलचं कौतुक गावात बरेच दिवस तरंगत होते.

असे दोन, तीन, चार, पाच, सहा महिने गेले. गाय माजाला आली. मोठ्या समारंभाने मारुतीने तिला सरकारी केंद्रावर नेले. पण गाय वळूच्या वाऱ्यालाही उभी राहीना. मारुतीने खूप खटपट केली. पण ती देखणी गाय वळूलाही बधेना आणि मारुतीलाही दाद देईना. तिचा रुद्रावतार पाहून मारुती चरकला. गाय न फळता घरी परत

आली. कुणीतरी करणी केली असणार म्हणूनच असे झाले याबद्दल सर्वांचे एकमत झाले. मग देवऋषी, अंगारे, धुपारे झाले. गाईची दृष्ट काढण्यात आली. म्हाताऱ्या–कोताऱ्यानी सांगितलेले उपाय करून झाले. पण यश आले नाही. गाय फळायलाच तयार होईना. वळू बदलून पाहिले. जागा बदलून पाहिल्या. सर्व काही झाले. मारुती हताश झाला. गाईबद्दलचा उत्साह, उमेद थोडी कमी झाली तरी आशा मात्र कायम होती.

अशात एके दिवशी मारुतीचा चुलत सासरा घरी आला. रखमानं आपल्या काकाला गाईची कथा सांगितली. म्हातारा अनुभवी होता. दुसरे दिवशी सकाळी त्यानं गाईची पाहणी केली. तिच्या तोंडात हात घालून तिचे दात तपासले. सडाना हात लावून ते चाचपून पाहिले. पोट, डोळे यांचीही कसून तपासणी केली. मारुती आणि रखमा मोठ्या आशाळभूत नजरेने त्याच्याकडे बघत होती. म्हाताऱ्याने सर्व तपासणी झाल्यावर खेदाने मान हलवली आणि म्हणाला, "तुमी फसलात ह्या गाईच्या सौद्यात."

कुणीतरी बलदंड माणसाने सणसणीत कानशिलात मारावी तसे ते शब्द मारुतीला लागले. आजपर्यंतच्या त्याच्या लौकिकाचा, व्यवहारकुशलतेचा, अहंकाराचा म्हाताऱ्याच्या एका वाक्याने चक्काचूर झाला होता. तो मूर्ख ठरला होता. तो काहीतरी तिरमिरीत बोलायचा विचार करीत होता तोच म्हातारा पुढं म्हणाला, "गाय वांझ हाय. माजाला येती पर फळत न्हाइ... काइएक उपेग न्हाइ ह्या जनावराचा... सा म्हइन्याचा खर्च मातीत गेला असं समजा आन् जनावर काढून टाका... तुमीच इचार करा इतकं देखण जनावर चाळीस रुपयाला कुनी दील कां ?... त्येनं किंमत वडुन धरायचं नाटक केलं. आन् तुमी फसलात."

मारुती उलटा पालटा झाला. आजपर्यंतच्या कीर्तीला लागलेल्या ह्या कलंकाने तो खचून गेला. रखमापुढे उभारलेली खोंडाची, खोंडाच्या किमतीची, त्यातून घ्यावयाच्या वस्तूची स्वप्ने कोसळून मातीला मिळाली. आपल्या पराभवापेक्षासुद्धा आपल्या व्यवहारकुशलतेवर आणि नाटकीपणावर एका लाचार दिसणाऱ्या म्हाताऱ्याने मात करावी व आपण त्यात फसावे याची जखम फार ठणकत होती. "त्ये म्हातारं तसं लई गरीब वाटत हुतं....." एवढंच तो बोलला.

रखमाचा चुलता मारुतीच्या झगझगीत स्वप्नाची मोडतोड करून निघून गेला. मारुती अहंकारावर बसलेल्या घावाने व्याकळ होऊन विचार करीत राहिला. ही वस्तुस्थिती गावातल्या लोकाना कळून आपली फटफजिती होण्यापूर्वीच गाय विकून टाकली पाहिजे. अगदी तातडीने ती विकली पाहिजे. कारण तिच्या वांझपणाची बातमी गावात पोचल्यावर गाईला गिऱ्हाईक मिळणार नाही. पण गाय एकदम विकायची आहे असा बभ्रा झाला तरी लोक साशंक होतील. गाईच्या बाबतीत आपण आजवर दाखवलेला उत्साह, तिची आपण केलेली स्तुती, कौतुक याचं काय होईल ? लोकाना काय वाटेल ? अशा असंख्य प्रश्नांच्या गुंत्यात मारुती अडकून बसला.

त्यावर त्याने काढलेली तोड अचूक होती हे मात्र खरं. त्याने तातडीने धाकट्या भावाला बोलावून घेतले. दोघांचे बराच वेळ बोलणे झाले. आणि दुसऱ्या दिवशी गावातल्या दहावीस निवडक माणसाना चहाला बोलावण्याचे ठरले. माणसे चहासाठी आली की, धाकट्या भावाने बाहेरून घरात यायचे आणि रागारागाने मारुतीला गाय विकून टाकण्याची सूचना करावयाची व नंतर मारुतीने जे काय करायचे ते करायचे असा बेत नक्की झाला. हे एवढे नाटक कशासाठी हे कुणालाच कळेना. पण आपला नवरा जे कांही करतो त्यात अकलेचा भाग फार दूरवरचा असतो याबद्दल रखमाची खात्रीच होती.

दुसरे दिवशी ठरल्याप्रमाणे गावातली दहा पंधरा माणसे चहासाठी मारुतीच्या घरी आली.. इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर गाईचा विषय ओघात आला. मारुतीने पूर्वीच्याच उत्साहाने गाईचे कौतुक केले. भाग्यलक्ष्मी म्हणून तिचा गौरव केला आणि बोलता बोलता सहज आपल्या धाकट्या भावाला मात्र आपण गाय घेतल्याचे अजिबात पसंत पडले नाही असे सांगितले. साहजिकच सर्वांनी धाकट्या भावाला–शंकराला–मूर्खात काढले. एवढी बोलाचाली होते न होते तोच शंकर रागारागाने बाहेरच्या दरवाज्यातून आत आला. एकदा रागाने त्याने गाईकडे पाहिले आणि पायऱ्या चढून सोप्यात येऊन तो उभा राहिला. तिथं बरीच माणसं आहेत याची दखल न घेता तो मारुतीला म्हणाला, "ह्ये बघ मारुतीदादा, कालपास्नं मी तुला तीनदा सांगिटलं..... पुन्हा येकडाव सांगतो. ही गाय आपल्याला न्हाइ पायजेल."












"अरं पण कां ?" मारुतीही थोडचाशा रागाने म्हणाला.

"का काय का ? येक तर गायीची शिंगं भयानक हैत... मारलं विरलं शिंग तर पोर मरलं फुकाट... आन् दुसरं म्हंजी ही गाय घेतल्या पासनं माज्या घरात सारकं आजारपण आलया..." शंकर म्हणाला.

"आजारपण काय गाईपायी आलया ? उगा आपलं काइतरी बोलायचं म्हंजी ?"

"मला प्रचेती आली म्हणुन बोललो मी... उगा न्हाइ बोललो. माजं ऐकायचं नसल तर तसं सांग.. पुन्यांदा ह्या घरात पाउल टाकनार न्हाइ मी...आता भाऊ पायजेल का गाय पायजेल ते तू ठरीव. मला ही गाय खपायची न्हाइ यवडच सांगतो मी" असं म्हणून तो तरातरा आत निघून गेला. मारुतीनं भावाच्या तऱ्हेवाईकपणावद्दल नापसंती व्यक्त केली आणि हा नवा पेच कसा मिटवायचा याच्या चिंतेनं भाकर पण गोड लागेनाशी झाल्याचे जाहीर केले. भावाभावांच्या मतभेदात वाहेरची माणसे काय वोलणार ? त्यानी फक्त ऐकून घेतले आणि ती घरोघर निघून गेली.

परिणाम असा झाला की, मारुती वहुतेक गाय विकणार अशी कुजवूज गावात सुरू झाली. भावापेक्षा गाय काही भारी नाही. तेव्हा भावाला दुखवण्यापेक्षा गाय गेलेली त्याला परवडेल अशीही चर्चा गावात सुरू झाली. अशी देखणी गाय पुन्हा शोधून मिळण्यासारखी नव्हती. तेव्हा मारुतीची गाय आपल्याला विकत घेता आली तर फार वहार होईल अशी प्रत्येकाच्या मनात सुप्त इच्छा निर्माण झाली. शिवाय गाईची किंमत सगळ्यानाच माहीत होती.

गावातल्या काही लोकानी हळूच खडे मारून पाहिले. मारुती मोठ्या कष्टाने या विषयावर वोलू लागला. गाय विकण्याची कल्पनाच त्याला सहन होत नव्हती. त्याच्या यातना त्याच्या तोंडावर स्पष्ट दिसत होत्या. एकीकडे तो गाय विकावी लागणार या कल्पनेने हळहळत होता आणि दुसरीकडे शंकरच्या अडाणीपणाला शिव्या देत होता. एकदोनदा तर गाईच्या संवधात वोलताना त्याच्या डोळ्यात पाणीसुद्धा आले. त्याच्या यातना गावालाही वघवत नव्हत्या. त्या यातना गावानं मान्य केल्या होत्या पण मारुती सांगत होता ती गाईची किंमत मात्र गावकऱ्याना मान्य होत नव्हती. चाळीस रुपयाना घेतलेली गाय साठ रुपये किंमतीला विकणं गावकऱ्याना पटत नव्हते. पण मारुतीचे म्हणणेही रास्त होते.

"ह्या गाईवर इक्ता जीव हाय माजा...ती काय जड हाय का मला पोसायला ? चाळीस रुपयाला घेतली हे खरं हाय. पर सा म्हइने तिला पोसली त्याला काड्वी खर्च आला नसल ? असली देखणी गाय कुनी इकील का कदी ? आमच्या शंकऱ्याचं डोस्क फिरलं म्हणुनच ती इकायची दुसरं काइं न्हाई...सोन्यासारखी गाय ...कुनीबी हसत दोनसं रुपय दील...पर गावच्या मानसातच न्हायचय् मला... त्येनला खरेदीची किंमत म्हाइत हाय म्हणून साठ रुपयाचा भाव लावला. ईस रुपय बी मला सुटायला नगत ?"

तरीपण गावकरी मंडळी साठ रुपये देण्यास खळवळ करीत होती. मारुतीची देखणी गाय विकायची आहे ही वातमी आजुबाजूच्या

गावातही जाऊन पोचली होती. अर्थात् त्यातल्या सर्वानाच गाईची मूळ किंमत माहीत नव्हती. मारुतीनं एक दोन बाजार केले. दीडशे, सव्वाशे व शेवटी शंभर रुपयांपर्यंत किंमत उतरवूनसुद्धा गाईला गिऱ्हाइक मिळाले नाही. पण मारुतीनं धीर सोडला नाही. त्याच्या व्यवहारकुशलतेला धीर सोडणं परवडत नव्हतं.

मारुतीच्या चिकाटीला पुन्हा यश आले आणि नेवऱ्याच्या बाजारात मारुतीने आपली देखणी गाय ऐंशी रुपयाला विकून टाकली. ऐंशी रुपयाना गाय विकल्याचे कळल्यावर गावकऱ्याना पुन्हा एकदा मारुतीच्या व्यवहारदक्षतेचं कौतुक वाटलं. "त्ये बेनं कदीच फसायचं न्हाइ बगा" असे कौतुकाचे उद्गार सगळ्यानी काढले. रखमालाही आपल्या नवऱ्याचा पुन्हा एकदा अभिमान वाटला. मारुतीने आपल्या धाकट्या भावाला कागूद घालून आपली मर्दूमकी कळवली. त्याचा ढासळलेला अहंकार पुन्हा फडा काढून गावातून फिरू लागला. पहिल्याने आपल्याला गाय विकणाऱ्या लाचार म्हाताऱ्यावरही आपण शेवटी मात केली याचा अभिमान वाटून त्याच्या अहंकाराला झालेल्या जखमा भरून आल्या. चाळीस रुपयांची देखणी गाय ऐंशी रुपयाला विकणारा मारुती पुन्हा एकदा गावाच्या चर्चेचा विषय झाला. आपला लौकिक, कीर्ती, कर्तृत्व तावून सुलाखून निघाले याचा त्याला साक्षात्कार झाला. "सौदा करायला डोकं वापरावं लागतं....उगाच वाटंल त्याला जमत न्हाइत या गोष्टी" असं तो पुन्हा सर्वांना ऐकवू लागला.

फसलेल्या व्यवहारातून आपण सुखरुपपणे बाहेर पडलो याचा आनंद बरेच दिवस मारुतीच्या घरात तरंगत होता. हळुहळू रोजच्या बोलण्यातून गाईचा विषयही नाहीसा झाला. सर्व घर गाईला विसरून गेले.

आणि एके दिवशी रखमा तणतणत बाहेरून घरात शिरली. मारुती सोप्यावर बसला होता.

"जळ्ळं तुमचं लक्षण..."

"अग काय झालं बरडायला इक्तं ?" मारुती वैतागानं म्हणाला.

"ही आत्ता मी. जनीच्या घरनं आले. तिनच ह्ये दिलं." हातातलं पातेलं दाखवीत रखमा म्हणाली.

"अग पर काय ते सांग ना..." मारुती दूरच होता.

"तुमी त्या जनीच्या दाजीबाला गाय इकली ती व्याली न्हवं का? खोंड झालाया.... अन् जनीनं ह्यो चीक दिलाया खरवसासाटी." मारुती जागच्या जागी खिळून राहिला. तोंड वासून रखमाकडे बघत राहिला. ध्यानी मनी नसताना घराचं छप्पर कोसळावं आणि आपल्याला काहीही करता येऊ नये अशा वेळी माणूस जसा हवालदील होतो तसा मारुतीचा चेहेरा दिसत होता. बऱ्याच वेळानं त्याच्या डोळ्याची पापणी हालली आणि तोंडातून शिव्यात गुरफटलेले शब्द आले—

"मायला त्या तुज्या म्हातारड्या चुलत्यानं आपलं थोबाड मातीत का न्हाइ घातलं हतं आणून दाखवण्यापरीस ?"

• • •

घ्या इथे, तरुतळी —

साहसी, प्रणयी, नशाबाज, बेहोप, बेछूट, बेधुंद तेवढ्याच रंगेल आणि अति लोकप्रिय **एरॉल फ्लिन** याने खुल्या दिलाने लिहिलेली ही आत्मकथा. रोचक, रोमहर्षक, रोमांचित करणारी आणि तितकीच रंजक.... !



'द न्यू ॲडव्हेंचर्स ऑफ डॉन जोन' ह्या चित्रपटात एरॉल फ्लिन आणि व्हिवेका लॅनफॉर्स

# "ऐतळ मी बेधुंद भी!"

-प्रभाकर अत्रे

आत्मचरित्रे कशी प्रामाणिक असावीत हे पहायचे असेल तर एरॉल फ्लिन् या जगप्रसिद्ध अमेरिकन नटाचे 'मॉय विकेड विकेड वेज्' हे आत्मचरित्र जरूर जरूर वाचावे. एरॉल फ्लीन ह्या नटाचे हे आत्मचरित्र आपल्याला केवळ 'हॉलिवुड'मध्ये घेऊन जात नाही. तर त्याच्या बरोबर आपण समुद्रपर्यटनाला जातो. युद्धभूमीवर जातो. नाटक कंपनीच्या बिऱ्हाडी जातो. जुगारी अड्ड्यात जातो. दारूच्या बारमध्ये जातो. स्टुडियोत जातो आणि कोर्टकचेऱ्यातले विविधरंगी खटलेही आपण पाहतो. निष्ठावंत स्त्रियाही येथे आपल्याला दिसतात आणि एरॉलवर 'रेप'चे खोटे खटले भरणाऱ्या व त्याचे जीवन उध्वस्त करायला निघणाऱ्या काही 'विकृत' मनोवृत्तीच्या स्त्रियाही भेटतात. हे बहुरंगी व बहुढंगी व्यक्तित्व शोधून काढण्याचा प्रयत्न मी ते पुस्तक वाचताना केला. पांचशेबारा पानी पुस्तकातल्या ठासून भरलेल्या साऱ्या घटना येथे नोंदविणे केवळ अशक्य ! एरॉल हा काही केवळ सामान्य नट नव्हता. तो एक सिद्धहस्त लेखकही होता. म्हणूनच ह्या आत्मचरित्राला रुक्ष दैनंदिनीचे स्वरूप आलेले नाही. जीवनाप्रमाणेच त्याचे लेखनही समृद्ध व प्रसन्न आहे. आत्मचरित्र म्हणून व कलाकृति म्हणूनही हे पुस्तक मुळातून वाचण्यासारखे आहे. येथे सादर करणार आहे ती केवळ त्या चरित्राची एक झलक !!

प्रस्तुत आत्मचरित्राची मांडणी एकूण पांच विभागात केली गेली असून १९०९-पासूनचा जीवनालेख त्यात शब्दबद्ध करण्याचा प्रयत्न एरॉलने केला आहे. १९०९ ते १९२७–**'टास्मानियन डेव्हिल'** ह्या प्रकरणात त्याची जीवन कथा सुरू होते.

एरॉलचे आईवडील हे ऑस्ट्रेलियात जन्मले. चोविसाव्या वर्षी त्याच्या वडिलांनी मरीन बायॉलॉजिस्ट म्हणून काम पत्करले. यंग नावाच्या एका कुटुंबाशी त्यांचा संबंध आला. त्या कुटुंबात तीन सुंदर तरुणी वावरत होत्या. **ॲलिस, बेटी आणि मारेल** ही त्यांची नावे. त्यांच्या वडिलांचे लक्ष होते बेटीत. परंतु मारेलनेच एरॉलच्या वडिलांना गाठले. आणि तिने त्यांच्याशी लग्न लावले. लग्न लागल्यानंतर त्याचे वडील आणि आई अरोरा नावाच्या बोटीवर होते. वडिलांचे संशोधन कार्य चालू होते. बोट ऑस्ट्रेलिया–टास्मानियाच्या समुद्रात असतानाच त्याची आई गरोदर असल्याचे ध्यानी आले. म्हणून एरॉलच्या वडिलानी तिला **होबार्ट** येथे उतरवून दिले. तिची काही सोय करायला सांगितली. आणि ते पुढे मोहीमेवर निघून गेले. पुढे वडिलानी होबार्ट येथे प्रोफेसरकी पत्करली आणि सर्वजण तेथे राहू लागले. एरॉलचे बालपण तेथेच गेले. त्या बालपणातल्या आठवणीसंबंधी लिहिताना तो म्हणतो– "होबार्टची जी काही आठवण मला आठवते



अनुक्रमणिका

मंथनातून मानवी ज्ञान व प्रज्ञा उत्पन्न झाली. माणूसही समुद्रातून उत्पन्न झाला. पण तू मात्र आता उलटा प्रवास सुरू केला आहे. भूमीकडून समुद्राकडे !"

**पहिली इच्छापूर्ति**

एरॉल तेरा चौदा वर्षांचा असतानाची गोष्ट ! तो आणि त्याची बहीण **रोजमेरी** हे दोघेच घरात होते. आईवडील दौऱ्यावर गेले होते... **कॅरी** नावाची मुलगी त्यांचा सांभाळ करायला व घरात कामासाठी ठेवलेली होती. स्त्री ह्या विषयात एरॉलला तेव्हाही फार कुतुहल होते. कॅरी पुस्तक वाचत खुर्चीवर बसली होती. एरॉलने तिच्या पायाशी चाळा करायला सुरुवात केली. काही वेळ तिने तो सहन केला. मग ती एकदम उठत म्हणाली, "मी किती देणं लागते तुझं ?" वास्तविक तिच्या मनात मी तुला किती किती मानते रे असं म्हणायचं होतं. कारण ती अधुनमधून एरॉलकडून हातउसने पैसे घेत असे. एरॉलने चटकन् उत्तर दिले "एक शिलिंग नऊ पेन्स."

"चल तर !" असे म्हणत कॅरी त्याला अंथरुणाकडे घेऊन गेली. त्याला काहीच अनुभव नव्हता. ती म्हणाली, "मूर्ख माणसा, मला मूल व्हावे अशी तुझी इच्छा दिसते ! काय इच्छा आहे तुझी ?

"माझी कर्जफेड झाली" असं एरॉल म्हणतो. त्यानंतर कॅरीने घरात काही सांगितले नाही. पण ती निघून मात्र गेली– कायमची !!

"काय करतो आहोत ह्याची जाणीव नसलेल्या वयातली ही एरॉलची पहिली "भानगड!!"

**पहिले प्रेम**

त्यानंतरच्या काळात लंडन व ऑस्ट्रेलिया-तील शाळात एरॉलची नावे घालण्यात आली. पण प्रत्येक वेळी बापाची प्रोफेसरकी काही त्याला वाचवू शकली नाही. शाळेच्या जगापेक्षा बाहेरच्या विशाल जगातच शिकण्यासारखं व करण्यासारखं पुष्कळ आहे अशी एरॉलची धारणा होती. तो स्वतःच एके ठिकाणी म्हणतो, "भिंती आणि कुंपणे असलेल्या शाळांसारख्या संस्थांच्या बद्दल माझ्या मनात तीव्र घृणा होती."

मरण सोसावे परि पहिले....

●



एरॉल फ्लिन आणि नोरा ॲडिंगटन

यावेळी त्याच्या जीवनात एक प्रेयसी आली. तिचे नाव **निओमी डिक्स** ! त्याने तिला लग्नाची सूचक अशी अंगठी भेट म्हणून दिली. त्यासाठी त्याने कुणाकडून तरी उसने पैसेही घेतले. त्याच सुमारास त्याच्या वडिलाना मोठा व्हेल मासा सांपडला. तो मासा दुर्मिळ असा होता म्हणून त्याला इंग्लंडमधील म्युझियममध्ये ठेवण्यात आले. त्याचे वडील इंग्लंडला गेले व एरॉल सिडने येथे एकटाच राहिला. शाळेत दांडया मारण्याचे सर्व पूर्वीचे रेकॉर्डस् त्याने मोडले. शाळेत असताना एल्सा ह्या नावाच्या मुलीवरून एरॉलची आणि लिंडसे नावाच्या एका मुलाची खूप मारामारी जुंपली. तो मुलगा फार सशक्त होता. म्हणून त्याला पाण्यातच आपण जिंकू या कल्पनेने एरॉलने त्याला पाण्याकडे लोटले. त्याला कुस्ती ठाऊक नव्हती. पण त्याला पाणी ठाऊक होते. त्यात एरॉलने त्याला जिंकले. एका बोटीच्या खलाशानी लिंडसेला व एरॉलला बाहेर काढले तेव्हा लिंडसे बेशुद्ध झाला होता. नंतर त्याला शुद्धीवर आणला. पोटातले पाणी काढले. त्यात एरॉलनेही मदत केली. लिंडसेची वर्गातली भीति पार गेली. पण एरॉलला शाळेतून काढून टाकण्यात आले.

**फक्त सतरा वर्षातील भानगडी**

वडिलांचे खोटे नाव सांगून त्याने एका लोकरीच्या व्यापारी कंपनीत नोकरी धरली. तेथे थॉमसन नावाचा माणूस कॅश सांभाळीत असे. पण त्याला रेसचा नाद होता. त्या प्रकरणात एरॉललाही त्याने गुंतविले. पैशांचा गैरवापर ध्यानी आला. एरॉलची व थॉमसनची नोकरी गेली. **निओमीचे** आणि त्याचे ह्या सर्व वर्तनावरून भांडण झाले. संबंध संपले. तिने त्याची अंगठी संतापाने परत केली. त्याने ती घेतली. न्यूगिनीला जाण्याचा, पैसे मिळविण्याचा आणि त्यासाठी टास्मानिया-सिडनेला पळून जाण्याचा त्याने निश्चय केला होता. निओमीला त्याने तो बोलूनही दाखविला होता.

ते १९२६ साल होते. एरॉल फक्त सतरा वर्षांचा होता !

[क्रमशः]













अनुक्रमणिका

# प्रोफेसरची बायको

-सदानंद रेगे

*हे असलं काही विचित्र, अद्भूत माझ्या आयुष्यात कधी घडलंच नव्हतं. युरोपात हव्या तेवढ्या मुली मिळतात, नको नको म्हणत असतानाही त्या गळ्यात येऊन पडतात वगैरे वगैरे खप ऐकलं होतं; पण जे घडलं त्यानं मी निर्वल झालो, असहाय्य बनलो....खरं म्हणजे मला काही कळतच नव्हतं....*



प्रोफेसर म्हणाले, "ही तुझी खोली." मग ते माझ्यावरोबर खोलीत आले. सर्व काही जागच्या जागी आहे की नाही, हे त्यानी पाहून घेतलं. ते जायला निघाले. जाताना पुन्हा म्हणाले, "आता मी जातो. गुड नाईट. स्लीप अँड ड्रीम हॅपिली." जाताना त्यानी दार लावून घेतलं. जिन्याच्या काही पायऱ्या ते उतरल्याचा आवाज आला. पुन्हा ते मागे वळल्यासारखं वाटलं. परत आल्यावर त्यानी दार वाजवलं. मी लागलीच दार उघडलं नि विचारलं, "यस सर?"

"काही नाही, एक गोष्ट सांगायची राहिली म्हणून पुन्हा आलो एवढंच. आय डू नॉट नो हाऊ ऑल ऑफ् अस् प्रोफेसर्स विकम् ॲबसेंटमाईंडेड."

मी टेबलाजवळची बॅग उचलून खिडकीपाशी एक कपाट होतं तिथं नेऊन ठेवली.

"एक सांगायचं राहिलं. रात्री कसले विचित्र आवाज ऐकायला आले तर तिकडे लक्ष देऊ नकोस. आमच्या घराच्या वळचणीत कबुतरं आहेत नि ती घुमायला लागतील. कदाचित् रात्रीच. होऽऽ अन् तुझा थिसिस् आवडला बरं का आम्हाला. अच्छा, आता मी जातोच. गुड नाईट."

त्यानी आपला भला मोठा हात वर उचलून मला गुड नाईट केलं नि ते निघून गेले.

पलंगाच्या कडेवर बसून मी बूट काढू लागलो. बूट काढता काढता जमिनीवरच्या गालिच्याची नक्षी न्याहाळून पाहिली.

सहजासहजी न विसरता येण्यासारखा दिवस होता आजचा माझ्या आयुष्यात.

एम्. एस्सी.चा निकालहि अद्याप लागायचा होता. पण तेवढ्यात या स्कॉलरशिपचं कळलं. दुसरा उद्योग नव्हता म्हणून अर्ज केला अन् काय नशीब खुललं कोण जाणे माझी निवड झाली. इथं आलो. आठ–दहा महिने सख्त काम केलं नि माझा थिसिस् पुरा केला. त्याबद्दल ऐकून प्रोफेसर रुडाल्फ हिलमन् यानी मला मुद्दाम बोलावून घेतलं होतं. प्रोफेसरांचं आमंत्रण आलं नि मला आकाश ठेंगणं वाटायला लागलं. ॲस्ट्रोफिजिक्स-वरल्या एवढ्या अधिकारी व्यक्तीनं आप-ल्याला मुद्दाम बोलावून घ्यावं या गोष्टीचा अहंकार जिंकणाऱ्यालाहि अभिमान वाटला असता.

प्रोफेसरांची वेधशाळा स्टेशनापासनं तब्बल तीन मैलांवर होती. प्रवासाचा खूप शीण आला होता. वेधशाळेपर्यंत यायला मला संध्याकाळ झाली. पण इथवर येऊन पोचल्यानंतर मात्र प्रोफेसर आणि त्यांची नॉर्वेजियन पत्नी या दोघानी माझं जे स्वागत केलं त्याला खरोखरच तोड नाही. मी येईपर्यंत त्यानी आपलं संध्याकाळचं जेवणहि घेतलं नव्हतं.

जेवणं झाल्यावर आम्ही बाहेरच्या बागेत येऊन बसलो. प्रोफेसरांची बायको माझ्या समोरच्याच खुर्चीवर बसून त्यांच्या भल्या मोठ्या मोज्याला रफू करीत होती, नि एका जाडजूड वेताच्या खुर्चीत बसलेले प्रोफेसर चिरूट ओढता ओढता माझ्याशी अनेक विषयांवर बोलत होते.

प्रोफेसरांच्या बायकोनं मात्र मला मोजकेच प्रश्न विचारले. तुझं लग्न झालंय् का?— तुमच्या देशातील मुली कपाळावर लाल ठिपका कसला लावतात? लग्न झाल्यावरच तो लावतात कां? मग विधवा तो कां लावीत नाहीत? तुमच्या देशात पावलोपावली विषारी सर्प, वाघ नि हत्ती असतात हे खरं का? तुमच्या देशात गायी भर रस्त्यातून भटकत असतात असं कां?

पण हे सारं चालू असताना एक गोष्ट मात्र माझ्या नजरेतून निसटू शकली नव्हती. अन् ती म्हणजे रफूचा दोरा तोडण्यासाठी ती मोजा दाताजवळ नेई तेव्हा प्रत्येक वेळी तिचे हिरवे हिरवेगार डोळे मांजरासारखे माझ्याकडे लागलेले असत.

आमची जेवणं होत होती तेव्हा एक शब्दहि ती माझ्याशी बोलली नव्हती. मातीच्या हलत्या चित्रांच्या प्रदर्शनातील बाहुल्या तोंडावाटे चकार शब्दहि न काढता नुसत्या यांत्रिक हालचाली करीत अस-तात, तशी ती टेबलावरील बशा ठेवीत होती, उचलीत होती. पण प्रोफेसरांच्याच व्यक्तिमत्वाइतका तिच्या या मूकतेचाहि प्रभाव माझ्यावर पडला होता, हेहि तित-कंच खरं.

त्यांचं लग्न होऊन उणंपुरं वर्ष झालं होतं (हे सारं मला प्रोफेसरानीच सांगितलं.) त्यांचं लग्न झालं तेव्हा प्रोफे-सरांचं वय होतं साठीच्या घरात नि ती होती जेमतेम पंचवीस वर्षांची. त्यांच्या लग्नाची बरीच चर्चा वर्तमानपत्रातून झाली होती.

घर तर अगदी प्रोफेसरांच्याच थाटाचं होतं. प्रत्येक खोलीत पुस्तकं नि फायली पडलेल्या. अगदी अस्ताव्यस्त. जिथं जागा रिकामी असेल तिथं मायक्रोस्कोप तरी असायचा किंवा तसलंच एखादं शास्त्रीय उपकरण. स्वैपाकघराचीच जागा तेवढी नीटनेटकी होती. कारण या खोलीत प्रोफे-सरांचा संचार फारसा होत नसे. स्वैपाक-घराच्या भिंतीला रंगहि मोठा छान काढलेला होता. प्रत्येक वस्तू अगदी जागच्याजागी नि टापटिपेनं लावलेली. दारांच्या कड्याहि अशा चमचमत की नाही म्हटलं तरी तिकडे लक्ष जावं.

स्वैपाकघरात असली तर ती स्वत:शीच गाणं गुणगुणत असायची. आमच्यात येऊन बसली की मात्र अगदी गुपचुप रहायची. बोलणं मात्र लक्षपूर्वक ऐकायची. तिची बोटं लांबसडक नि रक्तहीन असली तरी सुंदर होती. बायकांकडे इतक्या बारकाईनं मी आजवर कधीच पाहिलं नसलं तरी एवढी सुंदर बोटं क्वचित् कुठं पहायला मिळतील हे मात्र मला जाणवत होतं. तिची अंगकाठीहि इतकी शेलाटी नि लवचिक होती की, त्यामुळे तिची प्रत्येक हालचाल पहाणारांची नजर वेधून घेतल्याशिवाय रहात नसे.

मग आम्ही आमच्या दिवाणखान्यात आलो नि बोलत बसलो होतो म्हणेच बसलो.

प्रोफेसरानी आपल्या भल्यामोठ्या कोटाच्या खिशातून पांढरे ठिपके असलेला रुमाल काढला नि त्याला आपलं नाक खुपसून ते केवढ्यांदातरी शिंकले. मग त्यानी ॲश ट्रेवरचा चिरूट पुन्हा तोंडात ठेवला नि बसल्या बसल्याच दोन्ही हात वर करून आळस देत ते म्हणाले, "तुझ्या थिसिसबद्दल माझ्याकडे उत्तम रिपोर्ट आलाय्. आता रात्री मी तो वाचेन. तूहि खूप दमला असशील. आपण आता झोपूया–हो, पण तुझी हरकत नसली तर!"

याबरोबर आम्ही तिघेहिजण उठून उभे राहिलो. प्रोफेसरांच्या बायकोनं आपल्या हातातला मोजा, सुई, दोरा नि अंगुष्ट एका लहानशा टोपलीत घातलं नि ती टोपली तिनं एक स्टॅंडवर ठेवून दिली.

"तू कॉफी घेणार का झोपण्यापूर्वी?" तिनं मला विचारलं. एकदा मनात आलं 'हो' म्हणावं. पण लगेच मी 'नको' म्हटलं.

"चल मग तुला खोली दाखवते तुझी." तो म्हणाली.

तेवढ्यात प्रोफेसर पुढे झाले. त्यानी तिच्या केसांवरून हात फिरवल्यासारखं केलं नि पुढे वाकून तिच्या डोळ्यात पाहता पाहता त्यांनी तिची कोवळी हनुवटी उजव्या हाताच्या तर्जनीनं वर उचलून धरली.

"हेल्गा, मी दाखवतो याला खोली. तू जा आता झोपायला. अन् बरं का? माझ्या वस्तु नि पुस्तकं पडली आहेत

तिथंच असूं देत. नाही तर वसशील तू ती झकपक लावत. काय, कळलं ना?"

"कळलं, चांगलं कळलं." ती मख्ख आवाजात म्हणाली.

प्रोफेसर माझ्याकडे पाहून खुदकन् हसले अन् एकदम त्याना भलीमोठी शिंक आली. पण ती त्यानी आतल्या आत दाबून टाकली तेव्हा त्यांचा चेहरा क्षणभर घामाघूम झाल्यासारखा वाटला.

ती पुढं झाली नि माझ्याशी नुसताच शेकहँड करून ती तरातरा निघून गेली. खोलीत गेल्यावर तिनं दार लावून घेतल्याचा आवाज आला. मी प्रोफेसरांच्या मागोमाग माझ्या खोलीकडे चाललो होतो.

"ही तुझी खोली."

रात्री ऐकू येणाऱ्या विचित्र आवाजाची सूचना देऊन ते निघून गेले नि मी बिछान्याच्या कडेवर बसून बूट काढीत गालिच्यावरची नक्षी न्याहाळू लागलो.




प्रोफेसरानी माझ्या थिसिसची जो प्रशंसा केली होती तिनं मी हुरळून गेलो होतो यात शंकाच नाही. पण याहीपेक्षा काही अधिक झालं होतं. काय ते नेमकं कळेना. मोज्याला रफू करणारी ती लांबसडक बोटं माझ्या मनश्चक्षूंसमोरून हलत नव्हती. ते मांजराच्या डोळ्यांसारखे हिरवे हिरवे डोळे अजून माझ्याकडे टक लावून पहात होते. प्रोफेसरांसारखा एवढा जगद्विख्यात अॅस्ट्रो–फिजिसिस्ट नवरा. अन् तारुण्याच्या उंबरठ्यात दुसऱ्या एका तरुणाची प्रतिक्षा करणारी ती निर्व्याज युवती. त्यांचं वैवाहिक जीवन सुखी असेल का? या क्षणी तिच्या मनात काय काय चाललं असेल? आपलं आयुष्य या वेधशाळेच्या विमनस्क परिसरात ती कसं व्यतीत करीत असेल? प्रोफेसर वयोवृद्ध होते. त्यामुळं त्यांच्या ज्ञानाला नि कीर्तीला एक विशेषच डौल प्राप्त झाला होता. पण या साऱ्याचा तिला काय उपयोग? ती मांजराच्या पिलासारखी होती. एका भल्या मोठ्या खोलीत ती एकटीच खेळत होती. बरोबर कुणी नव्हतं. एखादं खेळणंसुद्धां नव्हतं. . .पण जाऊंदे, आपल्याला काय करायचंय्?

दिवसभरच्या प्रवासात मी पार थकून गेलो होते. निजेच्या वजनानं डोळे जडावत चालले होते. मी कपडे काढले नि अंथरुणावर पडलो. कधी झोप लागली कळलंहि नाही.

रात्री आचानक जाग आली. आपल्या खोलीत कुणीतरी असल्याचा भास मला होऊ लागला. मी पडल्या पडल्याच चाहूल घेऊ लागलो. तेवढ्यात दारापाशी काहीतरी सळसळल्यासारखं वाटलं. कुणाचा तरी कापरा आवाज कानी पडल्यासारखा वाटला. क्षणभर मी घाबरल्यासारखा झालो. पण लगेच प्रोफेसरसाहेबांचे ते शब्द आठवले. रात्री कदाचित् काही विचित्र आवाज ऐकायला आलेच तर... मी तिकडे दुर्लक्ष करण्याचा प्रयत्न केला. कूस बदलली नि पांघरुण अंगावर ओढून पुन्हा डोळे मिटले.

पण असं कसं होईल? हा आवाज, ही सळसळ छपरातील कबुतरांची नक्कीच नव्हे. आपल्या खोलीत कुणीतरी आहे—नक्कीच. क्षणभर माझी भीतीनं तारांबळ उडाली. त्याच झटक्यात मी अंगावरचं पांघरुण काढून टाकलं—अन् माझा हात कुणाला तरी लागला....नक्कीच खोलीत कुणीतरी आलंय्. . त्याच तिरमिरीत मी ताडकन् उठून बसलो.

'कोण आहे?' मी ओरडण्याचा प्रयत्न केला. पण जेमतेम कुजबुजलो. भीति. . . भीति. . .अन् दुसऱ्याच क्षणी एका मऊशीर, नाजूक हात माझ्या चेहऱ्यावरून फिरू लागला. तो माझ्या ओठाशी आला नि त्या अंधारातहि तिच्या लांबसडक, निमुळत्या बोटांचा स्पर्श मी ओळखला. तिचाच. . .तिचाच होता तो हात. डोळ्यापुढून न हलणारा. ती पुढे होऊन माझ्या अंगावर वाकली तेव्हा तिच्या केसांचा वास मला आला. एक रेशमाची सुगंधी लाटच्या लाट माझ्या अंगावरून वाहत गेली. ओठ माझ्या कानाशी आणून ती आपल्या इंग्रजीत मला म्हणत होती, 'ओरडलास तर कान चावीन तुझा.'

या प्रकाराचा काही अर्थ मला कळेना. क्षणभर मी अगदी भांबावून गेलो.

'हे काय? काय झालं?' मी विचारलं नि अंथरुणातून उठण्याचा प्रयत्न केला. पण लगेच तिनं आपले दोन्ही हात माझ्या खांद्यावर ठेवले नि मला बसल्या जागेवरून तिनं हलूहि दिलं नाही.

'काही झालेलं नाही. मला अगदी वैताग आलाय् एवढंच. कंटाळलेय् मी. माझा मलाच उबग येऊ लागलाय्. म्हणून—' ती कुजबुजीच्या स्वरात म्हणाली.

ती पलंगाच्या कडेवर येऊन बसली. तिचा देह हलका नाजूक होता की, माझ्या खांद्यावर क्षणापूर्वीच हात ठेवताना तिच्या अंगाला एवढं बळ कुठून आलं याचं आश्चर्य मला वाटत होतं. हा सगळाच प्रकार इतक्या अनपेक्षितपणे अन् झटकन् घडला होता की, माझं मलाच कळेना हे सारं काय चाललंय्. काय करावं हेच सुचेना. मी काही तिला घालवून देऊ शकत नव्हतो. किती झालं तरी तिच्याच घरी मी आलो होतो. हे घर तिचं होतं. (प्रोफेसरांचं नव्हे) ही गोष्ट मला महत्त्वाची वाटत होती. बाहेर जाऊन प्रोफेसराना बोलावून आणावं अन् 'ही पहा तुमची बायको माझ्या अंथरुणात शिरली आहे' असं त्याना सांगावं—हे तर शक्यच नव्हतं.

मी काही बोलण्याचा प्रयत्न करणार तोच तिनं आपली लांबसडक बोटं माझ्या ओठावर ठेवली. मग तिनं आपल्या शरीराचा कणनूकण माझ्या शरीराला लावला. तिच्या मऊशार, सोनेरी केसाच्या समुद्रातला मी मासा होऊन पोहू लागलो. मग कुठूनतरी दोन गुल्जार, गोंडस हात आले नि त्यांच्या झोपाळयावर बसून मी नेणीवेच्या पलीकडे जाऊन आलो. मिठी. . . ओठाला ओठ. . . दंतव्रण . . .काळोख... कुजबुज. . .

हे असलं काही विचित्र, अद् भुत माझ्या आयुष्यात कधी घडलंच नव्हतं. युरोपमध्ये हव्या तेवढया मुली मिळतात, नको नको म्हणत असतानाहि त्या गळयात येऊन पडतात, विशेषतः तुमच्या त्वचेचा रंग नि तुमचे काळेभोर केस यावर त्या लट्टू असतात वगैरे वगैरे खूप एकलं होतं निघण्यापूर्वी. पण तसलं आजूनपर्यंत काही घडलं नव्हतं. पुस्तकं वाचावीत, नोटस् काढाव्यात, लॅब्मध्ये जाऊन तासन्तास काम करावं नि अगदीच कंटाळा आला तर रेस्तोरांमध्ये जाऊन एखादी बीअर मारावी, एवढंच मला ठाऊक होतं. पण या अगदी अनपेक्षित कलाटणीनं मी पुरा पुरा गोंधळून गेलो होतो. आपल्या हातून काही भयंकर पाप तर झालं नाही हा प्रश्न सारखा फडा काढून मनाला भेडसावीत होता. पाप-पाप पाप म्हणजे काय? नि. . . .नि. . हे पाप भीतीदायक असलं तरी पुन्हा पुन्हा हवं हवसं वाटावं असंच होतं. . .पाप. . . भीति. . .आनंद—समाधान—ती असमाधानी होती. . . .म्हणूनच लज्जेची तिला पर्वा नव्हती....म्हणूनच ती एवढा निर्धार दाखवू शकली होती. तिच्या जगातला पापपुण्याचा हिशेबच वेगळा होता. तिच्या इच्छेपुढे मी निर्बल झालो होतो. असहाय्य बनलो होतो. तिला प्रतिकार करणं माझ्या शक्तिबाहेरचं होतं. खरं म्हणजे, मला काही कळतच नव्हतं. —की खऱ्याखुऱ्या अर्थानं कळतहि होतं?—कुणास ठाऊक!

पहाटे पहाटे माझा अर्धवट डोळा लागला तेव्हा दार वाजल्यासारखं झालं. मी मान वर करून पाहिलं तेव्हा ती दारातून बाहेर होत होती. माझ्याकडे पाहून तिनं स्मित केलं नि आपली लांबसडक, निमुळती बोटं किंचित् हलवल्यासारखी करून ती दाराआड दिसेनाशी झाली.

ती जिन्यावरून उतरत होती अन् तिच्या पावलांचा आवाज मी थेंबथेंब पिऊन घेत होतो.

अन् मग छपरातली कबुतरं घुमायला लागली.

घुंऽऽ घूंऽऽऽ घूंऽऽऽ घूंऽऽऽ

माझ्या अंगांगावर काटा उभा राहिला होता.

सकाळ झाली. त्या भयंकर रात्रीचं अद्भुत वास्तव मला भेडसावू लागलं. ब्रेकफास्टच्या वेळी प्रोफेसराना कसं टाळावं याचा विचार मनात सुरू झाला. वाटलं, असंच उठावं नि आपली बॅग घेऊन तडक स्टेशन गाठावं. नंतर प्रोफेसराना पत्र पाठवून, आपल्याला अचानक सकाळची गाडी गाठावी लागली याबद्दल क्षमा मागावी. पण माझा थिसिस् अद्याप त्यांच्यापाशीच होता अन् त्याच्यावर आमची चर्चाहि व्हायची होती. या चक्रव्यूहातून बाहेर जाणारा मार्गच मला दिसेना. . .

सकाळी थोडा डोळा लागतो न लागतो तोच दार वाजलं. प्रोफेसरसाहेबानी बाहेरूनच मला 'मॉर्निंग' केलं नि ब्रेकफास्ट तयार असल्याचं सांगितलं.

मी उठलो तेव्हा नऊ वाजले होते.

मी तोंडावर थंड पाण्याचा शिडकावा मारला, दाढी केली नि थरथरत्या हातानी माझी बॅग भरू लागलो. निघताना एकदा त्या खोलीकडे डोळे भरून पाहिलं नि क्षणभर पलंगापाशी उभं राहून डोळे मिटले: देवा, अगदी नकळत. . .अगदी न कळत हे माझ्या हातून घडलंय्. खरं म्हणजे माझ्या हातून हे घडलेलंच नाही. हे पाप आहे असं तुला वाटत असेल तर कालची ही रात्र माझ्या आयुष्यातून पुसून टाक.

प्रोफेसर ब्रेकफास्ट टेबलापाशी माझी वाट पहात होते. एका हातात सकाळचं वर्तमानपत्र नि एका हातात पाईप घेऊन ते खुर्चीवर बसले होते. माझ्या समोरच्याच खुर्चीवर ती बसली होती. हिरव्या डोळयांची. सोनेरी केसाची. मला पाप करायला लावणारी. पण या खेपेला मांजर डोळयानी हसत असावसं वाटत होतं.

'तू चहा घेणार की कॉफी." तिनं मला विचारलं.

'कॉफी.'

प्रोफेसरानी वर्तमानपत्राआडून आपलं डोकं वर केलं नि डोळयावरचा चष्मा बाजूला करून ते माझ्याकडे पाहू लागले.

'तुझा थिसिस् वाचला रात्रभर जागून.' ते म्हणाले, "पण अजून खूप काम करायला हवं तुला. अजून पुरावे द्यायला हवेत. आता ऑस्लोला गेलास म्हणजे जोरानं कामाला लाग. या वयात तू एवढं मोठं काम करावंस ही खरोखरच मोठी भाग्याची गोष्ट आहे. मला हेवा वाटतो तुझा."

अन् माझ्या थिसिसची टाईप केलेली प्रत माझ्या हातात देत त्यानी विचारलं. "रात्री विचित्र आवाज ऐकायला आले का? या कबुतरांचा भयंकर त्रास होतो बघ आम्हाला!"

माझं रक्त अक्षरशः उकळत होतं. चेहरा घामानं डबडबला होता.

पण मी मनाचा हिय्या केला नि त्या हिरव्या डोळयांकडे टक लावून पहात मनातल्या मनात म्हटलं: "एकदाच ऐकला तो विचित्र आवाज. तो म्हणत होता, ओरडलास तर तुझा कान चावून टाकीन."

पण तसा धीर झाला नाही. मी फक्त एवढंच म्हटलं, 'चांगली झोप लागली होती मला. आवाजबिवाज ऐकण्याच्या मन:स्थितीतचं नव्हतो मी. तुमचं थिसिसबद्दलचं मत मला ऐकायचं होतं.'

ब्रेकफास्ट झाल्यावर मी निघालो. मला उगीचच वाटलं, ती चार पावलं तरी माझ्याबरोबर येईल. थोडसं काही बोलेल. आपल्या लांबसडक, निमुळत्या हातानी माझा चेहरा क्षणभर गोंजारील. कालच्या रात्रीविषयी. . . . . . .

पण तसं काहीच घडलं नाही.

प्रोफेसरानी मला 'गुडबाय्' केलं नि ते तिथंच उभे राहिले.

क्षणभर ती पायऱ्यांवर उभं राहून माझ्याकडे पहात राहिली नि मग झट्दिशी वळून तिनं आपले लांबसडक, निमुळत्या बोटांचे हात प्रोफेसरांच्या खांद्यावर टाकले.

त्यांच्या छातीवर डोकं टेकून ती माझ्या दूर दूर जाणाऱ्या आकृतीकडे पहात राहिली असेल का? की तिच्या जगातला सारा हिशेबच वेगळा असेल?

• • •







अनुक्रमणिका


दिवाळी
अभिनंदन
.... नवे वर्ष आपणास
सुखाचे व अभिवृद्धीचे
होवो
हा सदिच्छा.
BANK OF BARODA LTD.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# शून्या अंत

चटकन् आठवण झाली म्हणून प्रोफेसर परत शय्यागृहात गेले. मिस् पेरीनचा रीसर्च पेपर काहीसा चुरगळून उशीच्या बाजूने अर्धावृत्त असा फरशीवर पडला होता.... तो पेपर नीट दुमडून ते बाहेर आले. आणि पेरीनच्या नजरेला नजर भिडवून तिच्यासमोर बसले.... !

–प्र. श्री. नेरुरकर



काळोख, गिर्द, काळा, निळा.... प्रकाश, हिरवा, शुभ्र, जांभळट, खिन्न करणारा...

आपल्याला काय होत आहे हे आपल्यालाच कळू नये याची एक उदासीन गंमत जशी प्रोफेसर रघुनाथरावांच्या मनाला वाटत होती तशीच एक विलक्षण सुन्न व विषण्ण करणारी अर्थशून्य अशी शुष्क भावनाही, सखेदपणे त्यांचं मन पोखरीत होती. त्याना काय होत आहे हेच त्याना कळत नव्हतं व आपल्याला काय होत आहे हे तर आपल्याला कळलंच पाहिजे असा त्यांचा अट्टाहास होता. गेली कित्येक वर्षे प्रायोगिक मानसशास्त्राचा प्राध्यापक, तत्त्वज्ञ व संशोधक म्हणून त्यानी नावलौकीक मिळविला होता. मानसशास्त्रातील कोणतेही प्रमेय सुलभ शास्त्रीय रीत्या उलगडून दाखविण्यात त्यांचा हातखंडा होता. त्यांच्या स्वतःच्या काही 'थेअरीज्' हळुहळू मानसशास्त्रीय क्षेत्रात मूळ धरू लागल्या होत्या. प्रोफेसर रघुनाथरावाना आज त्यांचे स्वतःचे सिद्धान्तही स्वतःचिच मनोविश्लेषण करण्यासाठी कुचकामी वाटत होते. रघुनाथरावाना स्वतःचं व भोवतालचं सगळंच मानवी जीवन कुचकामी, कोलमडलेलं व कर्कश वाटत होतं. विसंगत वाटत होतं. विद्रुप भासत होतं.

आपल्या अभ्यासिकेतील मऊ मऊ ऊबदार कोचावर रघुनाथराव एकटेच बसून राहिले होते. त्यांच्या समोर व



अनुक्रमणिका



**तुपारकणांचा भ्रम उत्पन्न करणाऱ्या कुन्द परागाना दिशामुखात पुन्हा पुन्हा खालीवर उधळीत आणि अलिकुलांना आनंद देत हे हेमंताचे वारे वाहत आहेत. या हरिणाक्षी सुदरींच्या केशरकुंकुम लावलेल्या स्तनमंडलांवर हे वारे उच्छृंखलपणे धडका देऊन त्यांचे मर्दन करीत आहेत. आणि तेथून उसळून त्यांच्या अधरोष्ठाचे पान करीत आहेत. या सुंदरी मुखातून सीत्कार काढीत आहेत ते थंडीमुळे नसून या कामक्रीडांमुळेच होत.**

**(अमरु शतक–११९)**

आजुबाजूला पुस्तकाची दाट भरलेली काचेची कपाटे होती. विश्वातील सगळे तत्त्वज्ञानी, सगळे मानसशास्त्रज्ञ, विचारवंत, कवी, लेखक, नाटककार, समीक्षक, त्यांच्याकडे आपले पुस्तकी डोळे वटारून टकाटका पहात होते. त्यांच्या उजव्या हाताला त्यांचं लिहिण्याचं टेबल व त्या टेबलाला जोडूनच त्यांच्या लेखाच्या व टिपणांच्या कागदाना पोटात ठेवणाऱ्या फाईलींचा ढीग रंगीबेरंगीपणाने पसरला होता. रघुनाथरावांचा आवडता निळसर जांभळा प्रकाश टेबलावरील टेबललॅम्पमधून अलगद बाहेर झिरपत होता. रघुनाथरावांचा एक अगदी अलिकडचा कोणत्यातरी आंतरराष्ट्रीय परिसंवादात अध्यक्षीय भाषण करणारा रूबाबदार फोटो त्या स्वप्नील प्रकाशतरंगात तरळपणाने उजळून दिसत होता. त्या फोटोकडे कधी कधी एकटकपणे एकसारखं पाहात रहाण्यात एक सुप्त अहंकारी सुख रघुनाथरावाना नेहमीच वाटत असे; पण आज त्याना आपल्या त्या फोटोकडेही पहावत नव्हतं. खरं म्हणजे टेबललॅम्प विझवून टाकावा व काळोखातच पडून रहावं असं काहीतरी रघुनाथरावांच्या मनात येत होतं. पण आज त्यांच्या मनात जे जे काही येत होतं ते नीट धडपणाने येतच नव्हतं. त्याना किंचित् स्वत:चीही भीति वाटत होती. त्याना भोवतालच्या तरल व स्वप्नसुंदर प्रकाशाचीही सूक्ष्म भीति वाटत होती व आपण काळोख करून खोलीत बसलो तर काळोख आपल्याला अधिकच भेडसावील, अशी आजवर कधी न अनुभवलेली धास्तीही त्यांच्या अंतरात्म्याला छळीत होती. त्याना कुणाला तरी हाक मारावी असंही वाटत होतं पण हाक मारून रघुनाथरावांच्या अभ्यासिकेत त्या अपरात्री त्यांच्या सोबतीला कोण येणार होतं? एवढा मोठा भला लांबलचक सरकारी खर्चाने मिळालेला रघुनाथरावांचा फ्लॅट! समुद्रकिनाऱ्यापासून फार दूर न बांधलेली अशी ती भव्य देखणी इमारत. अभ्यासिकेची डाव्या हाताची खिडकी, वसल्या वसल्या जरी रघुनाथरावानी त्यांच्या बोटांबरोबर चाळा करणाऱ्या दोरीने सहज उघडली असती, तरी त्याना अवकाशाला जाऊन भीडलेल्या निळ्याकाळ्या जलब्रह्माचं गूढ व रात्रीला मूड करणारं दर्शन झालं असतं. खिडकीत तासन् तास उभे राहून त्या सामुद्रिक नादब्रह्माच्या संगीताने ते कितीदा तरी पुलकित झाले होते. दिवसाचा सागर त्याना मध्यरात्रीनंतर दिसणाऱ्या सागरापेक्षा नेहमीच फिका व उथळ वाटत असे. पण आपल्या अभ्यासिकेची कोणतीही खिडकी उघडण्याचा मोह आज प्रोफेसर साहेबाना होत नव्हता.

आज....खरं म्हणजे गेले काही महिने.....

त्याना काय होत आहे हेच त्याना आकळत नव्हतं व त्यांचा अगदी नाइलाज झाल्यासारखा झाला होता. निरुपाय झाला होता.

ते फ्लॅटमध्ये आले होते तेव्हा रात्रीचे बारा वाजून गेले होते. रात्रीचे बारा वाजणे ही काही रघुनायरावाना तापदायक वाटणारी 'सिच्युएशन' कधीच नव्हती. रात्रीचे बारा काय नि एक काय! दिवसाचंही तसच! वेळेचं बंधन त्यांच्यासाठी नव्हतंच मुळी. आणि त्याना वेळेच्या काय किंवा कुठल्याच काय, बंधनात ठेवणारं आवतीभोवती होतंच कोण मुळी अस्तित्त्वात! अस्तित्ववादी रघुनाथरावाना आज स्वत:चंच अस्तित्त्व खरं वाटत नव्हतं. पटत नव्हतं. अजून त्यानी अंगातले सूट बूटही उतरून ठेवले नव्हते. त्यांची जुनाट पद्धतीची जाड रुंद अशी सौम्यरंगी नेक्टाय त्यांच्या छातीवर कशी गपचूप चिकटून राहिल्यासारखी भासत होती. त्यांच्या कोटाची बटणे सुद्धा अजून सुटायची होती. त्यांचे पायही पसरटपणाने पसरून राहिले होते व हात नेहमीप्रमाणे हातात नव्हते. हात हालतही नव्हते की जोडले जात नव्हते. त्यांच्या मूळच्या पाणीदार डोळ्यात एकप्रकारचा भकासपणा कसा भग्नपणे भगभगत होता. पंचेचाळीशी उलटून पन्नाशीच्या घरात आलेल्या प्रोफेसर रघुनायरावाना आज झालं होतं तरी काय?.. आजच नव्हे तर अलिकडे त्याना होत होतं ते होतं तरी काय होतं...?

'रघुनायराव...अहो रघुनाथराव.'

'अरे रघ्या...'

'रघू...रघोबा...'

त्यांचं एक सुप्त दबलेलं मन सारखं त्यांच्या नाना हाकनावानी त्याना हाका मारीत होतं. रघुनाथराव मधून मधून डोळे मिटून घेत होते; पण मिटलेल्या डोळ्याना दिसणाऱ्या तमिस्रतेने ते बावरून जात होते. व डोळे मिटले न मिटले तोच ते लगेच उघडून कुठंही पहात पण कुठेही न पाहिल्यासारखे बसत होते. त्या हाका त्याना सारख्या त्याच त्याचपणाने ऐकू येत होत्या. त्या हाका मारण्यातील ओलेपणा त्याना कोणत्या तरी सुकेपणाने जाणवत होता

व त्यांचे ओठ अधिकच रक्तशून्य होत त्यांच्या घशाला कोरड पडत होती. त्याना भोवळ आल्यासारखी वाटत होती व अनंतातून एखादी अंत्य अशी मरणकाळची हाक कुणा निर्मुखी मुखातून भयाणपणे यावी, तशी ती हाक–त्यांच्याच अंतर्मनाने त्यांच्या बाह्य मनाला घातलेली– त्याना भयाण व एकाकी भासत होती. ऐकवत नव्हती. असह्य होत होती.

ते आपल्या दबलेल्या मनाला दाबून गप्प बसविण्याचा आटोकाट अट्टाहास करीत होते. पण ते विचित्र मन जितकं दावलं जात होतं तितकंच ते उफाळून व तुफान आवेगाने अधिकाधिक अनावरच होत होतं.

'रघुनाथ..अहो प्रोफेसर.. रघ्या..' एकापाठोपाठ एक अशा ह्या हाका व्यक्त अव्यक्त अवकाशात घुमू लागल्या आणि रघुनाथरावांचं एकलेपणाने एकाकी बसण्याचं त्यांचं गेल्या अनेक वर्षांचं आत्मसुख त्याना नाकारू लागल्या.

'काय आहे ?...' रघुनाथरावांचा मनावरचा ताबा खाडकन् उडाला होता. "काय आहे म्हणून काय विचारतोस ?...'

'म्हणजे हे आहे तरी काय?...'

'ते काय आहे तेच काय ते विचार ना तू तुला स्वतःलाच...

'पण मी स्वतः म्हणजे तूच नव्हेस काय?...'

'तू स्वतः नि मी...हीः हीः हीः...'

'हुं...हुं...हुं...'

उन्हाळ्याचे दिवस असूनही कशी हुडहुडी भरल्यासारखी रघुनाथरावाना वाटू लागली. त्यांच्या बुद्धीच्या व मनाच्या सर्व संवेदना त्यानाही सोडून पसार झाल्या होत्या. त्यांचा त्यानी त्याग केला होता व त्याना केविलवाणेपणाने एकटाच सोडून त्या वहिर्मुख झाल्या होत्या. अंतर्मुखतेची नेहमीची तऱ्हाच आज रघुनाथरावांच्या बाबतीत उलट सुलट झाली होती. ते अंतर्मुख व्हायला पहात होते तेव्हा त्याना धड बहिर्मुखही होता येत नव्हतं. त्याना उठावसं वाटत होतं तेव्हा त्याना धड बसताही येत नव्हतं. त्याना जे करावसं वाटत होतं ते तर त्याना करता येत नव्हतच पण जे आजवर त्यानी कधी केलं नाही व अनुभवलं नाही तेही त्याना कसं करावं व कसं अनुभवावं हेच कळेनासं व वळेनासं झालं होतं.

'रघुनाथ, आठवतं तुला?...' त्यांचं सुप्त मन त्याना प्रकटपणाने विचारीत होतं.

'काय ते?...'

'तुझं वय किती?...'

'रॉंग साईड ऑफ फॉर्टीफाईव्ह..'

'रॉंग साईड हं?....'

'हं...हं...हुः ...हुः ..हुः ..'

'असा एकाकी अजून किती वर्षे रहाणार आहेस?...'

'एकाकी... ? मी कुठे एकाकी आहे?...'

'तेच ते...'

'काय ते?...'

'सेल्फ डिसेप्शन! एवढा मोठा मानसशास्त्रज्ञ व तत्त्वज्ञानी तू!...तुला तुझं स्वतःचंच मन कळत नाही. ते तुला पूर्वी कधी कळलं नाही. आजही...आत्ता... कळत नाही. भविष्यकाळात तुझं कसं काय होणार; रघुनाथराव ? ... प्रोफेसर, डॉक्टर रघुनाथराव रांगणेकर..?...'

'सेल्फ डिसेप्शन? खूळचट्...ते सेल्फ ॲक्सेप्टन्स आहे. कदाचित् ते सेल्फ सरंडरींगही असू शकेल...'

'खोटं...साफ खोटं...'

'काय खोटं...?'

'तुझं जीवनच खोटं आहे रघुनाथराव....तू ते कधी खरं होऊच दिलं नाहीस...सारखा खोटेपणाला खरेपणाचा मुलामा देत बसलास...आभास निर्माण केलेस...तेच वस्तू म्हणून स्वीकारलेस...आता तुझा निरास होणं सुरू झालं आहे...भ्रमनिरास...पण फार उशीरा...'

'उशीर?'

'हां हां...उशीराच झाला आहे... तुझ्या संवेदना मेल्या आहेत, भावना गंजल्या आहेत; बौद्धिकता शिथिल नि जड झाली आहे; धारणा घडघडून धडधड कोसळू लागली आहे; तू सगळं काही हरवून बसला आहेस आणि जे जे तुला सापडलं म्हणून समजत होतास ते सापडलं नव्हतं असं तुला उमगून आलं आहे. तुला काही सापडलच नव्हतं ? कारण तू स्वतःलाच सत्यापासून दूर ठेवून सत्यशोधन केलंस. सापडलं ते सत्य नव्हतं व हरवलीस तो तूच होतास...स्वतःच स्वतःला हरवलेला...सत्यालाही हरवून

बसलेला...जीवनपराङमुख...काय केलस हे ?...रघुनाथ...काय केलस!...

'चूप!...गप्प....थांब...बहकू नकोस... मला अंतर्मुख व्हायला फुरसत दे...मी... मलाच...पाहू... दे...शोधू...दे...'

'शोध विचारा...सापड म्हणजे झालं!...वाय्...वाय...सी यू ...'

रघुनाथराव भानावर आले तेव्हा त्याना पुन: आठवून आलं की, आपल्याला धड अंतर्मुखही होता येत नव्हतं. एक धड असा विचार, अशी संज्ञा, असा संज्ञा-प्रवाह, अशी संवेदना, अशी प्रतिमा, असं प्रतीकं, अशी प्रतीकात्मता, कल्पना, शब्दरेखा, भावरेखा, सूत्ररेखा, काही म्हटल्या काहीच कसं त्यांच्या चिंतन प्रक्रियेत समूळपणे ठरतच नव्हतं. स्वत:च स्वत:ला ते धड आठवत नव्हते. भूत-काळाला स्मृती संपुष्टात घट्ट घट्ट पकडून ठेवण्याचा जितका जिकीरीचा प्रयत्न ते करीत होते तितकाच वर्तमानकाळ त्यांच्या हातून पाऱ्यासारखा निसटून जात होता व कशाचाच काही अर्थबोध होत नव्हता. सगळच काही दुर्बोध झालं आहे असंही नव्हतं ! बोध, अनुबोध, दुर्बोध यांच्या अलिकडे पलिकडे त्यांचं मन...जर त्याला मनच म्हणायचं तर...लुडबुडत होतं. कोलमडत होतं.



टेबललॅम्प तसाच संथपणे जळत होता.

...कोट काढून टाकू का?—

...बूटही सोडले पाहिजेत.

...टाय...oh! किती घट्ट घट्ट गळ-फास बसला आहे तिचा.

...आरशासमोर उभा राहू का?

...किती वाजले?...

टक्...टक्...टक्...टक्....

खिडकी उघडू?...

टेबलावर वरीच पत्रे दिसताहेत...

रामाला हाक मारू?...

घंटा दाबू?........

उठू का?.........

कोण मी?.......

कुठे आहे मी?......

अनादी, अनंत, अगाध....

कोण?

काळ?

मी समोरचा समुद्र ?

की मी?.......

मी...मी..मी...मानसशास्त्रज्ञ, तत्वज्ञ, अस्तित्ववादी, आंतरराष्ट्रीय कीर्तीचे विचारवंत...थिंकर, इंटेलेक्चु-अल, थेओरिस्ट...पोरांचा, पोरींचा, आवडता, लाडका...प्राध्यापक...भाष्य-कार...गाइड...

कसं करू?...

ट्रिंग..ट्रिंग...ट्रीं sssssss ग...

ठण्...ठण्...ठण्...

तीन!

उत्तररात्र सुद्धा आता लवकरच संपेल!

...........

प्रोफेसर!

यस् सर!...'

सर...मला वाटतं...

नो नो.....सार्त्र म्हणतो......
the object of a mental image is posited as being not actually present; the image ... gives its object as not being ... or ... We only imagine what is not there ... and yet ...

यू अंडरस्टॅण्ड...?

आय् डू, सर...बट्...

• येस्...गो अहेड्...

माय् ऑब्जेक्शन टू ईट् इज्...सर्...

व्हाय नॉट् कम टु माय अपार्टमेंट वन् डे...

ग्लॅडली सर...आय् वुल् लव्ह इट सर...

'How I admire you, Sir...'

कोण ती?...

मिस् गडीआली! ती पारशी पोरगी! देखणी! विशी वा विशीतील! कशी छान, नाजूक, सुंदर, सात्त्विक दिसते! मला वाटतं मला तीच जास्तीत जास्त समजून घेण्याचा प्रयत्न करते! लॉबीत सारखी माझी वाट पहात असते. तिच्या नाजूक इवल्या हातात किती पुस्तकांचं ओझं संभाळते ती! हुझर्ल, बॉदलेर्, जिद् मांलरॉ, सार्त्र...यांचं वेड लागलेलं दिसतय् तिला. खुळी! तिचं वय केवढं! केशभूषा किती मुलायम करते! आज तिच्याकडे मी सारखा सारखा पहात होतो. रीसर्चला घ्या म्हणून सारखी मागे लागली आहे. फ्रॉकसुद्धा आजचा तिचा किती तरल, मनोवेधक फुलाफुलांचा होता. गडीआली...मिस् पेरीन् गडीआली....

रघुनाथराव तंद्रीतच उठले. उठता उठता त्यानी हातातील दोरी खेचून खिडकी उघडली. ते खिडकीत जाऊन उभे राहिले. समुद्राचं घनगर्जित घनघोर-पणाने चालूच होतं. आकाशही निरभ्र व स्वच्छ हो.तं निळसरपणाचं व काळसर-पणाचं एक धूसर मिश्रण विश्वाला उगीचच अर्धस्फुट बनवून राहिलं होतं. काही धड दिसत नव्हतं व धड समजत नव्हतं. जवळच कुठेतरी एक कावळाही कर्कशपणानं ओरडला होता. तो रडल्या-सारखा वाटत होता. उठता उठता रघुनाथ-रावानी कोटही काढून खुर्चीवर फेकला होता. खिडकीत उभे राहून ते हाताने टाय् मोकळी करीत होते. वाऱ्याची एक थंड वेगवान् झुळुक झटकन् त्यांच्या अंगाला स्पर्श करून गेली. अशाच हळुवार थंड स्पर्शाची तर त्याना जरुरी नव्हती

ना वाटत? . . .त्यानी वळून मागे पाहिलं. पंखा बंदच होता. व्हेंटीलेशनही बंद होतं. खिडक्या दारे सगळीच बंद होती. टेबललॅम्पच्या शेजारीच त्यांचा लंडनहून आणलेला छोटा टेबल्फॅनही बंद होता. लिहिण्याच्या किंवा वाचनाच्या मूडमध्ये असले, की तो पंखा त्याना वाऱ्याच्या संथ, मंद, सुखद लहरीनी न्हावू घालीत असे . . .

नेणीवेतून जाणीवेत आल्यासारखं हळुहळु पण स्पष्टपणे रघुनाथरावाना जाणवू लागलं.

समोर होता तो समुद्रच होता.

ते उभे होते ती त्यांच्या फ्लॅटची दक्षिणेकडची खिडकी होती . . .

ती रात्र होती.

रात्र काळोखी होती.

रात्रीचे तीन वाजून गेले होते.

रात्री बारानंतर प्रोफेसर रघुनाथराव आपल्या अभ्यासिकेत शिरले होते. ते आले ते सरळ अभ्यासिकेतच गेले होते. कोचावर कपडे न काढता बसले होते.

. . . . . . . . .

. . . . . . . . .

सत्तेचाळीस वर्षे की अठ्ठेचाळीस! आपण कधी आपला वाढदिवसही साजरा केला नाही. कोण करणार?

उशीर झाला, संपलं, निसटलं, संपून गेलं . . .

कुणीतरी मघाशी म्हणालं.

फ्रान्स, जर्मनी, इग्लंड, फिलाडेल्फीया, जपान . . .आणि अगदी अलिकडे मॉस्को . . . युगोस्लाव्हिया . . . लेनिनग्राड . . .

किती ठिकाणी आपल्याला आमंत्रणं आली. पदव्या मिळाल्या. मानसन्मान मिळाले. पंडीत नेहरू एकदा पाठीवर थाप मारून म्हणाले होते, 'यंग मॅन, आय् फील सो व्हेरी प्राऊड ऑफ यू . . . गो अहेड ॲण्ड द व्हेरी बेस्ट लक फॉर यू . . .'

झोप?

आता कुठची झोप!

झोप . . .

तीही आटपलेली दिसते आहे . . .

वझ्लींग ब्लूमिंग कन्फ्युझन!

पंख तुटले . . . की ते नव्हतेच . . की ते कृत्रिम होते. मुळातच! अजून मी अवकाशातच आहे की आदळलो आहे भूमीवर येऊन . . . सपाट . . . सपाट . . . सेक्स! रोमान्स! . . .

फार उशीर झाला. दोस्त! फार फार फारच उशीर!

फ्रेन्ड्स्! हीअर इझ् प्रोफेसर रघुनाथराव रांगणेकर बिडींग यू गुड बाय् . . . ही अनाऊन्सस् दॅट् ही डिसओन्स ऑल दॅट् ही रोट् ॲण्ड रेड ॲण्ड सेड् टु धिस् डेट् . .

गुड् बाय् . . . फ्रेण्ड्स् . . .

अजूनही पुरतं भानावर आल्यासारखं रघुनाथरावाना वाटत नव्हतं. पहाटेला फारसा वेळ उरला नव्हता. अजूनही खूप गोष्टी रघुनाथरावाना पार पाडायच्या होत्या. टेबलावर रामाने पत्रांचा बराच जाडजूड थर नीट रचून ठेवलेला दिसत होता. शिवाय झोपण्यापूर्वीच रात्रीचं दैनंदिनीचं पान लिहून पुरं व्हायचं होतंच. चूळ भरायची होती. कॉफीचा एखादा कप मिळाला तर हवा होता. इन्स्टीट्यूटकडून तपासण्यासाठी आलेले दोनचार महत्वाचं रीसर्च पेपर वाचून संपवायचे होते व त्यांच्यावर नोट्स् लिहायच्या होत्या . . . .एक पेपर मिस् गडीआलीचा होता.

आरंभापासून डोकं ठिकाणावर असतं तर हे सगळं केव्हाच संपवून एव्हाना आपल्या मऊ गुबगुबीत बिछान्यात रघुनाथराव घोरत पडलेले दिसले असते. समुद्राच्या घोरण्याशी स्पर्धा करीत . . .

अलिकडे झोपेच्या गोळ्याही त्यानी आणून ठवलेल्या होत्या.

पत्रं . . .?

कुणाची . . .?

नक्कीच . . .एक पत्र त्यातलं सुलभेचं असणार. खुळी सुलभा! अजून पत्र लिहिते–मीच तिला दुर्लभ झालो. ती तिच्या नावाप्रमाणेच मला सहज सुलभ प्राप्त झाली असती. किती वर्षं झाली? आता कशी दिसत असेल? काय लिहिलं असेल तिने . . .तू हवा आहेस. अजूनही तू मला हवा आहेस! लग्न झाल्यावरही . . . चार मुलांची आई झाल्यावरही . . . .हा तरुण वयातला काही बायांचा लव्ह मॅनिआ विलक्षण विचित्र असतो. शी सफर्स फ्रॉम दॅट ॲण्ड आय् थिंक रिमेन्स टू सफर फॉर द् होल लिव्हींग लाइफ् . . . माझी आणखी कुणी दुसरी असती तर? आणि तिच्या हातात तिचं पत्र पडलं असतं तर? . . . व्हाय् गो फार ॲण्ड बियॉण्ड् . . . मिस् गडीआलीच्याच हातात ते पत्र उद्या परवा देऊन पाहू का . . . .?

परहॅप्स शी वुल् से नथींग ऑर से एव्हरीथिंग . . .

केशवसुत : – आधुनिक काव्यदर्शन



कोणीकडूनी कोणीकडे ? इकडून तिकडे म्हणती 'विद्यार्थी' गडे !

ती म्हणेल, या बाई सेल्फ ऑब्सेस्ड आहेत...आणि सेल्फ पझेशनची त्यांची प्रॉपेन्झिटी भलतीच चिवट आहे.

सर, यू शूड वन् डे इन्व्हाय्ट हर टु यू...रीअली...आय मीन इट्...

फ्रान्समध्ये अशीच एक वेडी फ्रेंच मुलगी नव्हती का भाळली माझ्यावर?

तिशीतला त्यावेळचा प्रोफेसर रघुनाथ रांगणेकर...

तीही प्रोफेसरा होती...

काही तिच्या मनासारखं मी म्हटलं की 'वुईऽ...' करुन कशी फुलल्या मोगर-कळीसारखी हसायची...

मी तिला म्हटलं होतं... आय् डोण्ट हेट् वुमेन दो..यट् आय् डोण्ट विइप टु फॉल इन लव्ह् विथ् देम...

रघुनाथराव खिडकीतून हालले. मघा-पासून ते बाहेर पहात होते. पण खरं म्हणजे तेव्हापासूनच ते आत आत आपल्यातच पाहू लागले होते. आणि त्याना काही ना काही तरी आत्मचित्र दिसूही लागलं होतं.....

शेल्फवरील एक पुस्तक डाव्या हाताने उचलून घेत ते आपल्या टेबलासमोरील खुर्चीवर जाऊन बसले. हालती, पि.रती, डुलती खुर्ची! त्यांची आवडती खुर्ची!



ते एक फ्रेंच पुस्तक होतं.

Citadelle...

ते वाचू लागले... And you have refused...

पण रघुनाथरावाना पुढचं वाक्य पुरतं वाचवेनाच. 'आय् हॅव् नॉट् रिफ्यूझ्ड्...' स्वतःवरच खेकसून ओरडत ते जोरजोराने म्हणतच राहिले...'ह सेज्, आय् हॅव् रिफ्युझ्ड्...

पहाट! रघुनाथरावानी पुस्तक जोराने मिटलं नि ते दूर कोपऱ्यात भिरकावून दिलं. सहा वाजायला आता वेळ कितीसा उरला होता! त्यांचा रामा येणार होता. लॅच की उघडणार होता. पहाटेचे अभ्यासिकेचे रमलेले त्याचे मालक पाहून गुपचूप कॉफी करून त्यांच्या टेबलावर आणून ठेवणार होता...पण आज त्याला अभ्यासिकेत रघुनाथराव दिसायचे नव्हते. समुद्राचं घनगर्जित शांत झाल्यासारखं भासत होतं. कुठेतरी रघुनाथरावांच्या मनातही एक अपार शांतीची अद्भुत कळ उठल्या-सारखं त्याना उत्कटतेने वाटलं. सगळं धूकं साफ मावळून गेलं होतं! हळुहळु सूर्यकिरण क्षितिजाकडून विश्वव्यापी धूसरतेला कपडयानं काच पुसावी तसं पुसून टाकणार होते. रघुनाथरावाना उगीचच एका विलक्षण अननुभूतपणाने उल्हसित वाटू लागलं. त्यानी आपली फाईल उघडली नी त्यातील मिस् पेरीन गडीयालीचा रीसर्च पेपर तेवढाच नेटका काढून घेऊन शय्यागृहाचा रस्ता सुधा-रला. अभ्यासिकेतील दिवा तसाच जळत होता. पंखा तसाच भृंगगुंजन करीत गरा-गरा फिरत होता. खिडकी उघडीच होती. रघुनाथरावानी शय्येजवळ जाऊन आपली पॅंट उतरली. नाईट् गाऊन अंगा-वर घातला...खुजातल्या पाण्याचा एक पाव ग्लास घोट घेतला. उशीकडील दिव्याची कळ दावली व दाराचा पडदा सरकावून घेतल्यावर ते बिछान्यात पडून गडी-आलाचा पेपर वाचू लागले....

धृ अम्बीव्हॅलन्स ऑफ् सुपरमाइंड्स्... पहिल्याच परिच्छेदाला पहिलंच उप-शीर्षक होतं. हाऊ व्हेरी इंटरेस्टींग...आय् मस्ट रीड टु द एन्ड्...

जांभया येताहेत...

झोप...

हां हां म्हणता रघुनाथरावाना गाढ झोप लागली सुद्धा.

तिच्यात स्वप्न नव्हतं.

निद्राभंग नव्हता.

निरामय, निरागस, निरोगी झोप!... किती दिवसानी!

सारखी घंटा वाजते आहे.

कोण आहे?...

सर...मी...मिस् पेरीन्...गडीआली

ओऽ....

कम् इन्...

हॅव् आय् डिस्टर्ब्ड् यू सर...युवर स्लीप इज् नॉट स्टील् ओव्हर् सर...आय् ॲम् सो सॉरी...रीअली...ऑर् आय् वुल् कम् नेक्स्ट् टाईम्...विल् इट् डु?...

नो...नो...नो...बी सीटेड्, मॅडम्... नो फॉर्मालिटीज्...प्लीज...'

टाइम्...

टेन पास्ट...सर...

डोन्ट माईंड्...

रघुनाथरावानी स्लीपींग गाऊनमध्येच आपल्या अभ्यासिकेत प्रवेश केला. बऱ्याच दिवसानी इतकी चांगली झोप त्यांच्या वाटेला आली होती. त्यांची मुद्रा विल-क्षण प्रसन्न नी संयत दिसत होती. दुर्दम्य उल्हासाने ते फणफणून निघाले होते. आज आत्ता त्याना काहीच होत नव्हतं व जे काही होत होतं ते त्याना अनाकलनीय वाटते नव्हतं. गडीआली कोचावर विसा-वत होती. तीच ती. तशीच–एक्स्वीझीट् हेअरडू...फ्रॉक अ पोएट्री इन् इट्सेल्फ... सुंदर, भावुक, डोळे...पुस्तकांचं ओझं हातात...फाईल्...चटकन् आठवण झाली म्हणून प्रोफेसर परत शय्यागृहात गेले. मिस् पेरीनचा रीसर्च पेपर काहीसा चुर-गळून उशीच्या बाजूने अर्धावृत्त असा फरशीवर पडला होता..'ॲम्बीव्हॅलन्स ऑफ्...' तीच अक्षरे त्यांच्या नजरेत पुनः ठळकपणानं भरली...तो पेपर नीट






दुमडून घेत ते बाहेर आले! समोरची एक खुर्ची घेऊन थेट पेरीनच्या नजरेला नजर भिडवीत ते तिच्या समोर बसले...

पेरीन किंचित् भांबावली होती. इतके उत्फुल्ल असे प्रोफेसराना तिने कित्येक महिने पाहिले नव्हते. तिच्या मनात अनेकदा येऊन गेलं होतं. त्याना विचारावं ..त्यांच्या प्रकृतीबद्दल विचारावं! त्यांच्या जीवनाबद्दल विचारावं! तिला त्यांच्याबद्दल वाटत होतं ते सर्व त्याना समजावून सांगावं...त्यानी तिची आजवर उपेक्षा केली होती... पण तिने... हु वॉज् धिस् प्रोफेसर रघुनाथ रांगणेकर? अदर्स देअर आर..अ लॉट! बट्...ही वॉज् डिफरन्ट..नॉट ओन्ली अ टीचर..अ गाईड्..ॲंगनी...फोर्स..पॅशन...दॅट ही वॉज्...ओ...हाऊ आय् हॅव् कम् टु ॲडमायर् यू सर....इन्डीड...ट्रुली... ॲय् ॲम् इन् लव्ह् वुथ् यू...सर...इन् लव्ह् वुथ् यू...दॅट् इज् इट्...इफ इट इज् एनिथिंग ॲट् ऑल्...

हे सगळं क्षणातच–स्प्लिट् सेकंदात...

'आय् ॲम् ग्लॅड टु इन्फॉर्म यू, माय डीअर् मिस् गडीआली...' रघुनाथराव सावकाश पण नेहमीच्या खोल अंतःस्पर्शी आवाजाने बोलत होते.

'वॉट्स् दॅट सर...?'

'आय् ॲम् ॲक्सेप्टींग यू ॲज् माय रिसर्च स्टुडण्ड...यू वुल् डू युवर पिएच्.डी अंडर मी...'

'वॉट्....डु यू से द ट्रुथ सर....ॲम् आय् रीअली गोइंग टुबी युवर् स्टुडण्ट सर्... माय् माय्...हाऊ डीपली हॅपी आय् फील सर..सर...रीअली...आय् हॅड ऑलवेज् विन् ॲस्पायरींग फॉर दॅट सर..आय् ॲम ग्रेटफुल टु यू सर..इन फॅक्ट आय् हॅव् नो वर्ड्स टु एक्स्प्रेस मायसेल्फ सर...'

'दॅट्स् ऑल् राईट...डोण्ट यु वरी अबाऊट वर्ड्स...वॉट् डझ् मिस्टर सार्त्र से अबाऊट वर्ड्स्...यू रिमेम्बर...'

'आय डू सर...ही सेज....'

'स्टॉप–दॅट्स् ऑल फॉर द प्रेझेंट...'

'सर...'

'येस्...मिस्...'

'यु आर् जस्ट अप् सर...'

'सर्टनली सो...'

'इफ आय् प्रिपेअर अ कप ऑफ कॉफी फॉर यू...'

'डोण्ट से फॉर मी. मे इट्...फॉर अस बोथ्...'

किणकिणणाऱ्या कांचमण्यासारखी खळखळून हसत गडीआली तरतरीतपणे कोचावरून उठली. तिन क्षणातच सर्व खोल्यातून फेरी केली. किचन गाठला. गॅस ऑन केला. कॉफी पॉट्स् हस्तगत केली.... ती पाठमोरी काम करीत असताना डॉक्टर रघुनाथराव खुर्चीवरून उठून तिच्याकडे पुढा करून बराच वेळ दारातच उभे होते. कालचा ब्लॅक मूड त्यांच्या सुप्त मनाच्या पाताळदरीत खोल खोल त्या दरीच्या विनतळाकड जात तळावत होता नि गडीआलीने उघडून टाकलेल्या स्वयंपाक खोलीच्या खिडक्यातून भर दुपारची भगभगीत उन्हे आत येत होती. समोरचा समुद्र सुस्तावलेल्या अजगरासारखा मस्तीत हालत होता व हालत नव्हताही. ● ● ●

एक रोमांचक
अत्यद्भुत लोककथा

# चांदण्यारात्री चांदणी

-डॉ. सरोजिनी बाबर

डोईवरती निळं निळं लख्ख आभाळ. ढगांचा मागमूस नाही. चांदण्यांचा थवा जियं तियं वसलेला. त्यात चंद्रज्योति चमकतेल्या. अंगावरून गार वारा वहातेला. आवतीभोवती हंड्या झुंबरांचा लखलखाट झालेला. तीनशेसाठ समया पाजळतेल्या. शेकड्यानी दीपमाळा लुकलुकतेल्या. तर या धांदलीत वरती चांदोवा आणि खालती जयनाद एकमेकांकडे बघत उभे राहिलेले. कोण कुणाला माघार घ्यायला लावील असं देखणं रूप ते घेऊन आलेले. धरित्री या देखणेपणाला पिवून टाकतेली. माणसं भुललेली. सभोवती दाट जंगल. किर्रर्र झाडी. वाघसिहांच्या डरकाळ्या फुटतेल्या. रातकिड्यांचा आवाज घुमतेला. काजवे चमकतेले—नेत्र सुखावलेले.

तशी काय गंमत झाली की, मेजवानीला जमलेल्या माणसानी नाचगाणं सुरू केलेलं. ताशेतर्फे वाजतेले. रंभा नाचतेल्या. ढोल लेझीम घुमतेलं. माणसं नाचात रंगलेली. म्हणताना जयनादानं नीलांगणात एकटक पाहिलं. चंद्राला पालवलं. खाली ये म्हणाला. नाचूया बोलला. त्यासरशी चंद्रचंद्रिकांची वर वसलेली सभा एकदम खाली आली! आणि सगळ्यांचं मिळून नाच–गाणं सुरू झालं. रंगत गेलं. सारी दुनिया धुंद होऊन गेली. त्या धांदलीत एक देवांगना पुढं आली. पांढरं भर्जरी वस्त्रं ल्यालेली. रत्नखचित अलंकार घातलेली. देखणेपण घेऊन आलेली. तर तिची आणि जयनादची दृष्टभेट झाली. त्यासरशी त्याचं तिच्यावर मन जडलं. ह्यानं तिला हाक मारली, "माधुरी!" तशी चंद्र हसला. त्यानं आपल्या तेजस्वी किरणांची खैरात करून सोडली. नाचगाणं संपलं. वाद्यं विसावली. गाणारे दमले. नाचणारे थकले. जयनाद आणि माधुरी यांचे लग्न ठरलं. वसली सभा उठली. चंद्र आणि चांदण्या गदाळून गेलेवते. तर त्यानी दूधसागरात स्नान केलं. पुन्हा त्यांची काया साजिवंत झाली. निळंनिळं आकाश पुन्हा साजिरं गोजिरं झालं. टिप्पूर चांदणं धरणीवर झिरपू लागलं. लख्ख लख्ख चांदण्यात धरित्री न्हाऊन उठली.

त्या घटकेला माधुरी आणि जयनाद फिरायला निघाले. दाट जंगल तुडवीत. लांब लांब. वाट फुटेल तिकडं. एक सोडून सात वनं ओलांडित त्यानी प्रवास केला. तहान भूक हरपून गेलेली. तर आपले बोलत बोलत विचारे वाट तुडवीत होते.

तो मुलुख पडला रखरखीत. कडाक्याच्या उन्हाचा. गुदमरून टाकणाऱ्या उष्म्याचा. जीव घेऊ पहाणाऱ्या उकाड्याचा. थंडावा कसला तो नाहीच. पण या चांदण्यारात्रीनं ह्या दोघाना गारवा आणला. एक सोडून सात डोंगर चढीत





अनुक्रमणिका

त्यानी सप्तपदी करावी असल्या वाटेनं जाऊन त्यानी नदी गाठली. तिथं थांबले. पोटभर बोलत बसले. सुखदु:खाच्या गोष्टी उसवल्या. जिवाला जीव मिळाला. आता लगीनसाज कधी ल्यावा तेवढंच बाकी राहिलं. दोघानी आणाभाका घेतल्या. माधुरी आनंदली. समाधान पावली. जयनाद सुखावला. हर्षभरित झाला.

एक दिवस काय झालं की, लग्नाचा मुहूर्त ठरला आणि त्याच्या आदल्याच्या आदल्या रात्रीच एक चमत्कार घडला.

उन्हाळ्याच्या कारणानं जिवाची लाही लाही होतेय म्हणून माधुरीकडे जायच्या आधी एकलाच जयनाद एका तळ्यावर गेला. नेहमी तिथं तो आंघोळ करायचा. तसा आज पण आंघोळीला म्हणून तळ्यात उतरला. त्या सरशी कुठून तरी आवाज आला, "मी येऊ का?" आणिक त्या पाठोपाठ जिवाला भूल पाडणाऱ्या आवाजात कुणीतरी गाणं पण म्हटलं. तशी ह्यानं 'कोण आहे?' असं विचारीत इकडं तिकडं पाहिलं. पाहिलं तर कुठाय कोण? कुणीच कुठं दिसेना. पण मग हा जरा अस्वस्थ झाला आणि चटकन् पाण्यातून वर आला. भराभर कपडे घातले न् लगेच माधुरीकडे आला.

पण तो अगदीच थकून गेलेला होता. म्हणताना त्यानं आपल्याला थोडं बरं नाही असं माधुरीला सांगून टाकलं. तिनं काही विचारायची वाटच पाहिली नाही हं! तशी ती बुचकळ्यात पडली. म्हणाली की हे असं कसं? आल्याबरोबर हसणं नाही, हातात हात घेणं नाही, गोड गोड बोलणं नाही, काही हवं का विचारणं नाही म्हणजे याला झालंय तरी काय म्हणावं देवा! माधुरी गेली हाडवडून आणि तिनं त्याच्या अंगाला हात लावला तर अंग कढत लागतेलं! "अगवाई! ताप आलाय का म्हणावं तरी?" माधुरीनं घाबरून ह्याला विचारलं. पण तो बोललाच नाही. गप्प पडून राहिला. म्हणताना ही आणखीनच खुळीभैरी झाली. आता काय करू बाई! तिला कोडं पडलं. ह्याला कुठं कुणाची बाधा तरी झाली नसेल नव्हं? हिचा जीव उडून गेला आणि एका शंकेनं तिला गाठली तशी ती एकदम पांढरीफट्ट पडत ह्याच्या गळ्याशी पडून म्हणाली कशी, "काय झालं खरं सांग नाहीतर मी....मी मरून जाईन! आपलं लगीन व्हायचं नाही?" म्हणताना मग हा बोलला, "मी तळ्यावर गेलोव्हतो. फार सुंदर गाणं ऐकलं. गोड गळा. हवेत कितीतरी वेळ घुमला..." त्यासरशी ही एकदम थरथर कापायला लागली आणि जास्तीच पांढरीफट्ट पडली. पण तेवढ्यावरही भागत नाही तर मोठ्यानं किंचाळावं तशी ती ओरडली, "ती येसवा आहे! माणसाचं मरण घेऊन येणारी. लग्नाच्या आदल्या रात्री येणारी तू पुन्हा तिकडे जाऊ नकोस" आणि एकदम बेशुद्ध पडली. हा घाबरून गेला. त्यानं तिला उराशी कवटाळली. तिला सावध करायची तो शिकस्त करू लागला.

हळूहळू मग ती सावध झाली. आजवर त्या येसवेच्या पायात घडलेल्या वधूवरांच्या अशा ताटातुटी तिनं त्याला सांगितल्या. त्याच्या पाया पडली. तिकडे जाणार नाही असं वचन दे म्हणाली. पण हा तिलाच उलट वेडी म्हणाला. मग ते दोघेजण बराच वेळ बोलत बसले. तसा हा खूप हसत सुटला. कितीतरी वेळ आपला हसतच राहिला. हिची मग खात्री पटली. त्या येसवेनं ह्याला घेरलं म्हणाली. आणि मग तिनं आपल्या अलंकारांची पेटी उघडली. त्यातल्या एका अंगठीचं शिंपल्याचं कवच काढून दिलं. त्यात आपला आवाज घातला. आणि ते ह्याच्या हवाली करीत म्हटली की, "हे जवळ ठेव. वेळ पडलीच येसवेचा आवाज बंद पडावा म्हणून हे कवच कानाला लाव. काम होईल. पण काय वाटेल ते झालं तरी तू तिकडे जाऊ नकोस." हा बरं म्हणाला आणि आपल्या घरी निघून गेला. त्यानं जशी हिला वेड्यातच काढली हं!

जयनाद धीट होता. शूर वीर होता. शिकारी होता. त्याचा आपल्या कर्तबगारीवर दांडगा विश्वास. म्हणून माधुरीनं सांगितलेली येसवेची भानगड त्यानं ह्या कानानं ऐकून त्या कानानं सोडून द्यावी असं ठरवलं. पण मग दुसऱ्या दिवशी तो उठल्या उठल्या त्या तळ्यावर गेला. खरं खोटं बघावं म्हणाला. परंतु आता तिथं काहीच नव्हतं. सगळीकडे शांतता होती. घनदाट जंगलातील चिटपाखरांचाही आवाज येत नव्हता. त्यामुळं माधुरीला वेडी ठरवून हा माघारी आला.

पण त्या रात्री ह्यानं एकल्यानंच मजा करावी म्हटलं. म्हणून घरातून निघाला. जाताना त्यानं आपल्या घराला म्हटलं, "उद्या मालकीण येणार. तयारीत असा." मग त्यानं उंबरठ्याला बजावलं, 'त्या मऊ गोऱ्या नाजूक पावलांचा स्पर्श उद्या तुला होईल. म्हणशील की, राणीची ही पावलं कुठं गवसली देवा! माझं केवढं भाग्य म्हणावं?" तसा तो आपल्याशीच हसला. दर्पणात त्यानं आपल्याला





अनुक्रमणिका

पाहिलं. आपले डोळे, आपलं रंगरूप त्याचं त्यालाच आवडलं न् तो बोलला देखील, "मी पण काही कमी नाही म्हणावं!" शेवटी त्यानं दाराला सांगितलं, "उद्या राणी सरकार यायच्या. आदबीनं उघडायचं हं कवाडा!" त्यासरशी त्याचं सगळं घर एकदम खडखडून हसलं आणि हा जसा लाजून गेला म्हणावा!...

येसवा विसवा कोणी कुठं भेटलीच तर जवळ असू द्यावी म्हणून त्यानं पिस्तुल भरून घेतलं आणि मग आपला घराबाहेर निघाला.

वाटेवर टिप्पूर चांदणं पडलं होतं. आभाळात चांदण्या लखलखत होत्या. हवेत गारवा होता. मनात उत्साह होता. भुतंखेतं जगात नसतातच असं त्याचं म्हणणं होतं. माधुरी म्हणाली त्याप्रमाणं कुठं कुणी येसवा असेल हे खोटे असं त्याला वाटत होतं.

होता होता ते तळं आलं. भोवती दाट जंगल. समोर काजवे चमकतेले. हा पुढं आला. तर कुठं काहीच नाही. म्हणताना आंघोळ करावी म्हणाला न् कपडे अंगावरून उतरत पाण्यात पाऊल टाकणार एवढ्यात कुठून तरी तो गोड आवाज पुन्हा यायला लागला. ह्याला शंका आली. म्हणून त्यानं नीट कान दिला. वसतोय तर समोर त्या तळ्याच्या मधल्या भागातून एक चांदणी चमकत वर येतेली न् तो आवाज आणखीनच गोड होत घुमतेला. एवढंच नाही तर त्या लख्ख चांदण्यात झिरीमिरी पाऊस पडतेला. दाट धुकं येतेलं. हीव भरावं तसा गारठा सुटलेला. तर ते बघून हा जरा गडबडूनच गेला. माधुरी म्हणाली तसं काही खरंच आहे काय? ह्याच्या डोक्यात हा शंकेखोर विचार नाचू लागला.

तेवढ्यात दाट धुक्याच्या पड्याला मागं सारीत एक सुंदर देखणी स्त्री नखशिखांत पांढरं वस्त्र ल्यालेली अशी त्या पाण्यातून तर वर यायला लागली. त्यासरशी हा मागं सरकायला लागला. पण हालता कुठं येत होतं? त्याचे पाय जखडले गेले होते. शरीर बधीर झालं होतं. कानात तो आवाज घुमत होता न् आता ही बाई हसून त्याला विचारीत होती, "मी येऊ का" तशी ह्यानं तिला दरडावून विचारलं होतं, "तू कोण आहेस?" त्यावर ती खदखदून हसली होती आणि तिचं गाणं आणखीनच दाटलं होतं...

कुणीतरी आपल्याला खेचतंय, बांधून ठेवतंय अशी खात्री पटल्यावर माधुरीनं सांगितलेली हीच ती येसवा असावी शंका येऊन जयनादला घाम फुटला. पण त्यानं धीर सोडला नाही. आपल्या जवळचे कपडे अंगावर चढवीत त्यानं पिस्तूल बाहेर काढलं आणि तिच्यावर नेम धरला. एक गोळी सुटली, दुसरी सुटली, तिसरी गेली तरी तिचा परिणाम त्या बाईवर झालाच नाही! मग मात्र हा हादरून गेला. तिला चालती हो म्हणत तिच्या अंगावर खेकसला. पण मग ती पुढं पुढं सरकायला लागली. आपल्या मिठीत ह्याला खेचावं म्हणून हात वर करीत यायला लागली. तसा हा मनातून चरकला. त्यानं पुन्हा पिस्तूल झाडलं. एका मागून एक गोळी उडायला लागली. पण अहं! ती पुढं पुढंच यायला लागली. म्हणताना ह्यानं ओळखलं की, आता खरंच ही येसवा आहे न् आपल्याला ती आता मारणार. म्हणून ती अगदी जवळ येताच ह्यानं पिस्तुलातली शेवटची गोळी झाडली न् तिलाच आपण खेचावी म्हणाला. त्यासाठी त्यानं खिशात हात घातला तर दोरीच्या ऐवजी माधुरीनं त्याला दिलेलं शिंपल्याचं कवच हाती लागलं न् एकदम माधुरीच्या सांगण्याची आठवण येऊन त्यानं ते आपल्या कानाशी धरलं.

एवढ्यात त्या महामायेनं ह्याच्या कमरेला विळखा घातला पण! अरे देवा! आता काय होणार?

पण जयनाद सावध होता. त्यानं आपले दोन्ही हात वर करून हिचा समाचार घ्यायचा बेत केला. तेवढ्यात माधुरीचा आवाज त्या शिंपल्याच्या कवचातून त्याच्या कानात घुमायला लागला न् हिची मिठी आपोआप ढिली पडत गेली! त्या आवाजाची गति वाढली, नाद घुमायला लागला तशी ही विरघळा-





अनुक्रमणिका

यला लागली न् तिचा आवाज अंतर्धान पावत चालला.

घटकाभरात येसवा दिसेनाशी झाली न् आवळून करकचून आपल्या भोवती बसलेले तिचे पाश सुटत गेल्याची जयनादला खात्री पटली. तो तळ्यातून वर आला. त्यानं चंद्राकडे पाहिलं. चांदण्यांच्या वरून नजर टाकली. त्याला धीर आला. अधाशाप्रमाणं त्यानं त्यावेळचं चांदणं पिऊन टाकलं न् घशाला पडलेली कोरड घालवली. मग तो तिथून निघाला. पहिल्यांदा त्याची चाल हलकी होती पण नंतर तो पळत सुटला. त्यानं जी धाव मारली ती थेट माधुरीच्या घरापर्यंत?

त्यावेळी मध्यरात्र उलटून गेली होती आणि माधुरी आपल्या झोपडीतून बाहेर येऊन जयनादची वाट बघत बसली होती. त्यानं सुखरूप यावं म्हणून हिनं देवाची पूजा बांधली होती. त्यासाठी आसपासच्या झाडाझुडपाना, पशुपक्ष्याना, चिटपाखराना, किड्यामुंग्याना, विंचूसापाना, खड्या मातीला असं तिनं बोलावणं केलं होतं. आपल्या अंगी हत्तीचं बळ देत आलं संकट घालवा म्हणाली होती. येसवेनं जयनादला नक्कीच गाठलं आहे याची खात्री पटून ती पुन्हा पांढरीफटक झाली होती. मनी तिनं शंकरपार्वतीचा धावा केला होता.

तेवढ्यात जयनाद धावत येतेला हिनं पाहिला. तशी हिच्या भोवती जमलेले हे पावणे रावळे हसले. ही लाजून चूर झाली. जयनाद समोर दिसताच धावत जाऊन हिनं त्याला विचारलं, "आलास? बरा आहेस?" त्यासरशी जयनादनं माधुरीला गाढ आलिंगन दिलं आणि आपला थकला भागला देह तोलवीत झाली गोष्ट सांगून टाकली. म्हणताना आपलं शहारलेलं अंग आवरीत आणि भीतीनं काजळून गेलेलं मन आता खुशालीत आणीत हिनं जमलेल्या नात्यागोत्याला नमस्कार केला. आशीर्वाद द्या म्हणाली.

तर अवचितच एकदम सनई चौघडा वाजायला लागला. केळी नाग्ळी माया वहिणींनी हिला न्हाऊ माखू घातलं. हिरव्या चाफ्यानं चुडा भरला. मरव्यानं हिला वेणी माळली. जाईजुईनी न् मोगऱ्या शेवंतीनी हिचं नेमुतं वस्त्र गुंफलं.

तेवढ्यात वाजंत्रीतुत्यानी देवदेवता आल्या. नक्षत्र चांदण्या आल्या. चंद्रसूर्य आले. दाही दिशानी डेरे दिले. ऊसमळे पानमळे आंदण दिले गेले. आणि या सर्वांच्या साक्षीनं ह्या दोघांचं लगीन लागलं. त्यासरशी तिथं जमलेल्या चोख्यामेळ्यानं आपलं नाचगाणं करून असा आनंद प्रकट केला की, त्याची अपूर्वाई आम्ही काय सांगावी देवा! रायाइंद्राच्या घरच्या लग्नाला देखील असला डामडौल असतो म्हणता काय कधी? छे? नाही वा!

•••

अव्याहत वाहणाऱ्या,
पार्थिवाकडे जाणाऱ्या, प्रकटणाऱ्या.
ठसणाऱ्या आणि पुन्हा
आपल्यावरच उलटून चेतविणाऱ्या
या चार धारदार प्रेरणा.

# त्याच प्रेरणा

--दिलीप पुरुषोत्तम चित्रे



## विषुववृत्त

**पृथ्वीच्या** दोन्ही ध्रुवांपासून समान अंतरावर, तिच्या मध्यावरून शून्य अक्षांश नावाची जी रेप जाते तिलाच विषुववृत्त म्हणतात. ह्या ठिकाणी ऋतु नसतात. नेहमीच प्रखर उन्हं, दररोज दुपारी पाऊस पडतो. आणि रात्री आकाश निरभ्र, लख्ख निळं.

ह्या ठिकाणी प्रचंड आणि घनदाट अरण्यं आहेत. ह्या ठिकाणी कोटयवधी प्रकारच्या वनस्पति उगवतात, त्यांवर लक्षावधी प्रकारचे कीटक पोसतात आणि ह्या ठिकाणी परस्परभक्षण आणि आत्मसंरक्षण हा एकच जीवनाचा नियम आहे.

इथला माणूस खुजा असतो. तो नागड्यानेच वावरतो. तो आळशी आणि क्रूर असतो. सर्व प्राण्यात तोच श्रेष्ठ. कोणत्याहि भूगोलाच्या पुस्तकात तुम्हाला ही हकीकत आढळेल.

जगात एक काळोखा भूखंड आहे. तिथले लोक काळे आहेत आणि तो अनेक शतकं इतर खंडांमधल्या लोकाना अज्ञात होता. तिथे जिराफासारखे चेतन रेखीव प्राणी, पाणथळीत पहुडलेले हिप्पोपटेमस् कशावरहि शिंगं रोखून धावत जाणारे ऱ्हायनोसेरोस, सोनेरी आयाळींचे उन्हाळ सिंह, प्रचंड हत्ती, तऱ्हेतऱ्हेचे पक्षी आणि झाडं आढळतात.

तावडच्या समुद्राच्या दक्षिणेला एक डोंगराळ, पठारी मुलुख आहे, त्यातून मागे एकदा पृथ्वी दुभंगली तेव्हा उघडलेली एक दरी जाते. आता ह्या दरीतून सरोवरांचा एक सर विषुववृत्तापर्यंत रुळतो आहे. वर जे पहाड आहेत, त्यातले कित्येक दहा दहा पंधरा पंधरा हजार फूट उंच आहेत. त्यांच्यावरचे लाव्हाचे ओघळ अजूनहि वाळले नाहीत असे दिसतात. सुप्त ज्वालामुखांमध्ये कालांतराने सरोवरं भरून आली.

हे डोंगर चढावेत तशी, निसर्गनियमानुसार, दर तीनशे फुटाना उष्णता एकेक अंश कमी होते. ऐन शिखरांवर, विषुववृत्त चाटून जात असलं तरीहि, केवढी थंडी असते. विषुववृत्तापासून ध्रुवप्रदेशांकडे जाताना वनस्पती जशा विरळ, सुटसुटीत, सड्या, होत होत नाहीशा होतात, तसंच डोंगर चढतानाहि दिसतं. दर हजार फुटाना हवामान बदलतं, वनस्पति बदलतात.

ह्या प्रदेशात लोकवस्ती अत्यंत विरळ आहे. अप्रकट खंडातल्या ह्या अप्रकट देशातली माणसं हजारो वर्षं बहुशः एकटीच आहेत. त्यांच्या जीवनक्रमाला बाहेरच्या जगाचा फारसा स्पर्श झालेला नाही.

एखादा बाहेरला माणूस इथल्या नकाशांवर रखडतो आपल्या अज्ञात रक्ताचं भाषांतर करीत. त्यावेळी त्याला उभं राहावं लागतं चिलालू नावाच्या एका डोंगरावर आणि इवाई नांवाच्या एका सरोवराकडे पहावं लागतं.



अनुक्रमणिका

त्यावेळी हिंस्त्र एकान्तात तो उभा असतो.
त्यावेळी इथली व्हर्जिन स्तब्धता अफाट वाटते. त्यावेळी त्याच्या हाताशी मानवतेचा इतिहास नसतो, परंपरा नसतात, संस्कृती नसतात, विज्ञान नसतं, धर्म नसतात, अध्यात्मं नसतात.
त्यावेळी माणूस आदिमानव असतो आणि त्याला स्वतःची आरोळी-सुद्धा ठाऊक नसते. अर्थात्, तुमच्या भूगोलाच्या पुस्तकात ह्या गोष्टी सांगितलेल्याच नाहीत.

## भय

भय कसलं, तर अखेर स्वत्वाचा नाश होण्याचं.
लहानपणी एकदा पोहण्यासाठी मी विहिरीत सूर मारला होता त्यावेळी पाण्याखालच्या वेलीत पाय अडकला, तेव्हा मला भय वाटलं होतं. नंतर एकदा शर्यत धावल्यावर मी चक्कर येऊन पडलो होतो तेव्हा छातीचे मंदावणारे ठोके मला काबूत ठेवता येईनात, तेव्हाहि भयच वाटलं होतं. पुढे एकदा गर्दीत अक्षरशः चेंगरलो तेव्हाहि भय वाटलं होतं. विजूवर आपलं प्रेम आहे हे कळलं तेव्हा भय वाटलं, ती मरणार असं वाटलं तेव्हा भय वाटलं होतं, एकदा समुद्राकाठी बसलो असताना माझीच आरोळी विश्वाच्या हद्दींना आदळून माझ्या-वर कोसळतेय असं वाटलं आणि भय वाटलं. संभोगाच्या बेफाम अंधारात कोसळताना प्रथम मला भयच वाटलं. माझं भय माझ्या प्रत्येक भावनेशी निगडित आहे.
अखेर मला वाटलंय् ते चांगल्या पगाराची नोकरी मिळाल्याचं कळल्यावर. मला सुरक्षिततेचंच भय वाटतं, सुरक्षितता मला फार फार हवी असते पण तिच्यातच माझा क्षयही होतो.
भय ओलांडलं, त्याचा बांध फोडून गेलं की आनंद होतो.
आपला डळमळलेला गुरुत्वमध्य स्थिरावताना भय नाहीसं होतं.
म्हणूनच भय ही माझी मूळची भावना: माझा अचानक विस्तार होताना माझा थरकाप उडतो. नवे अनुभव येताना भय आणि आनंद ह्यांच्या संमिश्रतेत माझा थरकाप उडतो.
स्वत्व गमावणं आणि निरंकुश ठेवणं ह्या दोन्ही प्रेरणा माझ्यात आहेत. स्वत्वाचा विसर पडणं हा माझा मोठ्यातला मोठा अनुभव. ह्यालाच मी सम-रसता म्हणतो.

## शहाणपण

शहाणपण हृदयातून येतं, भावनेपोटी जन्मतं. मला कळलं होतं की, वस्तू जमवू नयेत, कसलाच संचय करू नये, सत्ता शोधू नये, फक्त गावोगाव प्रवास करावा. पण हे प्रत्यक्षात कठीण गेलं. ह्याचं मुख्य कारण म्हणजे भूक. डॉमिनिक प्रार्थना करायचा "अगा आम्हाला आजचीच रोजची भाकर घाल." हे ख्रिस्ती लोकांचं शहाणपणच.

## एक माणूस



[१९६५ च्या राष्ट्रीय कविसंमेलनात दिल्लीला ही कविता वाचली. तिचे बहुतेक भारतीय भाषांमध्ये अनुवाद झालेले आहेत.]

एक माणूस
रडण्याऐवजी चालत जातो पायांखाली येतील ते रस्ते
त्याच्या प्रत्येक पावलाएवढा अश्रू सांडतो एकेक रस्त्यावर

एक माणूस
दुःख झालं तर बडबडतो भलतंसलतं
शब्दाने शब्द वाढवतो
एक माणूस
त्याच्या गळ्यातला विचार येत नाही कधीच जिभेवर.

एक माणूस.
हसण्याऐवजी फक्त जोरात श्वास घेतो
भोवताली सर्वत्र हास्यध्वनि पसरतो
हादरतात इमारती, रस्ते गडबडा लोळतात,
थरथरायला लागतं आकाश. . .

पण त्याच्या पोटातला धरणीकंप
तोंडावाटे प्रश्न पडत नाही कधीच बाहेर. . .

एक माणूस
वर्षानुवर्षं व्यवहार करतो झोपेतल्या झोपेत
क्वचित जागा होतो
आणि उन्हं घट्ट होतात त्याच्या चेहऱ्यावर. .

—दिलीप पुरुषोत्तम चित्रे

सगळे संबंध त्याज्य मानणारे महानुभाव शहाणे होते. सदभिरुचीलाहि बंधन मानणारे आणि आपली अनुभवाची आवडच नष्ट करणारे योगही शहाणे होते.
पण मी दुसरं शहाणपण स्वतः शोधून काढलं. ते म्हणजे स्वतःच्या स्वभावातून आलेल्या सर्व गोष्टींचा निमूट स्वीकार करावा. आणि स्वतःचा स्वभाव प्रत्येक वेळी नव्याने ओळखावा, त्याबद्दल आडाखे बांधू नयेत.
आपली स्वतःचीच एक मूर्ति असते, पण ती इतरांना. स्वतःला स्वतःची मूर्ति नसते. आरशात काही आपल्याला आपण दिसत नाही. स्वभाव आणि स्वत्वाची ओळख एकचः त्यात स्फुरणाची जाणीव असते.



अनुक्रमणिका





एक भापा आणि एकच स्पर्श ओळखणाऱ्या स्त्रीत आणि माझ्यात पुष्कळ अंतर पडले. मी काही "खांब" नव्हते, हाडामासाची पुतळी होते. परपुरुषाच्या त्या प्रत्येक स्पर्शाने व प्रत्येक शब्दाने माझ्यावर काही एक परिणाम केला. थेंब थेंब गळत राहणाऱ्या पाण्याने शेवटी खडक सुद्धा झिजतो. तसेच त्या एकेका शब्दाने व एकेका स्पर्शाने माझे संरक्षक संस्कार झिजवून टाकले. एकेक शब्द आणि एकेक स्पर्श. असे अनेक नाट्यप्रयोगातून अनेक शब्द व अनेक स्पर्श ! त्या शब्दानी व त्या स्पर्शानी माझी लाज नाहीशी केली. कुणाचीहि बायको आणि कुणाचीहि प्रियकरीण म्हणून स्वतःचा विचार करण्याची मला संवय लागली. ह्या विषयातली माझी किळस आणि नावड संपत आली. दिवसाचे चोवीस तास आणि आयुष्याचे सगळे दिवस मी केवळ तुमचीच बायको आहे असे मला मानता येईना. तुम्ही ज्या परिस्थितीत मला नेऊन टाकलेत, त्या परिस्थितीत ते शक्यच नव्हते. मी केवळ तुमचीच बायको नसणे, हे त्या परिस्थितीचेच पर्यवसान आहे. हे पर्यवसान तुम्हाला अपेक्षित नव्हते. "पातिव्रत्य केवळ स्पर्शाने नाहीसे होत नाही." "पातिव्रत्याला केवळ शब्दानी धक्का लागत नाही." असे तुम्ही मला कानीकपाळी ओरडून सांगत होतात. पण तरीहि आज नंदनबरोबर मला पाहून तुमच्या जीवाचा आकांत झाला. ह्याचा अर्थ असा की एकनिष्ठेची आणि पातिव्रत्याची तुम्हाला मजकडून एखाद्या "बुरसटलेल्या" पुरुषाइतकीच अपेक्षा होती. तुम्ही काहीही म्हणालात तरी माझ्या संस्कारांमुळे माझे पाऊल चळणारच नाही, परपुरुषाच्या विषयात ही अशी मी चुकणारच नाही, असे तुम्हाला वाटत होते. पण इथे तुमचा हिशेब चुकला. मी हाडामासाची माणूस आहे. आणि माणसाला त्याचे संस्कार घडवितात, हे तुम्ही विसरलात. गेली चार वर्षे तुम्ही मजवर सतत संस्कार केलात तो उत्तान शब्दांचा, आणि परपुरुषाच्या निकट स्पर्शाचा तरीहि नंदन मला भेटेपर्यंत आणि "प्रेम म्हणतात ते हे !"चा शंभरावा प्रयोग होईपर्यंत मी मोहाचे शेवटचे टोक गाठले नव्हते. "प्रेम म्हणतात ते हे !"ने तुमच्या माझ्या प्रेमाची व वैवाहिक जीवनाची समाधी बांधली. हे नाटक मला कीर्तीच्या शिखरावर नेऊन ठेवील, अशी तुमची अपेक्षा होती. ती अपेक्षा पूर्ण झाली. नाच, गाणी, अश्लील विनोद व उत्तान शृंगार ह्यानी रंगलेले हे नाटक फार यशस्वी झाले. शंभर दिवसात ह्या नाटकाचे शंभर प्रयोग झाले. आणि ह्या नाटकाचा शंभरावा प्रयोग झाल्यावर तुमच्या माझ्या वैवाहिक जीवनाची शंभर वर्षे भरली. हे असे होईल असं मला वाटलंच होतं. मनोमन मी किती पोखरली गेले आहे, हे मला ठाऊक होते. म्हणून ह्या नाटकात काम करावयास मी नकार देत होते. मी स्वतःला ओळखू लागले होते. मी नंदनलाहि ओळखू लागले होते; पण वस्तुस्थितीची ओळख पटली नाही तुम्हाला ! "तेजस्वी तारका राधावाला," "अभिनय सूर्यनंदन", निर्माता-दिग्दर्शक कृष्णकुमार ह्यांचे नवे गुलाबी नाटक "प्रेम म्हणतात ते हे !" अशी तुम्ही ह्या नाटकाची, नंदनची, माझी आणि स्वतःची पूर्वप्रसिद्धी सुद्धा करून

टाकलीत ! तुम्ही साधे कृष्णराव होतात ते कृष्णकुमार बनलात. मी चांगली "राधिका" होते, ती तुम्ही माझी "राधावाला" केलीत. माझं आणि स्वतःचं नावसुद्धा तुम्ही जागेवर ठेवलं नाहीत. ह्या नाटकाचं विज्ञापन पाहिल्यावर माझी आई म्हणाली सुद्धा की, "राधा, ह्या चार वर्षांत तुला निदान दोन पोरं तरी व्हायला पाहिजे होती. पण इथे पाहते तर राधेऐवजी राधावाला म्हणून तुझ्या नावाचे नगारे पिटले जात होते ! दिवसेंदिवस तू लहान का होते आहेस ?" माझ्या आईचं हे बोलणं तुम्हाला आवडलं नाही. आणि ह्या उत्तान नाटकात तुम्ही मला काम करायला लावावे हे माझ्या आईला आवडलं नाही. पण न आवडून करते काय ? पोरीचा संसार मोडू नये म्हणून ती गप्प बसली आणि "प्रेम म्हणतात ते हे"चा तुम्ही तिला बळानं दाखविलेला पहिला प्रयोग पाहिल्यावर लाजेनं चूर होऊन परत कोंकणात गेली. लाजेनं चूर व्हावं असेच "प्रेम म्हणतात ते हे !"मधले एकेक संवाद आणि प्रसंग होते. मिठ्या मारणं, दोन्ही हातानी मला उचलून गरगरा फिरवणं, सोफ्यावर मला ठेवून माझ्या पाठीला टेकून बसणं, माझे गालगुच्चे घेणं हे सारं नंदनला ह्या नाटकात करायचं होतं. ते त्यानी केलं. शंभर प्रयोगात शंभरदा केलं. मी ते सारं करून घेतलं. मी माझ्या भूमिकेशी एकरूप झाले. त्याना शब्दानं आणि स्पर्शानं प्रतिसाद दिला. मी त्याना "नाथ म्हणाले," "प्रिया" म्हणाले "माझ्या लाडक्या" म्हणाले. मी शरीरानं आणि मनानं त्यांची बायको बनले. एकदा नव्हे शंभरदा त्यानी मला मिठ्या मारल्या, माझे गालगुच्चे घेतले. त्यांचा स्पर्श मला आवडला. त्यांच्या स्पर्शाची मला संवय झाली. व त्या स्पर्शाची मी अन्य स्पर्शांशी तुलना केली. अण्णा पोतदारांचा स्पर्श, वसंतकुमारचा स्पर्श, चंदावरकरांचा स्पर्श, गोवर्धनबुवांचा स्पर्श, तुमचा स्पर्श ! त्या सर्व स्पर्शांहून हा स्पर्श सरस होता. बळकट, पुरुषी, मऊ, तरीहि दुबळा नव्हे ! मला ठाऊक झालेल्या शेकडो स्पर्शातून उमटून उठावा असा हा स्पर्श होता. एका बळकट, गुणी, बेदरकार, रंगेल, व्यसनी कलावंताचा तो स्पर्श होता ! असा स्पर्श मी कधी अनुभवलाच नव्हता. हा स्पर्श मला विशेष आवडला. ह्या स्पर्शाची मला तहान लागली. रंगभूमीवर मला नंदनचा जेवढा स्पर्श होत होता, त्याने माझी तहान केवळ वाढली. ह्या स्पर्शाच्या शेवटच्या टोकापर्यंत जावयास मी मनोमन उत्सुक झाले. माझी ही उत्सुकता नंदनच्या अनुभवी गात्रानी तात्काळ ओळखली. ही उत्सुकता माझ्या डोळ्यात दिसत होती, माझ्या शब्दात दिसत होती, माझ्या स्पर्शात दिसत होती. आता हे केवळ नाटक राहिले नव्हते. नाटकच सत्य बनू पहात होते. शेवटी नाटक हेहि एक सत्यच होते आणि सत्य हेहि एक नाटक होते. दोहोतली सीमारेषा फार पुसट होती. ही सीमारेषा आज दुपारी नंदनने ओलांडली. तो आपल्या झोपण्याच्या खोलीत आला. आला तसा माझ्या पाठीला टेकून बसला. त्यानं माझे गालगुच्चे घेतले. आणि दोन्ही हातावर मला उचलून गरगरा फिरविले. पुन्हा मला पलंगावर टाकले. आणि मग आजवर जी एकच गोष्ट घडायची राहिली होती तीहि घडून गेली. नाटक

आणि सत्य ह्यातली रेषा पुसली गेली. नाटक हेच सत्य झाले. सत्य हेच नाटक झाले. नावापुरताच प्रतिकार मी केला. त्या प्रतिकाराने त्याला अधिकच चेतविले. माझे गालगुच्चे घेऊन मला घट्ट कवटाळत तो म्हणाला, "अग, हे सगळं होऊनच गेलं आहे. शेकडो लोकांच्या साक्षीनं होऊन गेलं आहे. आणि जे रंगभूमीवर झालं नसेल, ते तुझ्या माझ्या मनात होऊन गेलं आहे. शेकडो वेळा होऊन गेलं आहे. मला ठाऊक आहे, मी तुला आवडतो, माझा स्पर्श तुला आवडतो" असं म्हणून त्यानं मला पुन्हा घट्ट मिठी मारली. जे जनात आणि मनात घडलं होतं ते प्रत्यक्षात घडलं. स्पर्शाच्या नशेचं शेवटचं टोक मी आणि त्यानी गाठलं. मी स्वत:ला विसरले, जगाला विसरले, तुम्हाला विसरले, आणि तेवढ्यात माझ्या वतीने कुणा बोलपट निर्मात्याशी बोलणी करायला बाहेर गेलेले तुम्ही अकस्मात् घरी आलात. नंदनला आणि मला तुम्ही एकत्र पाहिलंत. जे पाहिलत त्याचा तुम्हाला धक्का बसला. तुम्ही मला दूषणं दिलीत, माझा धि:कार केलात. मला घराबाहेर जायला सांगितलत. "हे मी कसं केलं ? हे मी कां केलं ?" म्हणून पुन्हा पुन्हा तुम्ही मला प्रश्न करीत राहिलात. मी जे केलं, ते मी कां केलं, ते माझ्या हातून कसं घडलं त्याचं प्रांजल स्पष्टीकरण मी दिलं आहे. मी म्हणते, तुम्ही जे पेरलेत ते उगवले, तेच तुमच्या पदरात पडलं. माणूस हा माणूस आहे, शब्दाना काही अर्थ आहे, स्पर्शाला काही अर्थ आहे, संस्काराना काही अर्थ आहे, मान-मर्यादाना काही अर्थ आहे, हे तुम्ही विसरलात. इथेच तुम्ही चुकलात. तुम्ही स्वातंत्र्य दिलत, मला जगापुढे आणलत, माझ्या गुणाना उजाळा दिलात हे सारं खरं आहे. पण गृहिणी आणि नटी ह्या दोन भूमिकातच काही मूलभूत भेद आहे, हेहि खरं आहे. मला ह्या दोन्ही भूमिका यशस्वीपणे पार पाडता आल्या नाहीत. ज्या कुणा देवतेला त्या पार पाडता येत असतील तिला माझे नमस्कार. मी घर सोडून जाते आहे. मला तुम्ही घटस्फोट देणार आहात की नाही ते मला ठाऊक नाही. नंदनवर माझं अगदी "एकनिष्ठ" प्रेम आहे असं मात्र समजू नका. अनेक परपुरुषांचा स्पर्श ठाऊक झालेली मी बाई आहे. आज मला नंदनचा स्पर्श विशेष आवडला. उद्या आणखी कुणाचा जास्त आवडणारच नाही असं मुळीच नव्हे. रुचिपालट म्हणून सुद्धा आवडेल. "नवरा असून तुम्ही माझ्याशी मित्रासारखं वागलात" असं तुम्ही मला कळवळून म्हणालात ते तसं खरंही आहे. म्हणून पुन्हा लग्न करणार असलात तर मित्रभावनेनेच तुम्हाला सांगून ठेवते की नवरा हा वायकोचा केवळ मित्र असून भागत नाही. नवऱ्याचं नातं हे मित्रापेक्षा वेगळं नातं आहे. केवळ मित्रभावनेपेक्षा नवऱ्याच्या ठिकाणी पुष्कळ जास्त गोष्टी असाव्या लागतात. मित्र हा कधीहि नवऱ्याची जागा घेऊ शकत नाही. आणि नवरा हा नुसता मित्र असून चालत नाही. स्त्री नवऱ्याला जे काही देते, आणि नवऱ्यावर ज्या प्रकारचं प्रेम करते, त्या प्रकारचं प्रेम ती मित्रावर करू शकत नाही. तिच्या काही भावना, तिचे काही शब्द आणि तिचे काही स्पर्श केवळ तिच्या नवऱ्यासाठीच असतात. तुम्ही पुन्हा दुसरं लग्न केलत, तर एवढं लक्षात ठेवावं अशी विनंति आहे. माझी चिंता करण्याचं तुम्हाला कारणच नाही. कीर्ति, संपत्ति आणि अनिर्बंध स्वातंत्र्य ह्यांची वाट तुम्ही मला दाखवूनच दिली आहे. ह्या गोष्टींचं द्यावं लागलं ते मोल मीहि दिलं आहे आणि तुम्हीहि दिलं आहे. तुम्हाला अधिक मोल देण्याची वेळ येऊ नये अशी मात्र इच्छा आहे. जास्त काय लिहू ? ●●●








अनुक्रमणिका

[ पान ४५ वरून – सुवास ]

"कोई आया था ?"

"नहीं साव !"

"क्यों ?"

"जी साव ? कौन आनेका था ?"

"यही कोई आनेवाला. . . "

"क्या साव ?"

"कुछ नहीं ! देखो वेटर.... लेकिन यह सब अंधेरा क्यों ? कमरा खोलो; सारी बत्तियाँ जला दो; हम सोयेगा; एक जाम चाहिये.'

"अभी लाया साव !"

"रंग कैसा ?"

"अस्मानी साव !"

"और परीका रंग ?"

"शरबती साव ! साथमे बरफ..."

"ठीक है. एकदम जल्दी."




खिडकीतले गुल्मोहराचे वन झोपले होते. फुलदाणीतली फुले एकमेकावर कलली, बिलगली होती. वरचा बल्ब छोटया मेजाच्या काचेतून मिस्किलपणे बघत होता.

पहिल्या गार घोटात जाग आली. पेला पूर्ण भरला होता. आतल्या पोकळीत तो रिचविला की सगळे ठीक होईल ! व्हायलाच हवे; कसे तरी करून झोप यावी म्हणजे डोळे बंद होतील !

दार टिकटिकले; उघडले गेले.

"सरोजा ?"

"नाही, सुधा—सुधा कर्वे."

"तेच ते ! इथं ? इतक्या अवेळी ?"

"उशीर झाला. गर्दी होती. सर्वांदेखत पत्ता विचारायचा....."

"मी तिथंच शोधत राहिलो."

"मला कळलं ते ! छान भाषण झालं ! मन भरून ऐकता आलं; डोळे भरून बघता आलं ! मुद्दाम इतकी लांबून आले ते सार्थकी लागलं !"

"इतक्या लांबून ....?"

"का ? यणार नाही असं वाटलं ? आज सकाळी आले. उद्याचं भाषण ऐकून परत जाईन. घरी सगळं ठीक ? आई. . . . "

"हे एवढं विचारायला इथवर. . . . "

"नाहीतर आणखी कशाला ?"

"बरं; बसा तर खरं !"

"बसा ?"

"बरं, राहिलं ! बैस तर खरी ! पण इथं या भाडोत्री खोलीत तुला बसायला सांगायचं तरी कुठं ?"

"इथली जमीन देखील स्वच्छ आहे ! तुम्ही भेटला तेवढं..."

"तुम्ही ?"

"बरं; राहिलं ! एक बंधन कमी झालं; एक ओझं उतरलं; पण त्याला दहा वर्षं लागली ! आजचं तुझं भाषण ऐकलं. अन् वाटलं की तुझी उंची.....!"

"एक मिनीट हं....!"

"हे काय ?काय आहे त्या पेल्यात ?अन् ते ओततोस कशाला?"

"आता त्याची गरज नाही. यापुढे उरणारही नाही. तू आज आलीस हे सतत आठवावं म्हणून हा एक दुबळा निश्चय !"

"पण आहे काय ते ?"

"तुला नाही ना कळलं ? मग न कळलेलंच बरे ! औषध आहे झोपेचं! तू मात्र अजून तशीच आहेस ! दहा उन्हाळे, पावसाळे बाधले नाहीत तुला. म्हणूनच वेडयागत विचारते आहेस की काय आहे त्यात !"

"दहा पावसाळे नि उन्हाळे तुलाही तर बाधलेले दिसत नाहीत. मी असाच बघितला तुला !"

"असतं एकेकाचं असं !"

"कसं ?"

"तू इथनं घरी गेल्यावर तुझा एखादा जुना फोटो असला तर तो







बघ ! त्याला बाधले असतील ग्रीष्म अन् शरद ! तुला नाही !"

"असलं बोलायला आलं म्हणजे भापण चांगलं देता येतं का ?"

"का ? तुला शिकायचं आहे ?"

"कुणाला नाही शिकावं वाटणार ?"

"कुणाचं नको सांगूस. तुला शिकायचंय् ?"

"हो. शिकवितोस ?"

"फार सोपं आहे. ते शिकावं लागत नाही. आपोआप येतं. त्यासाठी फक्त डोळे मिटता आले पाहिजेत. त्या मिटल्या डोळ्यांना अशी आकृती दिसायला हवी—जिवंत, सचेत ! पळसाच्या फुलासारखी सुरंगी ! आकांक्षाच्या क्षितिजावरून खुणावीत असलेली !"

"हा त्या पेल्यातल्या औषधाचा परिणाम दिसतोय् !"

"ते औषध फक्त कधीमधी डोळे मिटायला मदत करतं. हवं तर कायमचेही मिटतात डोळे."

"हा मात्र मी आल्याचा परिणाम !"

"तू नव्हे, त्या क्षितिजापल्याडची आकृती. तिथपर्यंत पोचायचं म्हणजे उंच व्हायलाच हवं; एकेक पाऊल उंच, वर वर चढायलाच हवं ! तो वेध एकदा लागला की बोलणं, लिहिणं, जगणं कसं सोपं सोपं वाटायला लागतं !"

"अशी एक आकृती माझ्याही मनात होती... अजून आहे ! पण माझा स्वार्थ नडला. तिनं माझ्याकडे यावं असं वाटलं मला. आली नाही ती. मी जायचं तर पाऊल उचलेना; बांधले गेले होते मी !"

"विशाद वाटतो सरोजा ?"

"वाटला तर ?"

"याचं उत्तर मला माझ्यात शोधायला हवं !"

"नाही सापडलं तर ?"

"तू असं बोलायला लागलीस सरोजा, तर माझं काय होईल ? समज, मी तुझ्याजवळ आलो असतो..."

"तर काय झालं असतं ?"

"आपल्याला या अशा भेटीचा आनंद भोगता आला नसता. पैल-तीराचं कोण सांगेल, पण ऐलतीरी आपण हरलो असं कधी वाटू नये माणसाला ! तुझ्याशी बोलणारा मी अगदी वेगळा आहे; तुझ्या-वांचून वावरणारा मी त्याहून वेगळा आहे. हे क्षितिजाचं अंतर कमी झालं असतं तर..."

"तर काय ? पुरतं बोलून टाक !"

"ते बोलून टाकण्यासारखं नाही सरोजा. पण तुझा शब्द, तुझा आदेश टाळता येत नाही म्हणून सांगतो. सरोजा, तुझ्या भावनांचा खुळखुळा करून मी माझा जीव रिझविला असता; तुझ्या मनाचं पोतेरे करून माझ्या हृदयाचं अंगण मी सारवलं असतं; तुझ्या सौष्ठ-वाच्या चिंध्या झाल्या असत्या अन् ती लक्तरं वाळत टाकायची सुद्धा मी कदर बाळगली नसती. कुणी कुणाला कवेत घेऊ नये, कुणी कुणाच्या आधीन होऊ नये. मला माझा सोस ठाऊक होता. पारि-जाताची फुलं मुठीच्या विळख्यात आली की अशी पिळून निघतात; घड सुकत नाहीत, नीट मरतही नाहीत... ! मला हे सहन करणं



## काळ्या ढगांच्या रेशिमसावलीतून

काळ्या ढगांच्या रेशिमसावलीतून चन्द्राची उमलतात असंख्य फुले
रात्रीच्या झोक्यावर चित्रेची साकी मुक्यामुक्यानेच सारखी झुले

झुलत झुलत कुठून कसे जवळ येतात रंगित पक्षी
वेतसीचे उंच हात कोरीत असतात नवल नक्षी

कौल कौल झांकत असते निळे डो` जपून लपून
निषादाची मेंदी लेऊन झुलते भिजून केदार धून

झुलत झुलत रंगित पक्षी लावून जातात कणस्वर
. . दूर दूर राहिलेले आभाळातले इवले घर....

. . वेतसीचे उंच हात . . रेशिमसावलीचा जुना लळा
खोल खोल कळत असतात निषादाच्या तीव्र कळा . .

—वासंती गजेन्द्रगडकर

अशक्य होतं !"

"पुरे पुरे ! उदय, मला हे कळायला हवं होतं. भारावल्यामुळे तोल गेला माझा ! आनंदाच्या उभारीत माझी मी राहिले नाही. मला सावध व्हायला हवं होतं !"

"सावध ?"

"हो सावध ! मी आले अन् तू तो पेला ओतून टाकलास ! मी तेव्हाच ओळखायला हवं होतं ! पण नसते रे... इतकी कल्पना नसते कुणाला की कुणीतरी आपल्याला इतकं उंच उभं केलंय् ! नाही उदय, आता चुकणार नाही. माझी देखील आजची ही दुबळी शपथ ऐकून ठेव. तू मला उभं केलंस त्याहून मी एक पायरी आणखी वर चढणार आहे, माझ्या प्रयासानं !"

"आपण दोघंही जरा खाली उतरू या का ? पतंगांच्या दोऱ्या फार ताणल्या गेल्या आहेत. थकलीस तू ! एखादं छान थंड मधुर पेय घेऊ आपण !"

"तू जे देशील ते गार असेल, मधुर असेल. माझ्या मुक्कामी जायच्या अगोदर तेवढं पिऊन घेते. आणखी लागलं तर देशील ना ?"

तिने माझे दोन्ही हात आपल्या डोळ्यांवर दाबून धरले. त्या

गोऱ्या गोऱ्या ओल्या मुखड्याचा स्पर्श ! काही क्षण.... आणि नंतर तिचे नेत्र मला निर्भयपणे कुरवाळू लागले.

"त्या खिडकीतनं कसला बहर दिसतो आहे ?"

"गुल्मोहराचा !"

"खोटं !"

"खोटं नाही; चल दाखवतो तुला !"

"पण मग हा सुवास कसला येतोय् एवढा ?"

"तू आत पाऊल टाकलंस ना, तेव्हा पासूनच....."

"नाही; मी तुला बघितलं ना ? तेव्हाच..."

"तुझी तू रहा, माझा मी राहतो. आपण दोघे भेटलो, बोललो तेच यातलं खरं ! मी असेन, नसेन; तू राहशील, जाशील; पण हा सुवास राहील. जायचा नाही !"

"परत मग येऊ मी ?"

"मी काय म्हणू ?"

"अगदी नि:संकोच 'ये' असं म्हण; म्हणजे मी गेलो तरी खरोखरची जाणार नाही."

"निरोप देतो तुला, पण एका अटीवर."

"कोणती ?"

"ते वेणीतलं तेवढं फूल ठेवून जा."

"मग मीही काही घेऊन जाते. हा पेला रिकामा झाला आहे. काही तरी भरून ठेवीन त्यात; काचेचा आहे.; जपेन, तडा जाऊ द्यायची नाही. येते मी !"

सरोजाला पोचवायला बाहेर आलो. आंगणात येताच आकाश दिसले. चांदण्या कशा दाटीवाटीने बसल्या होत्या; त्यातली एकेक चांदणी मधून मधून, अशी खाली, थेंबाथेंबाने ठिबकत ठिबकत... पारिजाताच्या फुलासारखी ! ●●●

---

[ पान ४८ वरून – **बावनखणी** ]

अभंग कशी राहील? पुण्य प्रतापी जरिपटका दारुबाजाचा दस्त–रुमाल अथवा कलावंतिणीची कांचोळी कां होणार नाही?—

आँ? काय म्हटलं, श्रीधरपंत? हां, हां, प्रायश्चित्त! अहो पण प्रायश्चित्तासाठी माझ्याकडे कशाला आलात? त्या महेश्वर दीक्षितांकडे जा.

"अहो ते सारं सव्यापसव्य झालं. त्यानी आधी भरपूर दक्षणा घेतली नि नंतर ब्रह्मवृंदाची सभाहि घेतली. मनु,



याज्ञवल्क्य, पराशर, देवल इत्यादि सर्व स्मृति धुंडाळल्या, पण या पापाला प्रायश्चित्त आढळलं नाही. दीक्षित म्हणाले, 'अशा पापाची नोंदच नाही. कारण त्या काळचे पुरुष असे लाथाखाऊ नव्हते!' तेव्हा तुम्ही बावनखणीतील प्रमुख विटांची–म्हणजे वेश्या–शास्त्र–पारंगत मध्यस्थांची–पंचायत भरवा आणि तीत ठरेल ते प्रायश्चित्त घ्या. म्हणून तुमच्याकडे आलो................

—ठीक आहे. आज-उद्या सर्व मध्यस्थ–महर्षींची पंचायत भरवतो. पण. . पण...

"हां हां द्रव्याची चिंता करू नका. . . ही घ्या मोहरांची थैली, जातो मी."

—बरं, या. . वाहवा, चंचल लक्ष्मी अशी अलगद मूर्खांच्या हातून निसटून धूर्तांच्या हाती पडते! वाईट, फार वाईट आहे हे सारं. पण करणार काय? आपला हा पोट-पाण्याचा धंदा पडला. प्रमुख प्रमुख विटाना निमंत्रण देण्यासाठी मला आज दो प्रहरीच बावनखणीत गेलं पाहिजे !

[मंडलाकार फेरी मारून.]

बावनखणीच्या तोंडालाच असलेला हा जुगार अड्डा ! आम्हा गणिक-दलालांचे हे दोप्रहरीचे ठिकाण! पण आज या अड्डयावर एकहि मध्यस्थ महर्षि हाजीर नाही. आता सरळ बावनखणीत जाऊनच शोधाशोध करावी हेच बरे !

[मंडलाकार फेरी मारून.]

वाहव्वा! आमच्या या पुण्य पत्तनासारखी बावनखणी दुनियेत कोठेहि नसेल. रावबाजीच्या कारकीर्दीत तर ही वस्ती एखाद्या गुलजार नारीसारखी भर ज्वानीत आली आहे! जवानीच्या हिरव्या रंगाने सजली आहे. इथली एकेक हवेली! आणि या हिरव्या हवेलीच्या शानदार खिडक्या! जोबनवंतीचे संगीन जोबन वारंवार घासले गेल्यानेच की काय, या खिडक्यांचे हे नक्षीदार कठडे कसे गर्वाने चकाकत आहेत पहा! इष्कबाजाच्या अधीर हृदयाप्रमाणे, हिरवेगार मखमली पडदे या खिडक्यांवर घोटाळत आहेत! राघू–मैनांचे सोनेरी पिंजरे ठायी ठायी लटकले आहेत !

पण या खिडक्याना खरी शोभा येते त्यात कामातुर कामिनी उभ्या राहतात तेव्हाच ! नक्षीदार चौकटीत एखादे सुरेख चित्र शोभावे, तशा देशोदेशींच्या कलावंतिणी या खिडक्यात शोभून दिसतात. फुलांच्या माळानी नि चंदनाच्या धुपानी या माड्या दरवळत आहेत; सुगंधी निश्वास सोडीत आहेत!

येथे अहोरात्र दणाणतात छुमछुमत्या पैंजणांचे अन् किणकिणत्या कमरपट्ट्यांचे झंकार! येथेच अहोरात्र घुमतात गजल-

अनुक्रमणिका

ठुमऱ्यांचे नि लावण्यांचे टिपेतले ललकार, येथेच वेमुरवत खुलतात जोबनशाहीचे उमलते उभार! येथेच धनिक–वणिक-वाळांची शिकार करतात कुटिल कटाक्षांचे भडिमार! .....इथल्या वारांगनांच्या पराक्रमावर मदनाचा दिल खुप झाला; अन् त्यानेच त्यांच्या लढवय्या नितवाना, झुंजार स्तनाना आणि तीरंदाज नयनाना वढती दिली आहे! ही वेश्यावस्ती नव्हे, तर मदनराजाचा सरकारवाडा आहे; सचिवालय आहे! अथवा कामदेवाने मांडलेला हा देह विक्रयाचा नि शृंगाराचा वेफाट हाट आहे, वाजार आहे! नाही, नाही ही वावनखणी म्हणजे मदनाची यज्ञभूमि आहे. येथील ऐनेमहाल म्हणजेच अग्निकुंडे आणि त्यात धडधडा पेटलेल्या ज्वाळा म्हणजेच या गणिका–

[ दिंडी ]

**अहो गणिका या मदन–मद ज्वाळा।**
**मधुर चटका लाविती अंतराला।**
**त्यांत कामी विसरून कुलिनतेला।**
**देति यौवन–संपदा–आहुतीला॥**

अशा या वेश्यांच्या वस्तीत पांच मध्यस्थ–महर्षींना कोठे शोधू? मायेच्या नखरेल पसाऱ्यातून ब्रह्म शोधून काढण्यासारखेच हे विकट काम आहे! पण ते केलेच पाहिजे.

[ एक मंडलाकार फेरी मारून ]

"अहो, खंडोशंकर माडीवाले! जरा माडीवर या की! विसरलात की काय?"

—अरे, ही तर ओळखीची हाक दिसते. हां, ही तर माझी जुनी पुराणी साजणी बकुळा सुपेकर! हल्लीची तरणी पोरे हिला म्हणतात–'बुढ्ढी घोडी–लाल. लगाम!' पण आमच्यासारखी वयस्कर मंडळी हिची रळी करीत नाहीत. हं, कसं काय बकुळा? आज रंगरंगोटी तर झक्क केली आहेस! .......

"केलीच पाहिजे रे सख्याहरी! जुन्या हवेलीला नवीन रंगोटी केलीच पाहिजे. नाहीतर पोपडेदेखील तिच्यावर ठरत

—खरं आहे. पाणी आटलेल्या विहिरीकडे नि जवानी घटलेल्या नारीकडे, कुत्रंहि फिरकत नाही. एकेकाळी याच माडीत तुझ्या मांडीला मांडी लावून वसण्यासाठी जवान जीवाची कोण झुंबड उडत असे! सारेजण फिदा होते तुझ्या नाच–गाण्यावर!

"पण मी फिदा होते केवळ तुमच्यावर! हे पानाचं तवक अजून साक्षी आहे. घ्या, सख्याहरी, हा कुलपी विडा घ्या!"

—तू विडा तर दिलाच पाहिजे. पण त्या काळचं एखादं गाणंहि म्हटलं पाहिजेन बकुळा!

"म्हणीन, जरूर म्हणीन. पण त्या आधी तुम्ही पहिल्या रात्री याच माडीत, याच लोडाशी टेकून, मुनावलेली शाहिरी पुन: ऐकवाल तर! आठवतं का, तुमच्या मुखात हा अस्सा विडा मी दिला होता, तेव्हा तुम्ही काय म्हणाला होतात?"

—आठवतं तर! मी म्हणालो होतो—

हवा कशाला विडा सुंदरी खुलवायाते रंगऽ?
तव अधराचे पान चघळता खुलेल ग रतिरंग!
कुरंगनयने! अनंग खुलवी तुझे कोवळे अंग
सरोज वदने! उरोज-वैभव करी कंचुकी तंग!

आहे की नाही माझी आठवण ताजी!

"अन् माझीहि आठवण ताजीच आहे, राजसा! मी जबाव दिला होता—

[लावणी]

इथें मांडला इश्कबाजिचा, शृंगाराचा हाऽट!
मोल पुरेसे मोजा आणिक खुशाल लावा हाऽत
माल मांडला नवा नवा
गाल गोजिरे नरम, खवा
अधर दलांचा शराब—पेला भरला कांठोकांऽठ
नारिंगाची रसाळ जोडी



बघ रसरसली तयांत गोडी
तुम्ही तपस्या फळास आली सुबक तयाचा घाऽट!!
मदन धनूसम भुवई छान
लखलखते नयनांचे बाण
काय हवे तुज बोल राजसा! दुकान सारे लूऽट!

—वः, तुझ्या या लावणीनं मला तर भूतकाळात नेलं! पण त्या रम्य आठवणीत रमायला वेळ नाही. पुनः येईन केव्हातरी मी जातो.

(मंडलाकार फेरी मारून)

अहो नशिवाचं मडकं फुटलं! इतक्या गोड गायनानंतर हे कडू कारलं कां आडवं आलं? ऱ्हस्व—दीर्घ—काना मात्रा; कर्ता—कर्म—क्रियापद; वर्तमान—भूत—भविष्य ह्यांचा चक्रव्यूह गलेलठ्ठ शब्दात रचणारा हा व्याकरण पंडित! ह्याचा कर्ता (म्हणजे याचा बाप!) अतिशय सालस शुचिर्भूत होता. पण ह्या स्वारीचं क्रियापद आणि कर्म पहावं तर ते या बावनखणीत पडलेलं. ह्याची थोडीशी थट्टा केलीच पाहिजे. राम राम, पंडित मोरोबा! काय हो, ठीक आहे ना? त्या साळू सातारकरणीशी. 'संधी' साधून 'द्वंद्व—समास' जुळवला की नाही अजून?

"नाही हो. आमची पुरेपुर विभक्ती झाली!"

अस्सं, म्हणजे ताटातूट झाली! तुमचा द्वंद्व—समास जुळला नाही आणि तत्-पुरुष कोणी वेगळाच निघाला? बोला मोरोबा, बोला. काय झालं? कसं झालं?

"अहो मला ती शरदुत्पल—पत्राक्षी कोपायमान होऊन म्हणाली— 'तुमचे शिष्ट, विशिष्ट अन् क्लिष्ट शब्द ऐकून मला अगदी भ्रमिष्ट होण्याची वेळ आली. चालते व्हा. अशी ती उदंचन्-उद्दाम यौवन दुर्मद-परिपूरिता! खरतर-कंदर्प-दर्प-वज्रसार-हृदया! विद्युद्दाम स्फुरण-चकित-लोला पांगा."

लोलापांगा? ही पांगापांग कशाला? अहो, तुमच्या थोबाडाच्या गोफणीतून असे दणकट शब्दाचे धोंडे भिरकवणार असाल तर मीहि म्हणेन —'गच्छ रे गच्छ' अगडबंब-संस्कृत. शब्द-परिपूरित भांडागार, गच्छ!' अहो, जो महामूर्ख माणूस सुकुमार सुंदरीशी कर्णकठोर दुर्बोध शब्दानी लगट करू पहातो, तो मंजूळ वीणेच्या नाजूक तारा जळत्या लाकडाने छेडण्याचे अघोर कर्म करतो!

.जा कठोर शब्दांचा नि कठोर मनाच्या नारींचा छंद सोडून द्या.

"कठोर शब्दांचा छंद सोडीन; पण त्या शैल-कठोर हृदयी शिरीष-कोमलांगी साळूचा छंद कसा सोडू? अहो, खंडो-शंकर मी तिच्या इश्कात पडलो नसतो हो! पण हा हन्त हन्त! काय करू त्या पापिणीनं आम्हाला फसवलं?"

—ते कसं काय?

"अहो, त्यानं लिहून ठेवलंय की मन नपुसंकलिंगी आहे. झालं, आम्ही त्याच्या-वर निर्धास्त विश्वास ठेवून ते तिच्याकडे पाठवलं. पण ते वेटं तिथंच रमलं. तिच्या चरणारविंदी मिलिंदायमान झालं, तिच्या ललित—कोमल—प्रणय—कोशात रममाण झालं!"

—होणारच! मोरवा तुम्ही विसरलात की मन व्याकरणात नपुसकलिंगी असलं, तरी देखण्या नारींच्या सहवासात पुल्लींगी बनतं! .जाऊ द्या झालं, मोरबा तिचा नाद सोडा. अहो, कोमल ललना कोमल कवितेवर, रसील्या लावणीवर आशक होतात; तुमच्या खडबडीत व्याख्यानावर नाही!

"अहो, म्हणून तर मी तिच्यासाठी एक लावणीहि रचली आहे. ती मेहेरबानी करून तिच्याकडे घेऊन जा!"

—काय तुम्ही लावणी रचली आहे? म्हणजे तुमच्या इश्काच्या मुसळाला कोवळ्या कवनांचे कोंब फुटले म्हणायचे?

"हो, हो. कोवळ्या कवनांचे कोंब! पहा तर तिचं रूपवर्णन किती ललित-मंजुळ-कान्त पदावलीनं केलं आहे. ऐका—

नांव तुझं साळु, चल आज खेळूं
उभि दारि नार नखऱ्याची।
चाल तुझी मराठ मोळ्याची !।।धृ।।
नको वर पाहूं, दुर नको जाऊं

गांठ पडलि, आज बोलं जरा
प्रीतिचा लावून तोरा।
नाकिं नथ हलति, नागीन डुलति
शृंगाराचा किति नखरा।
कधिं करसि संकेत पुरा।
कधि गडे येसि, भेटून जासि
खुणगांठ आपले आंतर्‌ची
चाल तुझी मराठ मोळ्याची ।।
कुंकू कपाळि, राजस बाळि
अटकर बांधा तो अरवा
बुचड्यामधि खोवून मरवा।
पेंडे तन्मणि, जिवलग गडणि
शालु नेसून आज हिरवा
कां सजणाशि बेपरवा
लई मन मिळलं, नाहिं कधि टळलं.
आण तुला माझ्या रक्ताची
चाल तुझि मराट मोळ्याची!!"

—अरे कविता–चोरा! ही तुझी लावणी नाही. ही तर सगनभाईची लावणी! दोन-चार शब्द बदलून तूं चोरलीस. जा खुशाल अशी मोराची पिसं लावलेल्या डोमकावळ्यासारखं कवित्व मिरव! मी चालला.

( मंडलाकार फेरी मारून )

—आम्हा मध्यस्थांचा बादशहा रंगराव पुणेकर ह्याची ही आवडती माडी! रंगू जुन्नरकरची! तो आता इथं सापडेल काय? अहो आश्चर्यम्! रंगराव ऐवजी हे जटाधारी दाढीदीक्षित, हे महंत महाबळेश्वर या माडीतून कसे बाहेर पडले? हे आहेत शनवार पेठेतल्या एका मठाचे अधिपति! पण...पहा कसे चोरासारखे नजर चुकवून सटकत आहेत!...अहो महंत, असे अंग चोरून कां चाललात हो ?

"अहो कोण्या शूद्राचा स्पर्श होऊन माझे सोवळं बिघडू नये म्हणून!"

—तुमचं सोवळं? वाहवा, कुण्या महार-मांगाची नुसती सावली पडली तर तुमचं सोवळं बिघडतं? मग काय हो त्या रंगूचा मखमली गालिचा नि छपरी पलंग म्हणजे काय चंद्रभागेचा पवित्र घाट आहे? नाही? कुठला गालिचा नि कुठला छपरी पलंग? आम्ही आहोत वैरागी भिक्षेकरी!......"

—भिक्षेकरी? वाहव्वा! मग आपण सुरत–भिक्षा मागत दारोदारी जात असाल! गुलाबी गालांचा गुलकंद, अधरावरचा मकरंद, हनुवटीचा सफरचंद अन् दोन पाडाला आलेल्या आंब्यांचा संबंध–अशी भिक्षा या रंगूकडे मिळालेली दिसते !

"अरे पाखंड्या! भलता संशय घेऊ नकोस. संशयात्मा विनश्यति. तुला रामाची शपथ घेऊन सांगतो"...

—हां, कुणाचीहि शपथ घ्या; पण रामाची नको. मठातल्या राम-मंदिरातील रामापुढील पुजेचे पैसे ऐषआरामात उडविणारे तुम्ही महंत! कशाला भलत्या शपथा घेता? खरं खरं सांगा, या रंगूकडे ऐन दुपारी कशाला आला होतात? तीर्थप्रसाद वाटायला? की शेजारती साजरी करायला? बोला, कशासाठी महंतानी इकडे येणं केलं ?

"तिचं सांत्वन करायला? तिला धीर द्यायला ?"

—ते कशासाठी? तिची आई मेली की बाप मेला?

"नाही हो, आईबाप मेले तर तिला काही दुःख होणार नाही; पण तिचं एक मोठं गिऱ्हाईक मरण पावलं."

—मोठं गिऱ्हाईक ? तुमच्याहून ?

"हो हो. सरदार प्रतापराव माणकर ! तो हिचा यार अन् माझा परमभक्त. तेव्हा त्याच्या रखेलीचं सांत्वन करणं माझं पवित्र कर्तव्य होतं!"

—अस्सं ! मग हे सांत्वनाचं पवित्र कर्तव्य कसं केलत? तिला पोटाशी धरून की पाठीवरून हात फिरवून?

"छे, छे, भलतंच काही!"

—भलतंच कसं? अहो दीक्षित तुमची ही सफेद दाढी तिच्या डोळ्यातल्या काजळाचा कलप लागूनच काळी झालेली दिसते! आणि तिच्या ओठाचा रंग

तुमच्या भगव्या कफनीला जागोजाग बिलगला आहे! खरं बोला, खरं बोला. तुम्ही कोणत्या अमृताचा अभिषेक करून तिला शांत केलं?

"शंकराचार्यांचा वेदांत तिच्या गळचात उतरविला!"

—वेदांत गळचात उतरवला की गळचात गळा घातला? म्हणे शंकराचार्यांचा वेदांत! अहो, तुमच्या तोंडी शंकराचार्यांचा वेदांत म्हणजे दारूच्या कुंडात तुळशीची मंजिरी! कोकशास्त्राच्या ग्रंथात कार्तिकस्वामीची आरती! अरे, देवपूजेच्या ताम्हणातून कामवासनेची मदिरा पिणारा तू दंभाचारी! एकादशीला कबाब खाऊन, मुखशुद्धीसाठी गणिकांचे ओठ चघळणारा तू दुराचारी! कशाला या पापी मस्तकावर जटांचा भार वाहातोस? कशाला ही भगवी कफनी घालतोस? कशाला मठाचा कुंटणखाना करतोस अन् कुंटणखान्यात डेरेदाखल होतोस?

"अहो कुंटणखाना इतराना बाधेल, पण मला बाधू शकणार नाही! कारण इथल्या नखरेल रक्षांपासून स्वतःचे रक्षण व्हावे म्हणून, मी राम-रक्षा-स्तोत्राच्या कागदाची घडी करून, तो या ताइतात ठेवला आहे!"

—अरे हलकटा! रामरक्षा-स्तोत्रच काय, प्रत्यक्ष प्रभु रामचंद्रहि तुझ्या सारख्या पातक्याचे रक्षण करू शकणार नाहीत.

**जा जा येथुन विषय सूकरा। तू वरवर सोवळा।**
**दंभाचारी अधमाधम तू, आंतुन रे ओवळा॥**
**करिं जरि जपमाळा। अंतरीं-मदनाचा चाळा॥**

खरोखर, कुठे ते देवभक्तीचे मठ गांवोगाव स्थापन करणारे रामदास महाराजांसारखे थोर संत, आणि कुठे हे नीच महंत!..अशा नीचांची चलती असलेली ही रावबाजीची पेशवाई किती दिवस टिकणार?... जाऊ द्या झालं!

( मंडलाकार फेरी मारून )

वाहवा, या हंसा पालकरच्या माडीचा गुलाबी रंग फारच गहिरा आहे? पण दिवसा देखील दार बंद का? कुठे गावाला तर गेली नाही? हां, कदाचित तो एलिफांस साहेबांचा मुन्शी इस्टुर (स्टुअर्ट) आत असेल. कारण रविवारी तो बहुधा हिच्याकडे येतो! दार ठोकून तर पाहू या!...अरे, कुणी घरात आहे का? कोणी ओ देत नाही. हंसा, ए हंसा! अजून ओ नाही. पण कंवरपट्टा ताडकन् तुटल्याचा आवाज मात्र कानी आला!...अग, घरी आहेस ना? बहुधा तीच येत आहे!

"रामराम खंडोशंकर! माफ करा हं! मी मागच्या दारी होते. म्हणून जरा उशीर झाला दार उघडायला."

—अग तुला यायला उशीर व्हायचाच! कारण तुझ्यासारख्या जवानीनं काठोकाठ भरलेल्या नारीची चाल धीमीच असायची—

**[दिंडी]**

**मधुर बाला कुच-कलश-नितंबाला**
**मदन-भूपति अर्पिता गौरवाला।**
**भार तो ना सोसवे सुंदरीला॥**
**म्हणुनि येई ती मंदता गतीला॥**

"हे हो काय खंडोशंकर? तुम्हाला गडे सदा न कदा थट्टाच सूचते."

—बरं थट्टा राहिली, सांग बरं कशी काय आहे तुझी तब्बेत? बरीच थकलेली दिसतेस? घामाघुमहि झालेली दिसतेस? काय आतल्या महालात झिम्मा वगैरे खेळत होतीस की काय?...अन् काय ग हा कंवरपट्टा, ही किणकिणति मेखला, तुटलेली कां दिसत आहे?

"अगबाई! केव्हा तुटली कोण जाणे!"

—मी जाणे! हंसा, तुझ्या नितंबावरील काळचा चंद्रकळेवर विजेसारखी चमकणारी ही मेखला—ही मदनाच्या धनुष्याची दोरी—आत्ताच तुटलेली दिसते? कां? खुदकन् हसलीस कां? अग, कमाल आहे तुझी. दिवसाहि तुमचं होम—हवन चालूच असतं तर? तू इस्टुर साहेबाला दिवसाहि विश्रांति घेऊ देत नाहीस तर!

"अगबाई, तुम्ही कसं ओळखलंत की आत इस्टुर साहेब आहेत म्हणून?"

—त्यात काय कठिण आहे? हे बघ, इस्टुरसाहेबांचे अंग्रेजी जोडे इथेच आहेत!...अरे ही तर लाजून आत पळाली! आणि हा इस्टुर साहेबच कुडत्याच्या गुंड्या लावीत बाहेर आला!

"नमस्टे, गुड इव्हिनिंग मिस्टर खंडोसंकर!"

—राम राम साहेब. माफ करा हं..

"नेव्हर माईंड मला ठाऊक आहे मिस्टर खंडोशंकर की टुमी लई बिलंदर आहे, टुमी लई क्लेव्हर टाऊट आहे!"

—माझी तारीफ राहू द्या साहेब. मला सांगा तुमची कवायत आजकाल कशी चालू आहे? हंसाशी टुमचा रोमांच कसा काय चालू आहे?"

"वंडरफुल आहे आमचा रोमान्स! ती आमची हार्ट आहे; लई लई स्मार्ट आहे! मापुक नखऱ्याचा मार्ट आहे! हिच्या नैनाचा ॲरो, आमच्या दिलातला सॉरो खलास करटो! खूबसूरत स्वान म्हणतो मी माझ्या हंसाबाईला!"

—श्वान? म्हणजे कुत्रं?

"नो, नो, नो. SWAN—स्वान म्हणजे टुमचा हंस पक्षी! मी टिला मडुम वनवून विलायतला घेऊन जाणार!"

—जा जा. पण आधी तुमची इंग्रेजी भापा तिला शिकवा अन् तिची मराठी भापा तुम्ही चांगली शिका! नाहीतर साहेव, तुम्ही किस् म्हणजे मुका मागाल, आणि ती तुम्हाला आणुन देईल रताळ्याचा किस! तुम्ही तिला मागाल चीक म्हणजे गुलावी गाल अन् ती देईल तुम्हाला चिवकट चीक!

"अरे डोन्ट वरी दोस्त! इस्कांट लँगवेजची आडकाटि नसटे. खरं तर इस्क वोलायचा नसतो, करायचा असतो!

—वहुत उत्तम! यः क्रियावान् स पंडितः! करणारा तो शहाणा, नुसता वोलणारा तो दिवाणा। चालू द्या तुमचा इस्क!

"हां हां चाललाच आहे. अरे आमी टर टिच्यावर लावनी कंपोझ केलीय ऐक—

**मिठी मिठी नाइटिंगेल्**
**व्हेरी व्हेरी ती रंगेल॥धृ॥**
**टिची लहानशी जरि हाइट्**
**तरी जवानी लई टाइट्**
**करते इस्काची टी फाइट्**
**झाला दिल् आमचा फेल्!...**
**हाउ स्वीट, हाऊ चार्मिंग**
**टिच्या पैंजणाचा जिर्गलिंग!**
**ती दिलवाली डार्लिंग!**
**टिचा रोमान्स लई अलवेल्!...**

—भले भले! वावनखणीच्या इष्काचा डंका थेट विलातेत झडू द्या, जातो मी.

(मंडलाकार फेरी मारून)

अहो, या वावनखणीत कोण कोण भेटतील ह्याचा नेम नाही! इस्टुर साहेबानं देखिल आपलं विलायती जहाज इथल्या इश्काच्या वंदरात नांगरलं की!. हे पहा आणखी एक जहाज. हा त्या धनशेट्टी वाण्याचा उडाणटप्पू कारटा रतनशेट्टी! याचा बाप माझा वालमित्र तेव्हा याच्याशी थोडं हितगुज करणं माझं कर्तव्य आहे.... राम राम. रतनशेट्टी, तुझं अभिनंदन असो!

"कां? कशावद्दल? ती हैद्रावादवाली रोशन्, माझ्यावर लट्टू झाली म्हणून?"

—अरे नव्हे. तुझ्या वापाने एका-चांगल्या श्रीमंत घराण्यातली मुलगी तुझ्यासाठी पाहिली म्हणून!

"हरे राम! आमच्या थेरड्याला हा उपद्व्याप कुणी सांगितला. त्याला सांगा, तुम्हीच तिच्याशी खुशाल म्होतूर लावा. पण आम्हाला या वावनखणीच्या स्वर्गातून संसाराच्या नर्कात ढकलू नका! सारे वुढे वाप म्हणजे तरुण मुलाना डसणारे साप! कवडी कवडी करून साठविलेली संपत्ती मी या वावनखणीत उडवू नये, म्हणूनच माझा तो कंजुप म्हातारा मला लग्नाच्या खोड्यात अडकवू पाहत आहे! असा राग येतो की हाती एक कुऱ्हाड घ्यावी आणि परशुरामानी सारी पृथ्वी जशी निःक्षत्रिय केली, तशीच जगातील साऱ्या वापांची सरसहा कत्तल करून टाकावी. एकही वाप शिल्लक ठेवू नये!"

—नको नको. कृपा कर, शपथेला तरी एखादा वाप राहू दे! वेटा, कोणी ना कोणी वाप नसता तर तुझी ती भावुक मैना कशी वरं पैदा झाली असती? अन् तिच्याशी इष्काचे चाळे करायला नि वापाची संपत्ती तिच्यावर उधळायला तू तरी कसा जन्माला आला असतास?

"पुरे पुरे. मामा उगाच वापांची वाजू घ्याल तर तुमच्या वापाची शपथ?

जा. माझ्या त्या थेरड्याला सांगा. वावनखणीचे मखमली मंचक सोडून लग्नाच्या वोहल्यावर मी कालत्रयी चढणार नाही, अशी भीष्म प्रतिज्ञा केलेली आहे म्हणून? संसाराच्या कटकटीत शंभर वर्षे जगण्याऐवजी, वावनखणीच्या गुलजार गल्लीत दिवसातून शंभरदा मरणं चांगलं?

—हर हर? काय म्हणावे तुझ्या उन्मत्तपणाला? वाकी कुलवधूचा मंगल

महिमा तुझ्यासारख्या अडाणी उल्लू पठ्ठ्याला कसा कळणार ?

"वाहवा, मामा, तुमचं सारं, आयुष्य बावनखणीच्या व्यवहारात गेले. अन् तरी तुम्ही कुलवधूच्या थोरवीच्या गप्पा मारता ! जन्मभर मध्यस्थीचा नि दलालीचा धंदा केला आणि आता प्रवचन झोडण्याचा उपद्व्याप करता ! अहो आमच्यासारखे पलंग-पंडित संसारात पडले, तर तुमचा धंदा सपशेल पडेल ना!"

"मूर्खा, वटवट बंद कर. मी दुर्दैवानं या मध्यस्थीच्या धंद्यात पडलो; ऐन तारुण्यात रंगढंगहि केले. पण इथले विषाचे शौचकूप कितीहि रंगीबेरंगी असले तरी त्याना मंदिर मानण्याचे पाप केलेलं नाही! कितीहि चकाकलं तरी पितळाला सोनं समजलो नाही! वारांगनांच्या पैंजणाचे झणत्कार मंदिरातील घंटानादाहून श्रेष्ठ मानण्याचा नादानपणा केलेला नाही! अरे, खोटं बोलणाऱ्या, खोटं हसणाऱ्या, खोटं रडणाऱ्या वारांगनांची खोटी प्रीति मी पाहिली, म्हणूनच पतीला परमेश्वर मानणाऱ्या सतीची खरी महती मला पटली ! लक्षात ठेव—

**धन्य गृहदेवता, हसत जी सदा**
**झेलते निजशिरी हसत जो आपदा ।**
**पतित पतिच्याहि जी त्यजि न कधीही पदा**
**धन्य ती, कुलवती, धन्य शुभ-संपदा ।**

जा, वेळीच सावध नि सुखी हो! ईश्वर तुला सद्बुद्धी देवो. मी जातो.

( मंडलाकार फेरी मारून )

अरे पुनः पावसाची सर ? . . . आता निवाऱ्यासाठी कोठे जावे? हं, ही यमुना नगरकरची माडी, तिच्याकडेच घटकाभर थांबू. वेळ बरा जाईल तेवढाच. यमुना! अग यमुना! घरात आहेस का?

"या या खंडोशंकर. वरेचसे भिजलात की काय ?"

—नाही, विशेष नाही. सर ओसरेपर्यंत इथंच थांबतो घटकाभर.

"घटकाभर का ? तुमचंच घर आहे. घ्या पान घ्या, तंबाखू घ्या, सरबत वगैरे काही घेणार?"

—नको, नको. निघतोच मी. सर ओसरली!

"हो. पण आपुलकी ओसरली नाही यमुनाची. मी तुम्हाला इतक्यात सोडणारच नाही. माझ्या सवालाचे जबाब दिल्याविगर!"

—वः, तुला त्या धोंडिबा शाहिराच्या संगतीत वराच नाद लागलेला दिसतो उखाणे घालण्याचा. वघू तरी काय उखाणे आहेत ते.

"सांगते ऐका—

**यमपाशाहुनि असे वेगळा**
**अजब असा गळफास ।**
**सांगा चतुरा पाश कोणता**
**सवाल माझा खास ।।"**

—अग, हाच का तुझा खास सवाल ? यमुने, विचित्र असलेला जादूचा फास तुझ्यापाशीच आहे.

"अगबाई, कोणता? कुठे? कसा? विचित्र गे [illegible]



तुझ्या बाहुचा पाऽश।
गळ्यास बसता जगवी मजला;
सुटता सत्यानाश!

"भले, भले! अगदी बरावर जबाब दिलात. पण आता त्याहून कडक सवाल घालते."

—तुझं काहीहि कडक असणं शक्य नाही. फुलाचा देठ असून असून किती कडक असणार? बरं पण सवाल बोल.

"जन्मताच जो अंध, आणि जो
डोळस उत्तम असे।
या दोघांची समान हानी
सांगा कधि होतसे? ॥

—"आंधळा अन् डोळस यांची सारखीच नुकसानी केव्हा होते, हाच ना तुझा सवाल? जबाब अगदी सोपा आहे—

जो नच पाही तुला राजसे!
अथवा पाही जो तुजला।
त्या दोघांचा समान तोटा
कसे न कळले हे तुजला?
जो नच पाही तव सुंदरता
दृष्टी-सुख तो हारवितो।
जो तुज पाही तो तर झटपट
हृदय आपले गमावतो ॥

संपले ना तुझे सवाल? आता मी जातो.

"नाही गडे. आणखी एका सवालाचं उत्तर द्या. नंतर हे सरबत घ्या. माझ्या हातचा विडा घ्या. अन् मग खुशाल जा! ऐका—

लचकत मुरडत गजेन्द्र-गमना
जेव्हा रस्त्याने जाते।
थोडे चालुन गेल्यावरती
पुनरपि मागे कां बघते?

—अगे सखे सुंदरी ! तुझ्यासारखी गुलेनार रस्त्यानं जाताना अधूनमधून मागे मुरडून पाहणारच!

नैनशराना बरसत जाता
मागे मुरडुन बघते ती!—
किती तरुण घायाळ जाहले?
मरण पावले मर्द किती?

"भले भले खंडोशंकर! तुमचं एकेक उत्तर म्हणजे केवड्याचं अत्तर! पण गडे, पान लावता लावता आणखी एक सवाल पुसते—अगदी एकच—

मधुर सुगंधित फारच सुंदर
लक्ष्मीचे आसन कवळे।
कमळ असे हे निर्दय विधिने
चिखलांतचि कां ठेवियले?"

—सुंदरी यमुने! यालाहि कारण तूच बरं! अग, बघ बघ, तुझा सुंदर मुखडा या डोळ्याच्या ऐन्यात बघ म्हणजे तुला कळेल, कमळाची अशी दुर्दशा ब्रह्मदेवानं कां केली? सुंदरी—

तुझ्या मुखाला उपमा द्याया
कमळ विधीने निरमियले!
अतुल्य परि ते ठरले म्हणुनी
चिखलांतचि फेकुन दिधले!

"राजसा, तुम्ही तर आज हद्द केली. घ्या. हा रंगतदार विडा घ्या. तुम्ही एवढे मोठे शाहीर असाल याची कल्पना नव्हती!"

—हां, हां, हां. मला शाहीर ही शिवी देऊ नकोस! आजकाल हुजूरांकडे जे हुजऱ्यां-



अनुक्रमणिका

सारखे मुजरे करतात, त्याना शाहीर म्हणतात. अलीकडेच बहुतेक शाहीर सरकार-दरबारात गोंडा घोळणारे लाचार कुत्रे बनले आहेत. अग कुठे ते मोरोपंत मुक्तेश्वरांसारखे काव्यसिंह, आणि कुठे हे आजकालचे ग्रामसिंह! हे मतलबी जीव रावबाजीच्या इश्कबाजीचं भगवान कृष्णाची रासलीला म्हणून कौतुक करतात. सरकारी इनाम मिळावं म्हणून तडफडतात! बरं पण ते जाऊ दे. मी जातो.

(मंडलाकार फेरी मारून–)

—आँ? हा बड्या बड्या सरदारांचा नि श्रीमंतांचा वैद्य इकडे या बावन-खणीच्या वेटाळात कां आला? ..हा आठवलं, हा आहे या हिरव्या माडीतल्या मैनेचा–तारा सासवडकरचा राघू! औषध देण्याच्या निमित्तानं हा लेकाचा कुठंहि उजळ माथ्यानं जाऊ शकतो. याची थोडी छेड काढायला हरकत नाही. काय वैद्यराज, त्या ताराचा कामज्वर जिरवला की नाही?

"अरे खंडेराव कुठला कामज्वर कमीचा? तिला थोडासा विषमज्वर झालाय् म्हणून."

—विषमज्वर की विषयज्वर? तुमच्या अंगरख्यावरचे डाग चक्क चाहडी करताहेत की तिला इष्काची बिमारी जडली आहे! मग काय तुम्ही नाडी-परीक्षेच्या निमित्तानं तिचा कोवळा हात हाती घेऊन दाबला असेल अन् ठोके मोजले असतील!

"छे, छे. भलतंच काही. मी तिला फक्त औषध दिलं अन् निघालो."

—औषध? हो, हो, तुमचं औषध बाकी ठरलेलंच आहे.

मदन बाणें हृदय भेद।
केलियावरी हेंच औषध।
मधुर विंबाधरास्वाद।
कुचालिंगन घट्ट ते॥

"छे, छे, शांतम् पापम्। शांतम् पापम्।"

—आलं लक्षांत. शांतं पापम् म्हणजे पाप शांतपणे करायचं! आपण त्या मदन ज्वरानं तापलेल्या तारावर अगदी शांतपणे चुंबनामृताचा वर्षाव केला असेल, अन् मिठीचा मिठ्ठास लेप लावला असेल!

"नाही हो. भलतंच काय बोलता?"

— बरं तर मग निदान 'मर्दनं गुणवर्धनम्' या आयुर्वेदीय तत्त्वानुसार अंगमर्दन तरी केलंच असणार? बाकी तसं करायला शास्त्राची मुळीच हरकत नाही!

"काय शास्त्राची हरकत नाही?"

—नाही. म्हटलंच आहे. जशास तसे या न्यायानंच वागावं! म्हणजे असं—

**मधु तिष्ठति वाचि योषिताम्।**
**हृदि हलाहलमेव केवलम्।**
**अत एव निपीयतेऽधरो।**
**हृदयं मुष्टिभिरेव ताड्यते॥**

भर्तृहरी म्हणतो – 'तरुण वेश्यांच्या हृदयात जहर असतं पण ओठावर मध असतो. म्हणूनच शहाण्या माणसानं अधरावरील मध अधरानंच सेवन करावा. आणि जहरी हृदयावरच्या विषकुंभांचं मर्दन करावं! अहो जो असं मर्दन करतो तोच खरा मर्द!

"वाहवा, उत्तम सुभाषित! केवढे विद्वान् आपण. या वेश्या बाजाराऐवजी सरकार–दरबारातच शोभून दिसला असतात. मी लावू का तुमच्यासाठी दरबारात वशिला?"

—नको नको. तुमच्या त्या सरकार-दरबाराहून हा बावनखणीचा बाजार शतपट बरा! तिथलं ते राजकारण नकोच. अहो दरबारी अधिकारी पैसा खातात अन् इथल्या वेश्याहि पैसे लुबाडतात. पण ते अधिकारी काम करतीलच याचा भरोसा नसतो. या गणिका मात्र जेवढा दाम तेवढा काम तावडतोब पदरात टाकतात! या गणिका चंचल असतात, अन् दरबारी राजकारणीहि चंचल असतात. पण गणिकांच्या चंचलतेपायी फार तर ५–२५ जीव बरबाद होतात. परंतु सरकारी लहरीपायी गावच्या गाव, परगणेच्या परगणे एका क्षणात बेचिराख होतात! वारांगना गोरगरीबांच्या वाटेस जात नाहीत; पण दरबारी सौदे प्रथम गरीबांचेच कर्दनकाळ होतात. तथापि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी की,

वेश्यांचं पाप उघड उघड असतं, पण सरकार–दरबारचे राजकारणी काळ्याकुट्ट पापाला पुण्याईचा नि संभावितपणाचा मुलामा फासतात ! ... सारांश, तुमच्या सरकार–दरबाराहून हा वारांगनांचा बाजार अधिक चांगला आहे; प्रामाणिक आहे !

"अहो केवढं हे अगाध ज्ञान ! सांगा, मी या ज्ञानाचा उतराई कसा होऊ ? आपली काय सेवा करू ?"

—इतकंच करा. आमचे विट-महर्षि रंगराव कुठे असतील, त्यांचा पत्ता सांगा माहीत असेल तर !

"अहो एवढंच ना ? सारे मध्यस्थ महर्षि बसले आहेत गांजा ओढीत त्या श्याम दुलारीकडे–त्या फुलगल्लीच्या टोकाला !"

—ठीक, ठीक. निघालोच मी तिकडे. नमस्कार.

(मंडलाकार फेरी मारून–)

हां, हीच हीच ती बनारसच्या श्याम दुलारीची हवेली! या उत्तर भारती गाणारणीनं चांगलाच जम बसवलाय् या बावनखणीत ! . . व: इकडे ही तल्लीन होऊन ठुमरी म्हणत आहे; अन् तिकडे आमचे मध्यस्थ–महाजन गांजा ओढीत वाहवा वाहवा करीत आहेत ! . . .आधी हे गाणं ऐकावं अन् नंतर यांचा समाचार घ्यावा. ओहो, किती आर्त हे सूर ! किती मिठास !

"साजन कब घर आयेंगे
मैं प्यासी हूं वो मोहनकी ।।धृ।।
जमुना तटपर बाट तकत हूं
मैं उसके घर आवनकी—

—वाहवा, श्याम दुलारी बहोत अच्छे !

"शुक्रिया, शुक्रिया! शरबत ले आती हूं !"

"अरे खडो शंकर तू इकडे कसा ?"

—तुमच्याच शोधात आहे महाराजा आज

"बमा बमा गव. आम्हाला ते सर्व कळलंय तुमच्या चिरंजिवांकडून ! आम्ही प्रायश्चित्तहि शोधून काढलय् त्या मावकासाठी !"

—फार उत्तम. ही घ्या मोहरांची थैली. अन् बोला पंचायतीचा निवाडा !

(इतक्यात पड्द्यातून गलका गोंधळ ऐकू येतो. हाणा हाणा ! मारा, तोडा दार ! हां. . . हां खबरदार इत्यादि क्रुद्ध गर्जना ऐकू येतात.)

—अहो निवाडा राहू द्या! ती पहा चंदा नायकिणीच्या माडीसमोर मोठी मारामारी चाललीय ! चला तिकड चला. गांजा चिलीम राहू द्या. . . पहा पहा कोतवालाचे शिपाई प्यादे दारावर लाथा मारत आहेत. छे, छे, अशी झोटिंग–पातशाही पूर्वी नव्हती. चला, चला. रंगराव, मुरारराव, बबनराव जल्दीनं चला !

[पुन: पड्द्यातून उपरोक्त गलका ऐकू येतो. खंडोशंकर घाईघाईनं निष्क्रमण करतो.]

**(संक्षिप्त प्रथम अंक समाप्त)**

**[महत्वाची सूचना : या नाटचाचे सर्वाधिकार लेखकाकडेच आहेत. परवानगीशिवाय त्याचा कोणत्याहि प्रकारे वापर केल्यास कायदेशीर इलाज केला जाईल.]**

• • •



## त्या तशा पावसामध्ये

त्या तशा पावसामध्ये
भेटलो–भेटलो नाही;
द्यायचे ते दिले नाही,
घ्यायच विसरलो काही

बेभान अनोखी वीज
अवकाशा उजळित होती,
मेघांच्या पड्द्यामागे
जरि लपली गगनज्योती !
त्या तशा पावसामध्ये
अंगांग चिंब भिजलेले,
ओलेती भवती झाडी,
मातीचे मन हललेले!

तू वसन नवे ल्यालेली
मनि अस्फुट राधागीत,
त्या अथांग नयनांमध्ये
क्षण दिसला यमुनाघाट

—त्या तशा वादळामध्ये
भेटलो–भेटलो नाही;
त्या क्षणी हरवलिस कोठे
ते अजून कळले नाही!

–वि. म. कुळकर्णी



## जीवनाचा आराखडा




आपल्या जीवनामध्ये कित्येक गुण असतील जे तुम्हा स्वतः–लाही माहीत नाहीत. आणि ते जाणल्याशिवाय तुमच्या जीवनाचा अचूक मार्ग तुम्हाला समजणार कसा ? आंतरराष्ट्रीय कीर्तीचे भविष्य व भाग्यरत्नतज्ञ ज्यांना दुनियेच्या कानाकोपऱ्यातून प्रशस्तीपत्रे आली आहेत, ते आपणाला आपल्या जन्मतारखेवरून आपल्या जीवनाचा आराखडा म्हणजेच आपल्या स्वभावाचा तपशील फक्त इंग्रजीमधून लिहून पाठवतील. ते वाचल्यावर आपल्याला यशस्वी जीवनाचा मार्ग दिसून येईल. तसेच आपल्यासाठी भाग्य ग्रहरत्नाची निवड करून देतील आणखी आपल्याला तीन पुस्तिका Spiritual Guide", Gems And Jewel आणि Penpal-Paradise पाठवतील. हे सर्व घेण्यासाठी आपण फक्त १ रुपयाची मनीऑर्डर पाठवा आणि मनीऑर्डर कूपनवर आपला पूर्ण पत्ता, जन्मतारीख स्वच्छ हस्ताक्षरात लिहा. समक्ष भेटण्यासाठी टेलीफोन नाहीतर पत्रद्वारा प्रथम कळवा.

**— अशोक वालीया —** भाग्यग्रहरत्न विशारद आणि भविष्यतज्ञ

'मालती सदन' डेक्कनजिमखाना, पुणे क्रमांक ४. फोन नं. ५५१८२.

### अनंत अंतरकर अंतरले !

हंस, मोहिनी व नवल या तीन मासिकांचे यशस्वी संपादक व आमचे अत्यंत जुने स्नेही श्री. अनंत अंतरकर यांचे गेल्या महिन्यात दुःखद निधन झाले. मध्यंतरी मासिकांच्या व्यावसायिक स्पर्धेत नुसताच 'धंदा' करण्यासाठी काही मासिकानी हीन दर्जाचा 'साहित्यकल्लोळ' माजविला त्यावेळी त्यानी आपली प्रखर निष्ठा व उच्च अभिरुची जराही ढळू दिली नाही, आणि तरीही त्यांची मासिके सदा लोकप्रियच राहिली हे त्यांचे आठवणीत राहण्याजोगे वैशिष्ट्य. कै. अंतरकर यांच्या कुटुंबियांवर हा मोठा आघातच आहे. त्यांच्या दुःखात 'दीपावली' सहभागी आहे !

## भाग्यशाली वर्ष !

**१९६६ सालातले 'दीपावली' चे खास अंक एकापेक्षा एक गाजले. 'संगीत' खास अंक व 'अर्जून' खास अंकाची गोडी तर रसिकांच्या जिव्हाग्री अजूनही खेळत आहे....**

**१९६७ सालातला**




**चा**

**२६ जानेवारी खास अंक**

### नौदल-दर्शन विशेषांक

- ☆ *तुम्हाला दर्यावर नेऊन नौदलाचे अद्भुत दर्शन घडविणार !*
- ☆ *बॅटलशीप्स, क्रूझर्स, फ्रीगेट, माईनस्वीपर्स, विमानवाहिका, पाणबुडी या शब्दांचे अर्थ काय ?*
- ☆ *ॲक्शन स्टेशन्स ..........बेल खणाणली कीं काय घडते ? आणि........*
- ☆ *अहो आश्चर्यम् ! युद्धनौकेवर दहिवडा ! हे काय गौडबंगाल आहे ? अर्थात् ते आता अंकातच वाचा....*

**२६ जानेवारीला प्रसिद्ध होणार !**





अनुक्रमणिका

# अहो, 'हेही' उभे आहेत !

## रसिकहो, यानाही निवडून द्या !!

यंदाच्या दिवाळी अंकातील सारेच लेखक ( कवि वगैरे ) त्यातले जे आवडतील, रुचतील, पटतील त्याना निवडून द्या.

**कूपन**

१ सर्वोत्तम कथा ______

२ सर्वोत्तम लेख ______
(विनोदी, ललित इत्यादि) ______

३ सर्वोकृष्ट कविता ______

४ सर्वोत्कृष्ट रंगीत कलाकृती ______

५ सर्वोत्कृष्ट व्यंगचित्र ______

नाव ______

संपूर्ण पत्ता ______

______

योजनेच्या सर्व अटी मला मान्य आहेत.

स्वाक्षरी ______

● दीपावलीच्या वाचक-ग्राहकांची आवड-निवड अजमावून त्या प्रकाशात पुढील वाटचाल करण्याचा प्रयत्न करण्याचा हेतु ह्या 'निवडणुकी'मागे आहे. ● 'दीपावली' साहित्याची चोखंदळ निवड करतेच करते. पण वाचकांची व संपादकांची निवड कितपत जुळते हे ह्यातून तपासता येईल. ● हा 'आरसा' लेखकाना आपल्या 'सौंदर्य-प्रसाधना'त उपयुक्त ठरेल हाही एक फायदा ! !

वाचक ह्या योजनेला योग्य सहकार्य देतील अशी आशा आहे.

१ सोबत विनामूल्य कूपन दिले आहे. ते १० डिसेंबर १९६६-पर्यंत भरून पाठविणारांचीच 'मते' मोजली जातील.

२ आपल्याला आवडलेल्या साहित्याची नोंद (लेखकांच्या नावासह) करावयाची आहे.

३ पाचही कलाप्रकारात ती आवड नोंदविणे बंधनकारक आहे.

४ बहुसंख्येने अंतिम निवडीची अचूक नोंद असलेल्या कूपनांच्या प्रेषकास १०० रु. चे पहिले पारितोषिक देण्यात येईल. त्यानंतर ७५ व ५० अशी दोन पारितोपिके राहतील. एक चुकीस दुसऱ्या क्रमांकाचे व दोन चुकीस तिसऱ्या क्रमांकाचे पारितोपिक देण्यात येईल. अचूक नोंदणीची कूपने एकाहून अधिक आल्यास रक्कम विभागली जाईल. ह्यात प्रेषकानी नोंदविलेला गुणक्रम महत्वाचा मानला जाईल.

५ कोठल्याही कारणाने एखादे कूपन रद्द ठरविण्याचा अधिकार संपादक मंडळाला राहील. रद्द कूपनांबद्दल कोणताही पत्रव्यवहार केला जाणार नाही.

६ या बाबतीतला अंतिम अधिकार—संपादक मंडळाचा !

७ स्पर्धेचा निर्णय 'दीपावली'च्या जानेवारी १९६७ च्या अंकात प्रसिद्ध केला जाईल.

**आपली कूपन्स दि. १० डिसेंबर १९६६ चे आत 'दीपावली' कार्यालय, ४०-४२ केनडी ब्रिज, मुंबई ४ ह्या पत्त्यावर पाठवावीत**














# कृतज्ञतेची शब्दुली...

काहीशी स्फोटक अनिश्चितता सबंध वातावरणात; महागाईचा राक्षस अस्मान भेदून अजून वाढत असलेला; क्षणजीवी जीवनाला लालचावलेला एक प्रचंड प्रवाह धो धो वाहतो आहे; अशा परिस्थितीत रसिक वाचकांचे सक्रीय पाठबळ व महाराष्ट्रातील साहित्य, संस्कृति व कला प्रांतातल्या प्रथितयश बुद्धिमंतांची साथ घेऊन दीपावलीचा हा २२ वा वार्षिक दिवाळी अंक आपल्या तेजस्वी परंपरेला शोभेल अशा स्वरूपात पुन्हा एकदा रसिक वाचकाना नम्रपणे सादर करीत आहोत.

गेल्या २२ वर्षांच्या यशस्वी वाटचालीत दीपावलीने 'आधी केले व मग सांगीतले' या न्यायाने कित्येक नवीन कल्पनांचा पाठपुरावा केला. साहित्य, कला प्रांतातले जे जे नवे, प्रगतीशील व सच्चे याला नेहमीच अग्रहक्क दिला आणि चोखंदळ रसिकानी प्रत्येक वेळी अमाप उत्साहाने दादहि दिली व मनमुक्त अभिनंदनाचा वर्षाव केला. या खास अंकानेही दीपावलीने आपल्या परंपरेत भर घातल्याचे वाचकाना वाटेल असा विश्वास वाटतो.

दीपावलीने मिळविलेल्या या घवघवीत यशाचे श्रेय अनेक लेखक-मित्र, हितचिंतक यानाच आहे. त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच. त्यातही स्थापनेपासून ज्यांचे संबंध अबाधित आहेत असे पुण्यातल्या प्रसिद्ध टॉम अॅन्ड बे या जाहिरात कंपनीचे मॅ. डायरेक्टर श्री. गणेशराव तांबे यांचे सहकार्य फार मोलाचे. आमचे मित्र श्री. अच्युतराव बर्वे यांचे सहाय्य तर अंकरचना व इतर सर्व बाबतीत नेहमीच प्रामुख्याने असते. संपादक कार्यात श्री. गोपाळकृष्ण भोवे व मुद्रण कार्यात श्री. चंद्रकांत दळी यांचा श्रमाचा वाटा मोठा आहे. श्री. प्रभाकर अत्रे यानी व्यंगचित्रमाला यशस्वी करण्यासाठी फार श्रम घेतले. जाहिरात विभागाचे श्री. श्री. स. दाभोळकर यांची प्रतिवार्षिक सेवा भरीव आहे, हे अंकावरून दिसेल.

अंकाची सुबक छपाई करणारे 'जन्मभूमि' प्रेसचे संचालक व कामगार बंधु, बहुरंगी चित्र छपाई यशस्वी रीतीने केलेले 'आशा प्रिंटरी'चे श्री. भाई व सुरेश मालपेकर, फोटो ; ऑफसेट छपाई सफाईने करणारे जगदीश्वर प्रि. प्रेसचे श्री. भालचंद्रपंत पाठक व त्यांचे सहकारी, तिरंगी ब्लॉक्स दर्जेदार रीतीने करणारे बॉम्बे प्रोसेसचे श्री. मोहनराव कामत व इतर ब्लॉक्स तत्परतने करून देणारे प्रभात प्रोसेसचे श्री. विष्णुपंत कडव यांचे आणि वितरणाचे अत्यंत महत्वाचे व मुख्य काम अनेक वर्षे आपलेपणाने व चोखपणे पार पाडणारे श्री. बाबुराव बागवे या सर्वांचे या मंगलप्रसंगी मन:पूर्वक आभार मानतो.

स्टुडिओतल्या सर्व सहाय्यकानी तत्परतेने सहाय्य केले त्याला तोड नाही. ते घरचेच. त्याना आभार आवडणार नाहीत !

शेवटी या अंकाला आपले बहुमोल सहाय्य देणारे आमचे सर्व लेखक मित्र, जाहिरातदार आणि आमचे असंख्य रसिक वाचक याना येते वर्ष आनंददायी जावो असे मन:पूर्वक इच्छितो.

—दीनानाथ दलाल


| प्रकाशन स्थळ | ऑफसेट छपाई | रंगीत चित्र छपाई | ब्लॉक्स | छपाई |
|---|---|---|---|---|
| दलाल आर्ट स्टुडियो, ४०।४२, केनेडी ब्रिज, मुंबई–४. | जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस, गायवाडी, मुंबई–४. | आशा प्रिंटरी, खेतवाडी, मुंबई–४. | बॉम्बे प्रोसेस स्टुडियो, फोर्ट, मुंबई–१. प्रभात प्रोसेस स्टुडियो, ठाकुरद्वार, मुंबई–४. | स्टेट्स पीपल प्रेस, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई–१. |


पुढील अंक क्रिकेट पुरवणीसह १ डिसेंबरला नेहमीप्रमाणे प्रसिद्ध होईल!

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

